


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








अनुक्रमणिका







महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक २८२ - जुलै-ऑगस्ट-सप्टेंबर १९९७

□

संपादक
ह. ल. निपुणगे

□

**संपादन समिती**
डॉ. श. रा. राणे
डॉ. मधुकर हसमनीस
रत्नाकर कुलकर्णी
प्रा. भगवान ठाकूर
डॉ. सु. प्र. कुलकर्णी
डॉ. अरविंद संगमनेरकर

□

महाराष्ट्र साहित्य परिषद
टिळक रोड,
पुणे ४११ ०३०.
दूरध्वनी : ४७५९६३

अनुक्रमणिका



# अनुक्रम

संपादकीय / ह. ल. निपुणगे / ३
अभिवादन आणि शुभेच्छा / डॉ. गं. ना. जोगळेकर / ४
चरित्रकार डॉ. गोखले आणि गांधीजींचे महामानवत्व / डॉ. वि. रा. करंदीकर / ८
कवीच्या गावा जावे; कवी माधव / डॉ. मंदा खांडगे / ३४
आचार्य अत्रे नावाच्या विराट वादळाचे छायाचित्रण ! / भाई वैद्य / ४८
वि. स. खांडेकरांची कविता / अविनाश वामन आवलगावकर / ६२
ज्ञानपीठ पुरस्कार आणि मराठी साहित्य / डॉ. गं. ना. जोगळेकर / ७१
मल्हार महुडे गगनी दाटले... / शीला निपुणगे / ८०
आधुनिक मैत्रेयीचा गुलमोहर / स्नेहसुधा कुलकर्णी / ९०
काव्यानंद / स्वाती सामक / ९६
महाराष्ट्र साहित्य परिषद
एप्रिल-मे-जून १९९७ कार्यवृत्त / रत्नाकर कुलकर्णी / १०२

□

मुद्रक-प्रकाशक : राजा फडणीस, प्रमुख कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद,
टिळक रोड, पुणे ४११ ०३०.
मुद्रणस्थळ जंगम ऑफसेट, प्रा. लि., २५/१०, नांदेड फाटा, पुणे ४११ ०४१
मुखपृष्ठ-मांडणी : स. म. जंगम
मुखपृष्ठावरील छायाचित्र : डॉ. द. न. गोखले
छायाचित्रकार : शेखर गोडबोले
संगणकीय अक्षरजुळणी : यशश्री एंटरप्रायजेस, कोथरूड, पुणे ४११ ०२९
मूल्य : रुपये तीस □ वार्षिक वर्गणी संस्थांसाठी : शंभर रुपये
आजीव सदस्य शुल्क : रु. ५००/- □ वार्षिक सदस्य शुल्क : रु. ५०/-

महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाने या नियतकालिकाला अनुदान दिले आहे.
या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी सा. सं. मंडळ किंवा राज्यशासन सहमत असेलच असे नाही.

ह. ल. निपुणगे

# संपादकीय

भारतीय स्वातंत्र्याचा सुवर्णमहोत्सव साजरा करीत असतानाच आपण साहित्यसम्राट आचार्य प्र. के. अत्रे, समर्थ साहित्यिक वि. स. खांडेकर आणि रसिक साहित्यिक ना. सी. फडके यांचे जन्मशताब्दी वर्षही साजरे करीत आहोत. या थोर साहित्यिकांच्या स्मृतीला विनम्र अभिवादन !

डॉ. द. न. गोखले, प्रा. ग. प्र. प्रधान आणि प्रा. वसंत वापट यांची अमृतमहोत्सवी वर्षे पूर्ण होत आहेत. डॉ. व. दि. कुलकर्णी आणि नाशिक येथील कुसुमाग्रज प्रतिष्ठानच्या जनस्थान पुरस्कारासाठी निवड झालेले प्रा. गंगाधर गाडगीळ यांनी अमृतमहोत्सवी वर्षात पदार्पण केले आहे. या सर्व ज्येष्ठ आणि श्रेष्ठ साहित्यिकांनी आपला कायमचा ठसा मराठी साहित्यावर उमटविलेला आहेच. तसेच प्रसिद्ध समीक्षक आणि म. सा. पत्रिकेचे माजी संपादक श्री. शंक सारडा यांनी नुकतीच आपल्या वयाची साठ वर्षे पूर्ण केली आहेत. या सर्वांना साहित्यसेवेसाठी प्रदीर्घ आणि आरोग्यपूर्ण आयुष्य लाभावे आणि त्यांनी नव्या पिढीला मार्गदर्शन करीत राहावे हीच शुभेच्छा !

स्वातंत्र्योत्तर काळात मराठी साहित्य क्षेत्रात अनेक नवे प्रयोग झाले. त्यात नवकथा, काव्य, नाटके, विविध विषयांवरील सामाजिक, ऐतिहासिक कादंबऱ्या, ललित लेखन, चरित्र लेखन, आत्मचरित्रे, आत्मकथने, आठवणी, व्यक्तिविमर्श, विविध वैचारिक लेखन, समीक्षा इत्यादींमध्ये मोलाची भर टाकून अनेक नामवंतांनी मराठी साहित्य सकस आणि समृद्ध केले आहे. हे सर्व साहित्य आजच्या तरुण पिढीने वाचले पाहिजे, अभ्यासले पाहिजे त्यातून त्यांना यशस्वी जीवनासाठी निश्चितच मार्गदर्शन होईल.

नव्या पिढीतील अनेक लेखक पुढे येत आहेत. तेही आपल्या परीने मराठी साहित्यात मोलाची भर घालीत आहेत. त्यांनीही जुन्या लेखकांचे साहित्य आवर्जून वाचले पाहिजे. त्यामुळे त्यांचे विचार अधिक प्रगल्भ होण्यास निश्चितच मदत होईल.

आजच्या दूरदर्शनच्या अतिक्रमणाने आणि उच्चमध्यम वर्ग आणि मध्यम वर्गातील तरुणांच्या इंग्रजी भाषेकडे असलेल्या आकर्षणाने मराठीचा वाचक वर्ग कमीकमी होत चालला आहे. या तरुण पिढीने इंग्रजीचे आपले प्रभुत्व अवश्य वाढवावे, परंतु त्याबरोबरच आपल्या मातृभाषेतील उत्तमोत्तम ग्रंथांचाही आस्वाद घ्यावा. त्यासाठी लेखकांनी, संपादकांनी, सामाजिक कार्यकर्त्यांनी प्रकाशकांनी विशेष प्रयत्न करून तरुण पिढीला मराठी साहित्य वाचनाची गोडी लावली पाहिजे, वाचक वाढले पाहिजेत, मराठी पुस्तकांचा, नियतकालिकांचा खप वाढला पाहिजे तरच मराठीत अधिक सकस साहित्य निर्माण होईल.

नामवंत प्रकाशक, व्हीनस प्रकाशनाचे स. कृ. तथा भाऊसाहेब पाध्ये यांचे २९ जुलै १९९७ रोजी दुःखद निधन झाले. मराठी साहित्यावर मनापासून प्रेम करणारे, साहित्याच्या विकासासाठी झटणारे, साहित्यकृतींचे सौंदर्य जोपासणारे स्वतःच्या शिस्तपूर्ण स्वभावाने अनेक प्रकाशकांना मार्गदर्शक ठरणारे ज्येष्ठ प्रकाशक आज आमच्यात नाहीत याचे अतीव दुःख होत आहे. त्यांच्या स्मृतीला विनम्र अभिवादन !

म. सा. पत्रिकेचा एप्रिल-मे-जून ९७ चा अंक अनेकांना आवडल्याचे त्यांनी पत्राने, दूरध्वनीने कळविले आहे. त्या सर्वांना धन्यवाद. वैयक्तिक उत्तरे पाठविणे शक्य झाले नाही याबद्दल दिलगीर आहोत.

हा अंकही वैशिष्ट्यपूर्ण करण्याचा प्रयत्न केला आहे. वाचकांना तो आवडेल असा विश्वास वाटतो.

□



अनुक्रमणिका

गं. ना. जोगळेकर

# अभिवादन आणि शुभेच्छा !

कविवर्य वसंत बापट यांनी २५-७-९७ रोजी तर प्रा. ग. प्र. प्रधान यांनी २६-८-९७ रोजी वयाची ७५ वर्षे पूर्ण केली. या निमित्ताने या मान्यवरांना अभिवादन आणि शुभेच्छा !

बापट आणि प्रधान म्हणजे साने गुरुजींच्या 'धडपडणाऱ्या मुलांपैकी' प्रमुख. १९४२ च्या 'चले-जाव' चळवळीत दोघांचाही महत्त्वाचा वाटा होता. पुण्यातून गुप्त नभोवाणी केंद्र त्या काळात बापट चालवत असत. तेव्हापासून देशभक्तीची स्फूर्तिदायक गीते ते लिहू लागले. दोन्ही स्वातंत्र्य सैनिकांना त्या तेजस्वी पर्वात तुरुंगवास घडला. भारताला स्वातंत्र्य मिळाल्यानंतर दोघांनी विधायक कामाला वाहून घेतले. मात्र प्रत्येकाने स्वत:चे वेगळेपण उत्तम प्रकारे सांभाळले.


प्रा. वसंत बापट

बापट नूमवि आणि स. प. महाविद्यालयाचे विद्यार्थी, तिथूनच ते संस्कृत-मराठी विषय घेऊन एम. ए. झाले. मुंबईचे नॅशनल आणि रूइया या महाविद्यालयांत त्यांनी संस्कृत-मराठीचे प्राध्यापक म्हणून काम केले आणि शेवटी मुंबई विद्यापीठात गुरूदेव रवींद्रनाथ ठाकूर तौलनिक साहित्याभ्यास शाखेचे प्रमुखपद त्यांनी भूषविले.

पण हा प्राध्यापकी जीवनाचा आलेख म्हणजे बापट नव्हेत. बापट हे हरहुन्नरी, रसिक आणि संभाषणप्रिय व्यक्तिमत्त्व आहे. नाटक, संगीत अशा ललितकलांचे ते दर्दी आहेत. संस्कृत, इंग्रजी आणि मराठी मधील अभिजात साहित्याचे संस्कार पचवून त्यांनी आपल्या वाङ्मयीन व्यक्तिमत्त्वाची स्वतंत्र अशी जडणघडण केली आहे. सेवादलाचे कलापथक निर्माण करून त्यांनी नृत्यनाट्ये, राष्ट्रीय तमाशे, पोवाडे हे कार्यक्रम सादर करून नवीन पिढ्यांवर उत्तम संस्कार केलेच, शिवाय महाराष्ट्र दर्शन, भारत दर्शन, शिवराय राज्याभिषेक असे भरगच्च व नेटके कार्यक्रम करून महाराष्ट्राच्या कलावंतांना आपले गुण प्रकट करण्याची संधी दिली. आपले नित्याचे उद्योग सांभाळून तीस-चाळीस वर्षे या कलापथकाचे नेतृत्व बापट समर्थपणे करीत आले आहेत. 'आझादी की जंग' हा कार्यक्रम नुकताच सादर करून त्यांनी क्रांतिलढ्याचे जे तेजस्वी दर्शन घडविले त्याला तर तोड नाही.



अनुक्रमणिका

मराठी कवितेच्या क्षेत्रात बापटांनी केलेली कामगिरी तर केवळ अविस्मरणीय आहे. 'बिजली', 'सेतू', 'अकरावी दिशा', 'सकीना', 'मानसी', 'तेजस्वी', 'रूपसी', 'प्रवासाच्या कविता', 'शिंग फुंकिले रणी' हे बापटांचे कवितासंग्रह म्हणजे मराठी कवितेच्याच विकासाचे महत्वाचे टप्पे आहेत. गुणसंपन्न कविता लिहावी आणि ढंगदारपणाने सादर करावी ती बापटांनीच एवढे म्हटले तरी मराठी रसिकता जोपासण्यासाठी त्यांनी काय केले याची ओळख पटू शकेल. मराठी कविता संपन्न करणारा कवी हे त्यांचे मोठेपण सर्वमान्य आहेच, पण करंदीकर-बापट-पाडगावकर या त्रयीने गावोगाव 'मराठी काव्यदर्शन' सादर करून सर्वांसाठी जो आनंद लुटला ती या त्रयीने बजावलेली ऐतिहासिक कामगिरी होय. 'मेघदूतावर सहजसुंदर मराठी साज चढवून आणि प्रभावी बालकविता लिहून मराठी कवितेची त्यांनी शान वाढविली आहे. मराठी रसिकांचा बापटांच्या कवितेवर कायमचा जीव जडला आहे.

कवितेइतकेच बापटांचे गद्यलेखनही प्रभावी आहे. 'बारा गावचे पाणी', 'गोष्टी देशांतरीच्या' ही त्यांची पुस्तके प्रवासवर्णन पर मराठी पुस्तकांत आपल्या वेगळेपणाने उठून दिसतात. 'जिंकुनि मरणाला' या पुस्तकांत बापटांनी अनेक थोरामोठ्यांचे, देशभक्तांचे व समाजसेवकांचे समर्पक शब्दांत गुणगान केले आहे. म. सा. परिषदेचे 'चिं. वि. जोशी' पारितोषिक लाभलेले 'विसाजीपंताची वीस कलमी बखर' हे पुस्तक तर गद्यविडंबनाचा अजोड नमुना म्हणता येईल. शिवकालीन (बखरींची) भाषा आणि वर्तमानकालीन दांभिक राजकारण्यांच्या लीला यांचे बापटांनी घडविलेले दर्शन (आणि त्याला वसंत सरवट्यांच्या अफलातून चित्रांची जोड) हे एक उत्तम जमून आलेले पुस्तक आहे.


*प्रा. ग. प्र. प्रधान*

'साधने'चे संपादनकार्य त्यांनी दक्षतेने सांभाळले. भरगच्च आणि कसदार दिवाळी अंक हे साधनेचे वैशिष्ट्य बापटांनी परोपरीने जपले. कुठलेही काम चोखंदळपणे करायचेच पण परिपूर्णतेचा आग्रहही धरायचा याची प्रचीती त्यांच्या संपादनातून येते, उत्तम शिक्षक, तयारीचा वक्ता, मैफल रंगविणारा चलाख संभाषणपटू, जन्मजात कलावंत आणि आघाडीचा लेखक असलेल्या बापटांना भावी कार्याबद्दल शुभेच्छा!

प्रा. ग. प्र. प्रधान - १९४६ ते ६६ अशी वीस वर्षे फर्ग्युसन महाविद्यालयात इंग्रजीचे प्राध्यापक होते. त्यांच्या जिवंत अध्यापनाचा लाभ शेकडो विद्यार्थ्यांना झाला. साहित्याचा उत्कृष्ट शिक्षक केवळ साहित्याचा नव्हे तर जीवनाचा अभ्यास करण्याची प्रेरणा कशी देतो याचे प्रधानसर हे मूर्तिमंत उदाहरण आहे. (प्राध्यापक होण्यापूर्वी साधारण वर्षभर प्रधानसर मॉडर्न हायस्कूलमध्ये शिक्षक होते; पण तेवढ्यामुळे 'मास्तर' हे बिरुद त्यांना कायमचे जडले.







महाराष्ट्राला माहित असलेले गडकरी 'मास्तर' हे पहिले, त्यानंतर फक्त प्रधान 'मास्तर'च !)

पदवी आणि पदव्युत्तर विद्यार्थ्यांना अध्यापन हे प्रधानांचे या काळातले एक अंग तर पुणे विद्यापीठाची कार्यकारिणी (आणि इतर अनेक शाखा) यात बजावलेली कामगिरी हे तितकेच महत्त्वाचे दुसरे अंग. पुणे विद्यापीठाची शैक्षणिक उंची सतत वाढावी शिक्षण जास्तीत जास्त समाजाभिमुख व्हावे म्हणून प्रधानसर अतिशय दक्ष असत.

'संसदीय वाद पटु' ही त्यांची प्रतिमा पुणे विद्यापीठात काम करताना घडत गेली.

१९६६ मध्ये प्रधानसरांनी महाविद्यालयाचा सार्वजनिक कार्यासाठी निरोप घेतला. (ना. गोपाळ कृष्ण गोखल्यांपासून फर्ग्युसनची अशी परंपरा होतीच) १९६६ ते १९८४ अशी अठरा वर्षे ते शिक्षक मतदार-संघातून महाराष्ट्र विधान परिषदेवर प्रतिनिधित्व करीत राहिले. 'पुलोद' राजवटीत ते शिक्षणमंत्री होतील असे त्यांच्या चाहत्यांना वाटत होते. तो योग जुळून आला नाही. पण शेवटची दोन वर्षे 'विरोधी पक्षनेता' हे पद त्यांना मिळाल्यामुळे विधिमंडळातल्या त्यांच्या कार्याचा शेवट त्यांच्या योग्यतेला साजेसा झाला. अभ्यासूपणा, तळमळ आणि अभिजात सौजन्य यांमुळे प्रधानसरांची सर्वांवर छाप पडत असे.

प्रधानांच्या साहित्यसेवेचा उगम त्यांच्या समाजकार्यात आहे. लो. टिळक जन्मशताब्दीच्या वेळी (१९५६) प्रा. अ. के. भागवतांच्या सहकार्याने त्यांनी लोकमान्यांचे इंग्रजी चरित्र लिहिले. १९६५ च्या भारत पाक युद्धाच्या वेळी ते युद्धभूमीला भेट देऊन आले. त्यातल्या जिवंत अनुभवातून त्यांचे 'हाजीपीर' आकारास आले; तर १९७१ साली बांगला देशात संचार करून आल्यावर त्यांनी 'सोनार बांगला' लिहिले. आणीबाणीच्या काळात येरवडा तुरुंगात स्थानबद्ध असताना त्यांनी 'साता उत्तराची कहाणी' हे गाजलेले पुस्तक लिहिले. वैचारिकता आणि लालित्य यांचे एकत्र दर्शन त्यांच्या या पुस्तकातून घडते. 'साहित्य अकादमी'साठी त्यांनी 'आगरकर लेखसंग्रहाचे' संपादन केले तर Makers of Indian Literatureया साहित्य अकादमीच्या मालेसाठी त्यांनी 'साने गुरुजी' आणि 'राम गणेश गडकरी' यांची ओळख करून देणारी इंग्रजी पुस्तके लिहिली. 'भारतीय स्वातंत्र्यसंग्रामाचे महाभारत' हे त्यांचे पुस्तक म्हणजे तटस्थपणे पण सहृदयतेने इतिहास कसा लिहावा याचा आदर्शच होय. 'India's Freedom Struggle' 'An epic of Sacrifice and suferings' या इंग्रजी पुस्तकाच्या रूपाने त्यांनी भारतीय साहित्याला मौल्यवान देणगी दिली आहे यात शंका नाही.

साहित्य, राजकारण, समाजकारण यासंबंधी शेकडो लेख प्रधानसरांनी लिहिले. 'जनता' आणि 'साधना' च्या संपादनाची जबाबदारी त्यांनी समर्थपणे पेलली.

चर्चासत्रे, परिसंवाद, संमेलने यातली त्यांची उपस्थिती नेहमीच प्रेरक आणि आनंददायी असते. चर्चा कितीही भरकटलेली असो, तिला योग्य वळण लावून प्रभावी समारोप करावा तर तो प्रधानांनीच एवढे म्हटले तरी पुरे. मसापचे अध्यक्ष म्हणून १९८८ ते ९२ ही चार वर्षे त्यांच्या प्रेरक मार्गदर्शनामुळे आनंदात गेली.

पंचाहत्तरीच्या निमित्ताने ते निवृत्तीची भाषा बोलू लागले आहेत. पण त्यांच्यातला कार्यकर्ता त्यांना स्वस्थ बसू देणार नाही. त्यांना अभिवादन आणि हार्दिक शुभेच्छा ! □

ग. ना. जोगळेकर, मनीषा सोसायटी, कर्वेनगर, पुणे ४११ ०५२.

अनुक्रमणिका

डॉ. वि. रा. करन्दीकर

# चरित्रकार डॉ. गोखले आणि गांधीजींचे महामानवत्व

डॉ. द. न. गोखले हे एक साक्षेपी चरित्रकार म्हणून उभ्या महाराष्ट्राला परिचित आहेत. चरित्रलेखनाच्या खालोखाल त्यांना शिक्षण आणि व्याकरण या विषयांबद्दल आस्था आहे. शुद्धलेखनावर त्यांनी अगदी अलीकडे लिहिलेल्या पुस्तकाला त्यांच्या आधीच्या काही पुस्तकांप्रमाणे राज्यशासनाचा पुरस्कार मिळाला आहे. माध्यमिक शाळेतील शिक्षणाचा त्यांनी फार खोलवर विचार केलेला आहे. शासनाच्या अनेक समित्यांवर त्यांनी एक शिक्षणतज्ज्ञ म्हणून काम केले आहे. अमेरिकेतील शाळांची पाहणी करणाऱ्या समितीमधील एक सदस्य म्हणून त्यांची ऐन तरुण वयात निवड झाली होती. त्या अनुभवावर आधारलेले पाश्चात्त्य शिक्षणपद्धतीचा सांगोपांग परामर्श घेणारे एक पुस्तक त्यांनी लिहिले होते. त्यांच्या शिक्षणविषयक विचारांची जेवढी दखल घेतली जावयास हवी होती, तशी घेतली गेली नाही. आपल्याकडील शिक्षणक्षेत्रातील औदासिन्याचाही तो एक परिणाम असू शकेल. एक शिक्षक आणि शालाप्रमुख या त्यांच्या भूमिकांतील कार्याचा मात्र मान केला गेला आहे. त्या क्षेत्रातील राज्यशासनापासून तो केंद्रशासनापर्यंत असलेले सारे पुरस्कार त्यांना मिळाले आहेत. त्यांच्या चरित्रलेखनालाही तसेच यश लाभलेले आहे.

**चरित्रकार आणि विचारवंत**

गोखल्यांची आणखी एक प्रतिमा लोकांसमोर आहे. ती एक हिंदुत्ववादी विचारवंत अशी आहे. स्वातंत्र्यवीर सावरकरांच्या एकंदर हिंदुत्ववादी विचारांची एक सुसंगत आणि पद्धतशीर मांडणी त्यांनी एका स्वतंत्र पुस्तकात केली आहे. हिंदुत्ववादी विचारांचा त्यांनी एकूण जो पाठपुरावा केला तो सावरकरबंधूंवरील ग्रंथाच्या द्वारा. १९४८ साली राष्ट्रीय स्वयंसेवक संघावर बंदी आली, त्या वेळी त्यांनी कारावासही भोगला. आपल्या प्रसिद्धिपराङ्मुख स्वभावाला

---

*दि. २० सप्टेंबर १९९७ रोजी डॉ. द. न. गोखले वयाची ७५ वर्षे पूर्ण करीत आहेत. त्यांना अभिवादन आणि शुभेच्छा! या निमित्ताने त्यांनी केलेल्या एकूणच चरित्रलेखनाचा विशेषत: नुकतेच प्रकाशित झालेल्या 'गांधीजी मानव नि महामानव' या त्यांनी लिहिलेल्या व्यक्तिविमर्शपर ग्रंथाचा त्यांचे निकटवर्ती डॉ. वि. रा. करन्दीकर यांनी केलेले विस्तृत समालोचन वाचकांना निश्चितच उद्‌बोधक वाटेल आणि वाचक डॉ. द. न. गोखले यांचे एकूणच लेखन वाचण्यास उद्युक्त होतील असा विश्वास वाटतो.*

*संपादक*

---



अनुक्रमणिका

अनुसरून त्यांनी या गोष्टीचा कोणताही गाजावाजा केला नाही. त्या कारावासाच्या आधी ते संघाच्या कार्यात सक्रिय सहभागी होते. पण हा सारा कालखंड त्यांच्या वयाच्या पंचविशीच्या आतच समाप्त झाला. ते साऱ्या आयुष्यभर भारले गेले ते स्वातंत्र्यवीर सावरकरांनी केलेल्या हिंदुत्ववादी आणि राष्ट्रहितवर्धक विचारांच्या तेजस्वी आविष्कारामुळे. एक विलक्षण निर्भय, आणि जितका बुद्धिमान तितकाच प्रतिभावान क्रांतिकारक म्हणूनही सावरकरांनी त्यांच्या हृदयात ठाण मांडले. सावरकरांची ओजस्वी वाणी आणि प्रभावी लेखणी, त्याचबरोबर त्यांचा पुरोगामी सामाजिक विचार आणि विज्ञानवादी दृष्टिकोण हे भागही गोखल्यांच्या आदराचे विषय झाले.

गोखल्यांचा पिंड वैचारिक, आणि त्यांची मूळ प्रवृत्ती ज्ञानाची क्षितिजे धुंडाळण्याची आहे. या वैशिष्ट्यांचा विशेष परिपोष झाला तो त्यांनी डॉक्टरेटसाठी डॉक्टर केतकर हा विषय निवडला त्यामुळे. कोणत्याही विषयाचा अभ्यास करताना त्याच्या मुळाशी जाऊन भिडण्याची गोखल्यांची प्रवृत्ती आहे. मराठीतील पहिल्या-वहिल्या ज्ञानकोशरचनेच्या कार्याच्या निमित्ताने डॉ. केतकरांनी ज्ञानाच्या विविध क्षेत्रांचा शोध घेतला. त्यांच्या अफाट ज्ञानोपासनेला समाज-शास्त्राच्या अभ्यासाची व्यापक वैठक होती. त्यांच्या ज्ञानकोशाचे प्रस्तावनाखंड त्या दृष्टीने लक्षणीय आहेत. त्यांच्या साऱ्या लेखनाला वस्तुनिष्ठ निरीक्षण आणि तर्कशुद्ध प्रतिपादन यांची शिस्त होती. केतकरांच्या लेखनाचा अभ्यास केल्यामुळे तीच शिस्त गोखल्यांच्या लेखनात उतरली. त्यामुळे त्यांच्या लेखनाबद्दल महाराष्ट्राच्या बौद्धिक वर्तुळात एक दबदबा निर्माण झाला. स्फुट लेख असो वा एखादा ग्रंथ असो, गोखल्यांनी जे काही लिहिले असेल ते आपण गांभीर्याने घेतले पाहिजे, असा भाव अभ्यासकांच्या मनात उत्पन्न झाला. गोखल्यांनी एखादे विधान केले आहे, तेव्हा ते साधार आणि नेमके सत्य प्रकट करणारे असणार, असा विश्वास सर्वांना वाटतो. कोणाचा त्यांच्याशी मतभेद असेल, पण त्यांनी काढलेल्या कोणत्याही निष्कर्षा-मागे सखोल चिंतन उभे असणार, याबद्दल सर्वत्र एकमत आढळते. लिहिल्या जाणाऱ्या प्रत्येक शब्दाबद्दल असा सार्वत्रिक विश्वास निर्माण होणे ही सामान्य गोष्ट नाही. त्यांची हिंदुत्ववादी दृष्टी पूर्ण माहीत असली, तरी त्यांच्या लेखनाकडे कानाडोळा करावा, असे कधी मानले गेले नाही.



मानव नि
महामानव

राजकारण ही गोष्ट गोखल्यांच्या प्रकृतीला मानवणारी नाही. किंबहुना त्यांच्याशी होणाऱ्या गप्पा-गोष्टीमध्ये प्रचलित राजकारणावर ते हिरीरीने बोलतात, असा अनुभव सहसा येत नाही. आयुष्याच्या प्रारंभी जो अल्पकाळचा कारावास त्यांच्या वाट्याला आला, तो त्या वेळच्या



अनुक्रमणिका

## डॉ. दत्तात्रय नरसिंह गोखले : संक्षिप्त परिचय

जन्म : विरवाडी जि. कुलाबा-रायगड, दि. २० सप्टेंबर १९२२

शिक्षण : यवत जि. पुणे, धुळे, कुरुंदवाड, सांगली, पुणे या गावी.

१. मॅट्रिक, १९४०, मुंबई विद्यापीठ, सीताबाई पटवर्धन हायस्कूल, कुरुंदवाड, शाळेत १ ले.

२. बी. ए. ऑनर्स, १९४४, मुंबई विद्यापीठ, विलिंग्डन महाविद्यालय, सांगली.

३. पीएच. डी. १९५२, प्रबंधाला न. चिं. केळकर पारितोषिक.

४. बी. टी. १९५३, टिळक कॉलेज ऑफ एज्यु., ५. डी. लिट, १९९४, पुणे विद्यापीठ.

६. विविध शैक्षणिक संस्थांत अनेक वर्षे अध्यापनाचे कार्य डेक्कन एग्युकेशन सोसायटीचे आजीव सदस्य १९५५ ते १९८२

**ग्रंथलेखन**

१. क्रांतिवीर बाबाराव सावरकर, २. ज्ञानकोशकार डॉ. केतकर (मुलांसाठी लघुचरित्रे), ३. डॉ. केतकरांच्या कादंबऱ्या, ४. डॉ. केतकर (चरित्र), ५. अमेरिकेतील माध्यमिक शाळा (प्रबंध), ६. Reform of Examinations, ७. परीक्षांची सुधारणा, ८. डॉ. पटवर्धन ऊर्फ माधव जूलियन, ९. एका चरित्राचे चरित्र (साहित्य समीक्षा), १०. स्वातंत्र्यवीर सावरकर : एक रहस्य-व्यक्तिविमर्शणात्मक ग्रंथ, ११. शुद्धलेखन विवेक-शास्त्रविवरण, १२. गांधीजी : मानव नि महामानव.

**ग्रंथ संपादन**

१. गाळीव रत्ने - चिं. वि. जोशी, २. दुधाच्या धारा-य. गो. जोशी, ३. कमल फुले-साने गुरूजी (विद्यार्थ्यांसाठी पुरवणी-वाचन), ४. प्रा. रा. श्री. जोग गौरव-ग्रंथ, ५. समग्र माधव जूलियन, ६.'हिंदुत्व दर्शन' -वि. दा. सावरकर (हिंदुत्व-विषयक विचारांचे सारसंपादन), ७. वाङ्मय-विमर्श - प्रा. रा. श्री. जोग यांच्या लेखांचा संग्रह.

**ठळक विशेष**

१. डॉ. केतकर-विषयक प्रबंधमाला १९५२ मध्ये पुणे विद्यापीठांत न. चिं. केळकर पारितोषिक.

२. बी. टी. ला १९५३ मध्ये पुणे विद्यापीठांत १ ल्या वर्गात १ ला क्रमांक.

३. 'डॉ. केतकर' या चरित्राला पुणे-विद्यापीठाचे प्रकाशन साहाय्य. राज्याचा 'चरित्र व आत्मचरित्र' या विभागाचा रु. २,०००/- चा पहिला पुरस्कार, एप्रिल १९६०.

४. महाराष्ट्र सकारच्या 'ग्रँट इन एड फॉर स्कूल्स ॲण्ड कॉलेजिस' सुधारण्यासाठी नेमलेल्या समितीचे सदस्यत्व, १९६०-६१.

५. अमेरिकी सरकारच्या 'टीचर डेव्हलपमेंट प्रोग्रॅम' मध्ये फुलब्राईट शिष्यवृत्ती, हारवर्ड विद्यापीठात अभ्यास, अमेरिकेतील माध्यमिक शाळांचे निरीक्षण, १९६१-६२.

६. 'डॉ. केतकर' या चरित्राला साहित्य अकादमीने १९५८ ते १९६१ या तीन वर्षांतील मराठी-मधील सर्वश्रेष्ठ ग्रंथ ठरविला. त्याला पारितोषिक, मार्च १९६२.

७. भूतपूर्व शालान्त-परीक्षा-मंडळ, पुणे महाराष्ट्र राज्य, या संस्थेचे सदस्यत्व.

८. 'नॅशनल कौन्सिल फॉर एज्युकेशन रीसर्च ॲण्ड ट्रेनिंग' (NCERT) या मंडळाचे सदस्यत्व, एप्रिल १९७० ते जून १९७२.

९. माध्यमिक शिक्षकांना गुणवत्तेसाठी मिळणारा राष्ट्रीय पुरस्कार 'नॅशनल ॲवॉर्ड', नोव्हें. ६९.



अनुक्रमणिका

१०. 'डॉ. पटवर्धन ऊर्फ माधव जूलियन' या चरित्र-ग्रंथाला १९७८ चे केळकर-पारितोषिक.
११. 'डॉ. केतकर' हे पुस्तक मुंबई, पुणे, नागपूर, कोल्हापूर, वगैरे विद्यापीठांत चरित्र-वाङ्मयाच्या अभ्यासासाठी बी. ए. च्या अभ्यासक्रमात समाविष्ट.
१२. 'डॉ. पटवर्धन ऊर्फ माधव जूलियन' या चरित्र-गंथाला साहित्यसंस्कृति-मंडळाचे प्रकाशन साह्य, चरित्र व आत्मचरित्र या विभागातील राज्यपुरस्कार, जानेवारी १९८३.
१३. 'एका चरित्राचे चरित्र' या समीक्षा-गंथाला महाराष्ट्र-साहित्य-परिषदेचे समीक्षा-विभागाचे पारितोषिक, १९८५.
१४. 'स्वातंत्र्यवीर सावरकर : एक रहस्य' या व्यक्तिविमर्षणात्मक ग्रंथाला इचलकरंजी ट्रस्टचे पारितोषिक, १९८९, महाराष्ट्र साहित्य परिषदेचे 'उत्कृष्ट वैचारिक ग्रंथाचे पारितोषिक', १९८९, महाराष्ट्र राज्य शासन, विशेष पारितोषिक, १९९२.
१५. 'महाराष्ट्र गौरव' पुरस्कार, महाराष्ट्र राज्य शासन, १९९०-साहित्य अकादमीच्या पारितोषिकासाठी.
१६. 'ब्रह्मचारी विश्वनाथजी' पुरस्कार, हिंदुत्व विषयक लेखनासाठी, १९९०.
१७. 'शुद्धलेखनविवेक' या पुस्तकाला १९९३ चे मराठी अभ्यास परिषदेचे पारितोषिक, म. रा. शासन १९९३-९४ चा पुरस्कार, म. साहित्य परिषद, १९९३ मधील 'उत्कृष्ट' ललितेत वैचारिक ग्रंथपारितोषिक.
१८. पुणे मराठी ग्रंथालय, 'मराठी साहित्य क्षेत्रातील महनीय' कार्याबद्दल गौरव व पुरस्कार.
१९. म. सा. परिषद, 'गांधीजी : मानव नि महामानव' १९९६ या वर्षातील उत्कृष्ट ललितेत्तर वैचारिक ग्रंथ', 'लोकहितवादी देशमुख पारितोषिक'.

राष्ट्रपती डॉ. राधाकृष्णन यांचे हस्ते साहित्य ॲकॅडमी पुरस्कार स्वीकारताना डॉ. द. न. गोखले



परिस्थितीचा एक अटळ असा परिणाम होता. त्यातील राजकारणाचा भाग त्यांच्या मनाला तसा चिकटला नाही. त्यानंतरच्या कोणत्याही राजकीय चळवळीशी त्यांचा अप्रत्यक्ष संपर्कही आला नाही. एवढा अंधकारपूर्ण असा आणीबाणीचा कालखंड या देशात स्वातंत्र्यानंतर येऊन गेला, पण ते सारे काही अलिप्तपणे पहात गोखले स्वस्थचित्त होते. हिंदुत्ववादी विचारांची कास मात्र त्यांनी कधी सोडली नाही. तो विचार सुव्यवस्थितपणे मांडण्याचे काम त्यांनी प्रसंगवशात केले. त्या त्यांच्या कार्याची पावतीही त्यांना उतरत्या वयात मिळाली. त्या क्षेत्रातील वैचारिक कार्यावद्दल अलीकडेच त्यांचा विशेष गौरव करण्यात आला.

पंचविशीपासूनचे पुढचे सारे आयुष्य गोखल्यांनी डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या विविध संस्थांत कार्य करण्यात घालवले. शिक्षक हा उगवत्या पिढीचा शिल्पकार असतो. पण हे भाग्य त्याला ओळखता यावे लागते, तरच तसा शिल्पकार होता येते. त्यासही नुसते यशस्वी शिक्षक होणे पुरेसे नसते, तर ज्ञानाच्या उपासनेचे व्रत घ्यावे लागते. गोखल्यांनी हे व्रत आयुष्यभर निष्ठने चालवले आणि आपल्या अभ्यासाचे फळ ग्रंथरूपाने समाजासमोर ठेवले. येत्या एक सप्टेंबरला ते आपल्या वयाची पंचाहत्तर वर्षे पूर्ण करीत आहेत. दुर्दैवाची घटना अशी की; वयाची साठ वर्षे पूर्ण होत असता असता, आणि निवृत्तीनंतरचा काळ सर्वस्वाने आपल्या आवडत्या व्यासंगाकडे देता येईल असे समोर दिसत असताना, त्यांना अर्धांगवायूचा सौम्य झटका आला. वाकी सारे कालांतराने ठीक झाले, पण वोलण्यात दोष राहिला, व शव्दोच्चार अस्पष्ट झाले. त्यामुळे व्याख्यान देणे हे क्षेत्र त्यांना वंद झाले. जिज्ञासू श्रोतृवर्गाची ही फार मोठी हानी झाली. काही वर्षे उलटली, आणि त्यांना हृदयविकाराचा थोडासा त्रास झाला. शरिराला दुर्वलता आली. पण या आघातांमुळे गोखले थोडेसेही नाउमेद झाले नाहीत. भावनेच्या थोडेसेही आहारी न जाणाऱ्या व्यक्तीमध्ये कधीकधी वृत्तीचा कोरडेपणा येतो. पण त्याचाच एक परिणाम म्हणून एक तटस्थ व अलिप्त भावही उत्पन्न होतो. त्याच अलिप्तपणाने गोखल्यांनी या शारीर मर्यादांचा अतिशय शांतपणाने स्वीकार केला. मन खंवीर होते, आणि बुद्धीची क्षमता जशीच्या तशी होती. व्याधिग्रस्त अवस्थेतही गेली पंधरा वर्षे त्यांचे वाचन, चिंतन, आणि लेखन सतत चालू आहे, ही गोष्ट त्यांना अतिशय भूषणास्पद आहे.

**चरित्राकडून व्यक्तिविमर्शाकडे**

गोखल्यांनी पहिले चरित्र लिहिले ते क्रांतिवीर वावाराव सावरकरांचे. त्या वेळी त्यांचे वय केवळ तेवीसचोवीस वर्षांचे होते. आपल्या आयुष्याच्या अखेरच्या कालखंडात वावाराव सांगलीला येऊन राहिले होते, आणि गोखले सांगलीलीच असल्यामुळे त्यांना त्यांचा सहवास मिळाला, वराचसा संवादही करता आला. वावारावांसारख्या ध्येयवादी देशभक्ताने अंदमानच्या कारावासात ज्या अपार यातना भोगल्याचे ऐकले होते, त्यामुळे गोखल्यांचे तरुण मन थरारून गेले. तरीही केवळ त्या थरारलेपणात तृप्त राहून केवळ भावुकपणाने त्यांनी ते चरित्र लिहिले नाही. आपल्या असीम आदरभावनेला त्यांनी साक्षेपी अभ्यासाची जोड दिली. गोखल्यांचा पिंड भावनाशीलतेचा नाही. पण वावारावांच्या असामान्य त्यागपूर्ण जीवनाने त्यांच्या मनाला कोठेतरी स्पर्श केला होता. त्या चरित्रातील काही भाग लिहिताना त्यांच्या शरिरावर खचितच रोमांच उभे राहिले असतील. ते तसे रहावयास हवेतच. त्याशिवाय तद्रूपता किंवा समरसता

कशी प्राप्त होईल ? पण हे सारे खरे असले, तरी चरित्राचे लेखन करताना त्यातील हरएक तपशील त्यांनी सत्याच्या कसोटीवर पारखून घेतला होता. भावनेच्या आवेगात वाहून जाऊन शब्दांचे बुडबुडे निर्माण करणे हे गोखल्यांच्या प्रवृत्तीत नाही.

सत्याचा शोध हा गोखल्यांनी लिहिलेल्या साऱ्या चरित्रांचा गाभा आहे. मानवी जीवनातील सत्य हे नाना रूपे घेऊन प्रकट होते. त्या त्या विशिष्ट व्यक्तिमत्त्वांशी त्यांचा संबंध असतो. गोखले हे जाणून आहेत. त्यामुळे अगदी निरनिराळ्या प्रकारच्या व्यक्तिमत्त्वांना ते न्याय देऊ शकले. डॉ. केतकर हे त्यानंतर गोखल्यांच्या समोर आलेले एक अगदी वेगळ्या मुशीतील व्यक्तिमत्त्व. त्यांच्या कादंबऱ्याही समाजशास्त्रातील तपशिलांमध्ये भिजून चिंब होऊन उभ्या राहिल्या. त्या कादंबऱ्या मानवी जीवनाची अगदी निराळी क्षितिजे खुली करणाऱ्या ठरल्या. पण त्यांना लालित्याचा स्पर्श फार कमी होता. ऐन तरुण वयातील स्त्रीपुरुषांमध्ये परस्परांविषयी जे आकर्षण निर्माण होते, त्या नवथर प्रेमातील प्रसंग केतकरांच्या लेखणीतून उतरताना आपले सारे माधुर्य हरवून बसतात आणि ओबडधोबड रूप घेऊन समोर येतात. पण अशा या शास्त्राभ्यासजड केतकरांचे गोखल्यांनी जे चरित्र लिहिले, ते जितके वास्तव तितकेच जिवंत आणि नाट्यपूर्ण उतरले. त्यांनी लिहिलेले हे दुसरेच चरित्र होते, पण ते त्यांना साहित्य अकादमीचा पुरस्कार देऊन गेले. एक समर्थ चरित्रकार म्हणून गोखल्यांचे नाव सर्वत्र पोहचले.

कविवर्य माधव जूलियन हे आपल्या समाजाच्या तत्कालीन मनोवृत्तीला आकलन न होणारं असे एक व्यक्तिमत्त्व. जितके हळवे तितकेच उत्कट. एकीकडे त्यांच्या बाजूने प्लेटॉनिक प्रेमात पडणारे, आणि दुसरीकडे स्वत:तच हरवून बसणारे. पाश्चात्य जगात अशा व्यक्तिमत्त्वाचे आकर्षण वाटले असते, समाजाने त्या व्यक्तीला समजूनही घेतले असते. माधवरावांच्या नशिबी मात्र केवळ मनस्ताप, जननिंदा, आणि दारुण अपेक्षाभंग यांचे आघात आले. त्यांनी या मनस्वी आणि भाववेड्या कवीच्या व्याकुळ मनाचा खोलवर जाऊन शोध घेतला, आणि त्यातून मराठीतील एक आगळेवेगळे चरित्र निर्माण झाले. हा एक मानसशास्त्रीय शोध होता. त्यात सूक्ष्म आणि तरल अशा भावनांच्या विलसिताची एक विलक्षण गुंतागुंत होती. तिची उकल आपण कसकशी करीत गेलो यावर गोखल्यांनी प्रकाश टाकला, आणि त्यातून साहित्यनिर्मितीच्या प्रक्रियेशी संबंधित असे 'एका चरित्राचे चरित्र' हे त्यांचे पुस्तक लिहिले गेले. माणसाच्या हळूवार मनाची स्पंदने किती विविधरंगी असतात, आणि ती कशी संमिश्र व क्वचित परस्परविरोधी असतात, यांचे अतिशय नेटके भान माधव जूलियन यांच्या या चरित्रात दिसते.

येथून गोखल्यांच्या लेखनात केवळ घटना किंवा प्रसंग यांच्या वर्णनापेक्षा व्यक्तिमत्त्वाच्या विश्लेषणाला अधिक महत्त्व प्राप्त झाले. 'स्वातंत्र्यवीर सावरकर : एक रहस्य' हा त्यांचा यानंतरचा ग्रंथ या स्वरूपाचा आहे. सावरकरांचे विचार, व्यक्तिमत्त्व, त्यांचे अनेक क्षेत्रांतील कार्य, आणि या साऱ्यातील त्यांचे यशापयश, यांची सखोल मीमांसा या ग्रंथात आहे. स्वातंत्र्यवीर सावरकर गोखल्यांना एक ज्वलंत देशभक्त आणि महान कर्तृत्ववान व्यक्तिमत्त्व म्हणून विशेष प्रिय आहेत. त्यांच्यावर लिहिलेल्या एका लेखाला त्यांनी 'सूर्यबिंबाचा शोध' असे शीर्षक दिले आहे. सूर्य स्वयंप्रकाश असतो. सावरकरांची प्रज्ञा, प्रतिभा, देशभक्ती, आणि

झुंझार वृत्ती त्यांची स्वत:ची होती, जणू स्वयंभू होती. पण अशा या स्वयमेव मृगेन्द्र असलेल्या सावरकरांच्या मानसिकतेतील उण्या अधिकाचा शोध गोखल्यांनी समतोलपणाने घेतला आहे. चरित्रापेक्षा व्यक्तिविमर्शाकडे आपण अधिक वळलो आहोत, हेही त्यांनी येथे जाणले आहे. त्यामुळे 'गांधीजी' या त्यांच्या अगदी अलीकडे प्रसिद्ध झालेल्या ग्रंथाच्या प्रस्तावनेत चरित्र आणि व्यक्तिविमर्श यांचे भिन्न स्वरूप त्यांनी सविस्तर स्पष्ट केले आहे. प्रस्तावनेचा उत्तरार्ध आत्मनिवेदनाचा आहे, आणि त्यात त्यांनी आपली वैचारिक भूमिका स्पष्ट केली आहे. ती अतिशय मोलाची आहे. व्यक्ति आणि समाज यांच्या जीवनातील विविध स्थित्यंतराकडे वास्तव आणि बुद्धिवादी दृष्टीने कसे पहावे, यांचे सुस्पष्ट आणि सुरेख दर्शन तेथे घडते. ती मुळातूनच वाचली पाहिजे.

### खटाटोप आणि काही शब्द

गांधीजींवरील हा ग्रंथ लिहिण्याचा हेतू सांगताना गोखल्यांनी म्हटले आहे, 'प्रस्तुत व्यक्तिविमर्श म्हणजे एक नम्र खटाटोप आहे.' गांधीजींच्या चरित्रातील 'घटनांची नवी नाती' आपण शोधणार आहोत, आणि 'त्यातून स्वत:ला भावलेले व्यक्तित्वाचे वेगळे दर्शन' घडवण्याचा 'खटाटोप' करणार आहोत, असे त्याआधी गोखल्यांनी म्हटले आहे. हे सारे सांगत असताना प्रयत्न हा शब्द न योजता खटाटोप हा शब्द त्यांनी टाकला आहे. खटाटोप याचा अर्थ व्यर्थ धडपड असा होतो. ही शब्दयोजना म्हणजे गोखल्यांची नम्रता आहे. तीवर भरवसा ठेवून आपण या ग्रंथाकडे पाहू नये, आणि कोणी पाहणारही नाही. हा एक समर्थ प्रयत्न असणार असे त्यांच्या आजवरच्या लौकिकामुळे आपल्या मनात येते आणि ग्रंथ वाचून संपल्यावर आपला तर्क खरा ठरल्याचे समाधान आपल्याला मिळते. गोखल्यांनी केलेला कोणताही प्रयत्न वृथा कसा ठरेल? केवळ एक चरित्रलेखक किंवा व्यक्तिविमर्शक एवढीच त्यांची भूमिका या ग्रंथामुळे आपल्यासमोर येते असे होत नाही. निरनिराळ्या घटनांवर त्यांनी प्रसंगोपात जे भाष्य केले आहे, ते वाचताना एक समतोल आणि चिंतनशील विचारवंत अशी त्यांची प्रतिमा साकार होते. त्यांचे प्रांरभीचे आत्मनिवेदन या दृष्टीने पुरेसे बोलके आहे.

गोखल्यांची शैली सर्वपरिचित आहे. आपले हरएक विधान साधार आणि वस्तुनिष्ठ असावयास हवे, असा त्यांचा कटाक्ष असतो. आपल्याला अभिप्रेत असलेला आशय नेमकेपणाने व्यक्त व्हावा, यासाठी योग्य शब्दांची योजना करण्यात ते दक्ष असतात. कोणताही पाल्हाळ, शब्दवंबाळ विवेचन, किंवा काव्यात्मतेच्या पोटी होणारी अतिशयोक्ती, यांचा स्पर्श त्यांच्या लेखनाला नसतो. अधूनमधून सुंदर आणि अर्थगर्भ अशी छोटीछोटी वाक्ये भेटत राहतात. गोखल्यांच्या शैलीत लालित्याचा अंश तुलनेने कमी आहे, पण त्यामुळे त्यांचे विवेचन कोरडे होते असे घडत नाही. समर्पक आधार आणि तर्कसंगत मांडणी यांच्या आधारावर चालणाऱ्या विचार परिप्लूत लेखनाला त्याची अशी एक शोभा असते. तिचे दर्शन गोखल्यांच्या लेखनात घडते. नावेतून चाललो असताना आपण पुढेपुढे जात आहोत हे संथ अशा गतिमुळे ध्यानात येऊ नये, त्याप्रमाणे गोखल्यांच्या प्रवाही शैलीतील विवेचनाचे वोट धरून विषयाच्या अंतरंगात प्रवेश करताना आपली स्थिती होते. पानांमागून पाने केव्हा उलटली जातात ते कळतही नाही. विषयाच्या तपशिलांवरील पकड, त्यातील परस्परसंबंधाचे मार्मिक भाव, आणि नेमकेपणाने

केलेले नेटकं प्रतिपादन, यांची प्रचीती येत राहते. एक उच्च दर्जाचा बौद्धिक आनंद आपल्याला मिळतो. 'चिकित्सा तटस्थ आणि विश्लेषक हवी' असे त्यांनी प्रस्तावनेत म्हटले आहे. गोखल्यांनी केलेली चिकित्सा तशी आहे.

या प्रयत्नाला थोडेसे गालबोट लागले आहे, असे वाटून जाते. गांधीजींच्या 'व्यक्तित्वाची मूलद्रव्ये' तपासताना किंवा त्यांच्या गुणसंपदेचे वर्णन करताना गोखले एकेक घटक आणि गुण घेतात आणि त्याचे गांधीजींच्या जीवनात घडणारे दर्शन समोर ठेवतात. हे सारे विवेचन निरनिराळ्या तपशिलांच्या आधाराने सुटेसुटे होत जाते. यादीतला एकेक मुद्दा स्पष्ट करावा तसा भास होतो. अशा पद्धतीने केलेल्या विवेचनामुळे व्यक्तित्वाचे समग्र, एकसंध, आणि परस्परसंबद्ध चित्र उभे राहण्यात अडथळा उत्पन्न होतो. त्यातील जिवंतपणा कमी होतो. गुलाबाची एकेक पाकळी वेगळी केली, मोठी कोणती व लहान कोणती याचे मोजमाप घेतले, त्यातील पराग वेगवेगळे केले, पाकळ्यांचा रंग आणि परागातील सुगंध वेगवेगळा स्पष्ट केला; तर गुलाबाचे सारे भाग अलग अलग डोळ्यांसमोर येतात, आणि या सर्वांचा मिळून गुलाब झाला आहे हे समजते. पण असे केल्याने गुलाबाचे रूप आणि सौन्दर्य यांची प्रचीती येत नाही, त्यातील चैतन्य हरपल्यासारखे होते. 'व्यक्तित्वाची मूलद्रव्ये' आणि 'व्यक्तित्वाचा परिघ' ही प्रकरणे विस्कळित झाली आहेत की काय, अशी शंका अशा काही कारणांमुळे गोखल्यांना स्वत:लाच प्रस्तावनेत व्यक्त करावी लागली आहे.

खटाटोप हा शब्द गोखल्यांच्या लेखणीतून नम्रतेच्या पोटी उतरला. पण तो खटाटोप काही शब्दांच्या योजनेत डोकावून गेला आहे. त्यांचा अर्थ कळतो, पण मन थोडे थबकते. भावभुक्ती असा शब्द त्यांनी योजला आहे. भुक्ती याचा अर्थ भोग असा आहे, आणि तो ऐंन्द्रिय प्रक्रियेशी अधिक संबंधित आहे. भावास्वाद किंवा भावानुभव हे शब्द मानसिक पातळीवर पोचणारे आहेत, आणि ते अर्थपूर्ण आहेत. 'सौन्दर्य चाखण्यात' असा शब्दप्रयोग त्यांनी केला आहे. सौंदर्याचा आस्वाद किंवा सौंदर्याची अनुभूती घेण्यात हे शब्द आशयातील सौंदर्याला अधिक जवळचे झाले असते. 'सौंदर्यसेवन' हेही चाखण्याशी जवळ येते. याच धर्तीवर आपली भूमिका स्पष्ट करताना 'सौंदर्यसेवन' असा शब्द गोखले टाकतात, तो तर थेट सौंदर्याची नोकरी करण्याकडे किंवा त्याची सेवा करण्याकडे त्यांना नेऊन पोचवतो. सत्य किंवा वस्तुस्थिती 'हुडकणे' यापेक्षा शोधणे म्हणणे अधिक बरे वाटते. ऊर्जा हा आणखी एक शब्द. त्याचा अनेक वेळा उपयोग केलेला आहे, त्यामुळे आपले मन त्याच्या अर्थाशी जुळवून घेते. मॅटर आणि एनर्जी या इंग्रजी शब्दांना प्रतिशब्द म्हणून द्रव्य आणि ऊर्जा हे शब्द वापरले जातात. ऊर्जा म्हणजे शक्ती. पण तो शब्द जड पदार्थांच्या संदर्भात योग्य आहे. माणसाच्या संदर्भात तो योग्य वाटत नाही. 'महापुरुषांच्या ठायी अपार सामर्थ्य असते' असे म्हणणे हे वाचकाला सहजपणे अर्थबोध होण्याच्या दृष्टीने योग्य झाले असते.

शब्दांच्या योजनेचा हा भाग याहूनही थोडा पुढे नेता येतो. 'मानवता अंतत: एकच असल्यामुळे या मूलद्रव्यात फारसा फरक पडत नाही'. असे एक वाक्य 'व्यक्तित्वाची मूलद्रव्ये' या प्रकरणाच्या सुरुवातीलाच आले आहे (पृष्ठ १०६). मानवता या शब्दाचा रुढ अर्थ फार वेगळा आहे. मानवता हाच अखेर खरा धर्म आहे, अशा प्रकारच्या वाक्यात तो शब्द येतो.

माणुसकी किंवा माणूसपण हे साधे शब्दही त्याच दिशेने जातात. अखेर मनुष्यत्व कशात आहे असा प्रश्न केला जातो, तेव्हा तेथे ही मानवता अभिप्रेत असते. त्या शब्दाच्या अर्थाला उदात्ततेचा काही स्पर्श आहे. त्या शब्दाचा हा रूढ अर्थ गोखल्यांनी बाजूला ठेवलेला दिसतो. मनुष्याच्या ठिकाणी काही मूलभूत प्रवृत्ती असतात. सामान्य माणसांच्या वागण्यात त्यांना प्राप्त होणारे रूप, आणि महापुरुषांच्या जीवनात त्यांचा होणारा आविष्कार, यात फरक पडतो; असे म्हणणे अधिक इष्ट झाले असते. त्यांना हेच अभिप्रेत आहे हे आपल्याला समजते. मानवता हा शब्द टाकताना कदाचित त्यांचे अनवधान झाले असावे. 'व्यक्तित्वाचा परिघ' असे एका प्रकरणाचे शीर्षक आहे. ते वाचताच गांधीजींच्या व्यक्तिमत्वाची व्यापकता हा विषय येईल असे वाटते. कारण वर्तुळाचा मध्यविंदू त्याचे केन्द्र दाखवतो, तर त्याचा परिघ विस्ताराकडे घेऊन जातो. पण गोखल्यांनी परिघ या शब्दाचा हा अर्थ घेतलेला नाही. मध्यबिंदू म्हणजे गाभा तर परिघ म्हणजे वर्तुळाची कड, आणि म्हणून गाभ्यापासून दूर असणारे व्यक्तित्वाचे अंश असे अर्थ त्यांनी घेतले आहेत. त्यांनी हे आरंभीच स्पष्ट केले आहे हे मात्र खरे (पृष्ठ २५४).

गांधीजींच्या व्यक्तित्वातील मूलद्रव्यांची मीमांसा करताना 'त्यांची विज्ञानवादी आधुनिकता आणि अध्यात्मवादी सनातनीपणा ही त्यांच्या व्यक्तित्वात एकरूप झाली होती ', असे विधान गोखल्यांनी केले आहे. त्यांनीच केलेल्या विवेचनावर सामग्र्याने दृष्टी टाकली, तर गांधीजींना विज्ञानवादी म्हणणे अवघड आहे. त्याचबरोबर अस्पृश्यता हा कलंक मानणाऱ्या गांधीजींना सनातनी म्हणणेही तितकेच कठीण आहे. अध्यात्मवादी आणि सनातनीपणा हे दोन शब्द एकत्रित आणता येत नाहीत. सनातनीपणा हा शास्त्रप्रामाण्याशी व कालबाह्य रूढी वा कर्मकाण्ड यांच्याशी संबंधित आहे. धार्मिकता आणि आध्यात्मिकता या दोन्हींत फरक आहे. सारी धार्मिकता मागे टाकल्यावर म्हणजे तिच्या अतीत पोचल्यावर आध्यात्मिकतेशी पोचता येते. आध्यात्मिकता ही मनाची एक विशिष्ट धारणा आहे, तिची पातळी उदात्ततेच्या प्रदेशातील आहे, आणि ज्ञानाच्या वळावर ती विश्वव्यापक शक्तीशी अनुसंधान ठेवणारी आहे. सनातनीपनाची चौकट बंदिस्त असते आणि ती संकुचित राहते, तर आध्यात्मिकता लवचिक असते आणि ती अंतिम व्यापकतेशी पोचते. त्या दोहींतील हा मूलभूत भेद ध्यानात घेतला, तर ते दोन शब्द एकत्रित योजता येणार नाहीत.

शब्दांचे जे अर्थ घेतले जातात, त्यातून अखेर सिद्धांत सूचित होतो. अर्थ निराळे केले तर सिद्धांताचे स्वरूप बदलते. 'जर परमेश्वर सर्वव्यापक असेल, तर तो जसा सत्यात तसाच असत्यातही असणारच' असे गोखल्यांनी म्हटले आहे. पण गांधीजी सत्य आणि परमेश्वर एकरूप मानतात, तेव्हा त्यांची व्याख्या अव्यापक ठरते, असा निष्कर्ष गोखले काढतात (पृष्ठ १७८) त्यांचा हा युक्तिवाद तत्वज्ञानातील परिभाषेशी सुसंगत नाही. विश्वव्यापक असे जे अंतिम तत्त्व मानले जाते, त्याला सत्य म्हणतात हे खरे आहे. पण ते तत्त्व सत्य आणि असत्य या द्वंद्वाशी संबंधित नसते, तर ते स्वरूपत: असणारे असे असत्यनिरपेक्ष सत्य असते. सत्यअसत्य ही व्यवहारातील भाषा द्वंद्वाची आहे, आणि सारे विश्व हे द्वंद्वात्मक आहे. विश्वव्यापक तत्त्व या साऱ्या द्वंद्वाच्या अतीत आणि त्यांना अधिष्ठानभूत असते, म्हणून ते निर्द्वंद्व मानले गेले आहे.

हा सारा विषय वेगळा आहे. त्याचा अधिक विस्तार करण्याची ही जागा नव्हे. पण अध्यात्मातील मूलभूत संकल्पना नीट ध्यानात घेतल्या नाहीत, तर गोखल्यांनी काढले आहेत तसे निष्कर्ष निघू शकतात. पण तेवढ्यावर ते बरोबर ठरतात असे नाही. ' To see God face to face' किंवा ' To lay his weary head in the lat of the Maker' म्हणजे ईश्वराला समोरासमोर पाहणे किंवा आपले श्रांत मस्तक त्या विश्वनिर्मात्याच्या मांडीवर ठेवणे, या गांधीजींच्या उदगारांचा आधार घेऊन त्यांचा देव देहधारी होता असा निष्कर्ष गोखल्यांनी काढला आहे (पृष्ठ १७८-७९) तो बरोबर नाही एवढेच म्हणून विस्तारभयास्तव येथे थांबावयास हवे. गांधीजींच्या उपयुक्त उदगारांचा अर्थ विश्वव्यापक शक्तीशी आपले असलेले नाते आणि तिचे सान्निध्य सुस्पष्टपणे जाणवणे असा आहे. 'गांधीजींचा देव नेमका अमूर्त आहे की मूर्त आहे हे कळेनासे होते.' असे गोखल्यांनी येथेच म्हणून ठेवले आहे एवढे मात्र बरे आहे.

**महामानव आणि आत्मप्रस्थापना**

व्यक्तित्वाच्या मूलद्रव्यांची तपासणी करताना गोखले आत्मप्रस्थापनेपासून प्रारंभ करतात. सर्व कर्तृत्ववान पुरुषांच्या ठायी हा गुण असतो, असे त्यांनी म्हटले आहे ते योग्य आहे. पण असे म्हणावेसे वाटते की, महामानव याला अपवाद असतात. आपल्या ठिकाणी असणाऱ्या नैसर्गिक प्रवृत्तींना आळा घालण्यात म्हणजे संयमात, त्यांना वळण लावण्यात म्हणजे विवेकात, माणसाची चांगुलपणाकडे वाटचाल होत असते, आणि तीच अखेर श्रेष्ठत्वाच्या मुक्कामाशी पोचते. स्वार्थ ही एक सार्वत्रिक प्रवृत्ती आहे. तिला आवर घालणे, अधिक अधिक निस्वार्थ होत जाणे, आणि अखेर स्वार्थाचा अंशही न राहता निस्वार्थ वृत्ती हेच माणसाचे स्वरूप होऊन जाणे अशा या एकाहून एक वरच्या पायऱ्या आहेत. यांतील अखेरच्या पायरीवर पोचलेल्या माणसाला संयम वा विवेक यांचा आश्रय घ्यावाच लागत नाही. संयमी आणि विवेकी असणे हे त्याचे स्वरूप होऊन गेलेले असते. ध्येयाच्या सिद्धीसाठी सर्वस्वाचा त्याग करणारे महापुरुष जे काही करतात, त्याचे वर्णन आत्मप्रस्थापना या शब्दाने केले, तर ते त्यांच्या श्रेष्ठत्वाला उणेपणा आणणारे ठरेल.

सामान्य माणसाला कोणत्या ना कोणत्या मार्गाने आपण कोणीतरी आहोत हे दाखवावेसे वाटते किंवा महत्त्वाकांक्षी पुरुषांना एखाद्या क्षेत्रात आपल्या कर्तृत्वाची मुद्रा उमटवावीशी वाटते. याचे वर्णन आत्मप्रस्थापना या शब्दाने करता येते. पण सॉक्रटिसचे संवादातील उदगार, आइनस्टाइनचे प्रयोगशाळेतील संशोधन, किंवा ज्ञानदेवांसारख्या साक्षात्कारी पुरुषांची समाज-सन्मुखता, यांना आत्मप्रस्थापना म्हणणे हे सामान्य माणसाचे मोजमाप घेण्यासाठी उपयोगी पडणारी फूटपट्टी असामान्य माणसांना लावण्यासारखे आहे. महापुरुष जे काही करतात, तो त्यांच्या उदात्त व्यक्तिमत्त्वाचा सहज अविष्कार असतो. तो सहजाविष्कार ही देखील एक आत्मप्रस्थापनाच असते असे गोखल्यांनी सूचित केले आहे, पण असे म्हणणे हा केवळ शब्दच्छल ठरेल. आत्मप्रस्थापना या शब्दात जो आशय आहे, त्यातील भाव पूर्णपणे मागे टाकल्याशिवाय महामानवत्वाच्या पायरीवर चढताच येत नाही. गांधीजींचे निरागस हास्य ही एक अलौकिक आणि विलोभनीय गोष्ट होती. त्यांच्या निर्मल मनाचा आणि मानवमात्राविषयी त्यांना असलेल्या प्रेमाचा तो सहज आविष्कार होता. 'माझे शत्रुत्व इंग्रज माणसाशी नाही,तर

त्यांनी आमच्यावर लादलेल्या जुलमी राजवटीशी आहे,' असे ते नुसते म्हणत नसत, तर तो त्यांचा सहज स्वाभाविक भाव होता. त्यांचे महामानत्व त्यांच्या या व्यापक मनोधरणेत होते. गोखल्यांनी त्यांच्या या वैशिष्ट्यांचा उल्लेख सुस्पष्टपणे केला आहे.

अशा या गांधीजींच्या काही स्वभावसिद्ध मर्यादा होत्या. वास्तवाचे भान न राखणे किंवा सर्वसामान्य समाजाला काय झेपेल याचा विचार न करणे, आपल्या कल्पना आपल्या मुलांवर लादणे किंवा कस्तुरबांच्या छोट्याशा चुकीचा सार्वजनिक उच्चार करताना त्यांच्या समर्पित वृत्तीचा विसर पडणे, असे दोष त्यांच्या विचारात आणि वर्तनात येत गेले, आणि त्या प्रमाणात त्यांच्या महामानवत्वाला ढळ पोचला. अशा गोष्टींचा परामर्श गोखल्यांनी सर्वत्र एका संयमाने घेतला आहे, हे त्यांना भूषणावह आहे. काही ठिकाणी त्यांच्या लेखणीला धार चढलेली आढळते. ज्यांचा उदोउदो केला जातो, अशा गांधीजींच्या जीवनातील काही गोष्टींचे विश्लेषण करताना गोखल्यांची शैली भेदक होते. पण त्या विवेचनाला वस्तुनिष्ठ तपशील आणि तर्कशुद्ध प्रतिपादन यांचा एवढा भरभक्कम पाया त्यांनी दिलेला आहे की, ज्यांना गांधीजींबद्दल अपार आदर आहे, आणि एवढी श्रेष्ठ विभूती या अवनीतलावर वावरली नाही, अशी त्यांच्याविषयीची अपार श्रध्दा ज्यांच्या अंतःकरणात आहे, त्यांनाही गोखल्यांच्या ठाम प्रतिपादनाचा प्रतिवाद करणे फार अवघड जाईल.

सत्त्वरक्षण आणि सत्त्वसंवर्धन हे गांधीजींचे ध्येय होते, असे गोखल्यांनी म्हटले आहे. (पृष्ठ ११२-१३). हे शब्द मोघम आहेत, आणि ते कोणाही श्रेष्ठ व्यक्तीला लावता येत असल्यामुळे, त्यामुळे गांधीजींचे वेगळेपण स्पष्ट होत नाही. शिवाय यानंतर पुढच्या भागात सत्य, अहिंसा आणि सत्याग्रह हे गांधीजींच्या जीवनदृष्टीचे व कार्यप्रणालीचे विशेष येतात. ते आल्यावर या शब्दांचे प्रयोजन उरत नाही. निरनिराळ्या क्षेत्रांत काम करण्यासाठी अनेक संस्था गांधीजींनी उभ्या केल्या. त्यांच्या नावांच्या अखेरीस संघ हा शब्द येतो. हा भाग सांगताना संघ-प्रेरणा असा शब्द गोखल्यांनी योजला आहे. पण हा शब्द मूळ आशयाला जवळ येणारा आहे असे वाटत नाही. एका समान ध्येयाने प्रेरित झालेले कार्यकर्ते एकत्रित आणणे असे म्हणणे पुरेसे अर्थबोधक झाले असते. विविध संस्थांच्या स्थापनेच्या या उल्लेखातच पुढे येणारे संघटन आणि लोकसंग्रह यांचा समावेश करता आला असता. आवाहन, मनःशक्ती, बुद्धिमत्ता, निष्ठा, असे गुण सर्वच मोठ्या माणसांत असतात. आशाप्रवण, उत्क्रांतिप्रवण, त्यागप्रवण, प्राचीनप्रवण, स्वावलंबनप्रवण असे एकेक शब्द यानंतर येत जातात. एक तर ही एक जंत्रीवजा यादी होते. शिवाय यांतील प्रत्येक शब्द वेगळ्या दिशेने जाणारा आहे, त्यामुळे गांधीजींचे व्यक्तिमत्त्व आपल्यासमोर उमलत चालले आहे, आणि त्याचे अधिक अधिक महत्त्वाचे विशेष समोर येत आहेत, असा प्रत्यय वाचकाला येत नाही. गोखल्यांचा विवेचनशैलीचा हा एक बुद्धिप्रधान विशेष आहे, एवढेच यावर म्हणता येते. 'गांधीजींच्या जीवनात धर्माला मध्यवर्ती स्थान होते,' असे गोखल्यांनी म्हटले आहे (पृष्ठ १३९), आणि ते बरोबर आहे. हा मध्यवर्ती घटक सांगितल्यावर तो भिन्नभिन्न निमित्तांनी व निरनिराळ्या स्वरूपात कसा प्रकट होतो, हे स्पष्ट करणे उचित झाले असते. धर्मप्रवण आणि धर्मप्रेरणा हे शब्द या विवेचनात येतात. एकदा धर्माला मध्यवर्ती स्थान दिल्यावर या घटकांचा वेगळा उल्लेख

करण्याचे कारण उरत नाही.

गांधीजींच्या व्यक्तिमत्त्वाचे मोठेपण सांगताना गोखल्यांनी हिमालयातील गौरीशंकराची उपमा घेतली आहे, ती अतिशय समर्पक आहे (पृष्ठ १४१). पण एवढ्या उंचीच्या या व्यक्तिमत्त्वाचा शोध घेताना आपण शिखरावरील माती तपासून पाहात आहोत, असे त्यांनी म्हटले आहे. हिमालयाची माती त्याच्या पायथ्याशी आणि शिखरावर एकच असते, एवढेच नव्हे, तर एखाद्या छोट्या डोंगरावरची वा टेकाडावरचीही माती तीच असते. हिमालयाचे वैभव निळ्यानिळ्या आकाशाचा वेध घेणाऱ्या त्याच्या उंचीत आहे. तो ज्याचा बनला आहे त्या मातीत नाही. ही माती आपण बर्फ खरवडून काढली आहे, असे गोखले म्हणतात. पण एक तर त्या बर्फाखालची माती पायथ्याशी आहे तीच असल्यामुळे या तपशिलामुळे नवीन काहीच पदरात पडत नाही, आणि बर्फ खरवडून तसे बाजूला काढल्यामुळे प्रचंड उंचीवर चढल्यावरच पर्वताच्या शिखरावर बर्फ साठले या गोष्टीकडे दुर्लक्ष होते, आणि एवढ्या उंचीवर चढलेल्या हिमालयाला ज्या बर्फामुळे सौंदर्य प्राप्त होते, तोच बाजूला सारला जातो. चिकित्सेचा मार्ग फार टोकाला नेला, तर केवळ कोरडे तपशील हाताला लागतात. त्यातील अर्थपूर्णत्व आणि रमणीयत्व ही दृष्टीआड होतात, आणि मग ते सारे विवेचन गांधीजींच्या महामानवत्वातील उंचीचा साक्षात्कार वाचकाला घडवण्याच्या दृष्टीने उणे पडते. बर्फाखालच्या मातीकडे न वळता गोखले गौरीशंकराशी थांबले असते, तर बरे झाले असते. 'गगनचुंबी गौरी शंकरावरील माती परीक्षणासाठी गोळा करताना मूळ मूर्ती विसरून चालणार नाही', असे तेही या प्रकरणाचा शेवट करताना म्हणून गेले आहेत (पृष्ठ १४१).

**महामानवत्वाची दिशा**

'साध्य-विस्तार' या प्रकरणाच्या उत्तरार्धात सशस्त्र क्रांती हा विषय येतो. त्याचे पहिलेच वाक्य मनाची पकड घेते, आणि गोखल्यांच्या भाषेतील तेज प्रकट होते. त्यांच्या मनाला विशेषत्वाने भावणारा विषय येथे आला आहे, आणि येथून पुढच्या भागात त्यांच्या विवेचनातील परिणामकारकता प्रकर्षाने उमटली आहे. पाठोपाठ ब्रह्मचर्य हा विषय येतो. गांधीजी वयाच्या चाळीशीकडे येत असताना त्यांनी पत्नीच्या संमतीने ब्रह्मचर्याचे व्रत घेतले, आणि त्यायोगे त्यांच्या जीवनाला उदारतेचा स्पर्श झाला. हे व्रत सामान्य नाही याचा विसर आपल्याला पडू नये. जगातील तर राहोतच, पण आध्यात्मिक संस्कृतीचा वारसा सांगणाऱ्या भारतातील भलेभले नेते या संदर्भात ढळले आहेत, ही वस्तुथिती आहे. 'बलवानिंद्रियग्रामो विद्वांसमपि कर्षति ।' म्हणजे इंद्रियांची आपापल्या विषयांकडची ओढ एवढी बलवान असते की, मोठमोठ्या ज्ञानी पुरुषांनाही ती आपल्या पाशात खेचून नेते; असे वर्णन केले गेले आहे. पण तो कठीण निग्रह गांधीजींनी उरलेल्या आयुष्यात निष्ठेने आचरणात उतरवला.

'विकारहेतौ सति विक्रियंते येषा न चेतांसि त एव धीरा: ।', असे महाकवी कालिदासाने म्हटले आहे. माणसाच्या वासनांना जाग आणणे विषय सहज उपलब्ध असूनही जे त्यांच्या मोहात गुंतत नाहीत, तेच खरे धीर पुरुष होत; असा त्या पंक्तीचा अर्थ आहे. गांधीजी या कोटीत समाविष्ट होऊन गेले. वडील मृत्युशय्येवर असताना आपण पत्नीकडे निघून गेलो, याचे एक शल्य गांधीजींच्या मनात होते, पण त्या वेळी त्यांचे वय केवळ सोळा-सतरा वर्षांचे

होते, त्या कोवळ्या वयात जबाबदारीची वा कर्तव्यपालनाची जाणीव पुरेशी प्राप्त झालेली नसते, याचा विसर आपल्याला पडू नये. पुढील काळात गांधीजींचा संयम फार वरच्या कोटीला पोचला होता. कस्तुरबा आजारी असताना त्यांनी घ्यावयाच्या उपचाराच्या संदर्भात सहज काही बोलणे झाले, आणि एक वर्षासाठी गांधीजींनी डाळ आणि मीठ हे पदार्थ एका क्षणात वर्ज्य केले. ही सोपी गोष्ट नाही. गांधीजींचे सारे कार्यक्रम घड्याळानुसार चालत. चरख्यावर नियमाने सूत कातण्याचा त्यांचा नियम अनेकविध व्यापात सतत गर्क असूनही अबाधितपणे चालू राहिला. त्यांचे सकाळचे फिरणे आणि संध्याकाळची प्रार्थना ही कधीही चुकली नाहीत. राजकीय चळवळीचे एक अंग म्हणून त्यांनी अनेक वेळा कमी अधिक दिवसांचे उपवास केले. वर्षानुवर्ष असे एक व्रतस्थ जीवन गांधीजींनी व्यतीत केले. ही सारी एक तपश्चर्या असते, आणि यातील साध्यासाध्या गोष्टीत माणसाचे खरे मोठेपण साठवलेले असते. गांधीजी त्या कोटीतील होते.

पण माणसाच्या मनाचा थांग लागत नाही, आणि त्याचे व्यापार उलगडत नाहीत हेच खरे. एवढ्या कठोर कसोट्यांतून वर्षानुवर्ष सहजपणाने जात राहिले असूनही तेवढ्यावर गांधीजींचे समाधान झाले नाही. शरीरधर्मानुसार एखादी गोष्ट आपल्यालाही नकळत होऊन जाते, एवढी साधी गोष्ट वयाची पासष्टी उलटून गेली असतानाही त्यांना उमजली नाही. त्याहीपुढे जाऊन पंचाहत्तरी ओलांडल्यावर आपल्या मनातील वासना नि:शेष निपटली गेली आहे की नाही, हे तपासून पाहण्यासाठी त्यांनी भलभलते प्रयोग केले. त्यातच सत्य हे त्यांचे व्रत असल्यामुळे त्याला त्यांनी प्रसिद्धीही दिली. हे सारे करताना त्यांनी आपल्या कोवळ्या वयातील नातीला त्या प्रयोगात सहभागी करून घेतले. हा सगळा प्रकार केवळ अनाकलनीय आहे. गांधीजींच्या तत्त्वज्ञानात आणि जीवनविषयक दृष्टिकोणात काही अंतर्विरोध कायमचे ठाण मांडून बसलेले होते. त्यांतील हा केवळ एक नमुना आहे.

आपल्या ठिकाणी वासना कितीशी शिल्लक आहे, याचा शोध घेण्यासाठी असे बाहेर भटकण्याची काहीही आवश्यकता नसते. नुसते सहज बाजारात फिरून आले, तरी आपल्याला कशाचा आणि कितीसा मोह असतो हे समजू शकते. अथेन्सच्या बाजारात फिरत असताना दुकानांतून ठेवलेल्या नाना वस्तू सॉक्रेटिसने पहिल्या आणि तो म्हणाला, 'यातल्या कित्येक गोष्टी मला लागतच नाहीत.' हे त्याचे वेगळेपण आहे. आपले मन कोणत्या गोष्टीकडे धाव घेते, त्याला आपण किती आवर घालू शकतो, कोणत्या गोष्टींचे चिंतन करण्यात आपल्याला इतर साऱ्या गोष्टींचा विसर पडतो, आणि कोणत्या गोष्टीकडे आपल्याला आपले मन प्रयत्नपूर्वक वळवावे लागते, हे कोणताही विचारी मनुष्य सहजपणे आपले आपल्याशी तपासून पाहू शकतो. गांधीजींना आपल्या आयुष्याच्या अखेरच्या काळात हा काय भ्रम पडला, ते आपल्याला समजत नाही. एकदा गांधीजींना थंडी वाजत असल्याचा उल्लेख आला आहे. गोखल्यांनी म्हटले आहे, 'हीव हे निमित्त दिसते. स्पर्शाची आवड पुरवण्याची ही युक्ती असावी.' विश्लेषण फार कठोर झाले असे वाटून की काय, त्यांनी लगेच पुढे म्हटले आहे की, गांधीजींच्या 'नेणिवेतल्या मनाने' ही युक्ती सुचवली असावी. त्यांना स्त्रीचा स्पर्श हवासा वाटला असावा, असे गोखल्यांना म्हणाचयाचे आहे. पण सत्यवचनाच्या बाबतीत गांधीजी इतके सरळ होते



अनुक्रमणिका

की, जर त्यांच्या मनात स्त्रीच्या स्पर्शाची इच्छा असती, तर तसे त्यांनी स्वच्छपणे बोलून दाखवले असते. तशी उदाहरणे गोखल्यांनी दिली आहेतच.

गांधीजींच्या गुणसंपदेचा विचार करताना त्यांची गोरगरिबांविषयीची तळमळ, महारोग्यांपर्यंत कोणाही व्याधिग्रस्ताची सेवा करण्याची ऊर्मी, मजूर किंवा शेतकरी यांच्यावरील अन्याय दूर करण्याचा प्रयत्न, अशा गोष्टींचा उल्लेख गोखल्यांनी केला आहे. अशा प्रकारच्या सेवेच्या बुडाशी जी करुणा असते ती व्यापक पातळीवर पोचली, आणि तिला व्यक्तिगत स्वार्थाच्या संपूर्ण त्यागाची जोड मिळाली की, तेथे महामानवत्व प्रवेश करते. नेतृत्व आणि पराक्रम यांच्या द्वारा प्रकट होणारे कर्तृत्व कितीही उत्तुंग असले, तरी त्यामुळे व्यक्ती महामानव या पदवीशी पोचू शकत नाही. अशा गुणांवरोबर आणखी काहीतरी गांधीजींच्या ठायी होते, म्हणून ते महामानव ठरले.

## सत्य, अहिंसा आणि सत्याग्रह

हे एका हिंदुत्वनिष्ठ विचारवंताने केलेले गांधीजींचे जीवन आणि विचार यांचे विश्लेषण आहे. गांधीजींचे जे श्रेय आहे, ते गोखल्यांनी भरघोसपणाने त्यांच्या पदरात टाकले आहे. सत्य आणि अहिंसा यांचा पुरस्कार, आणि सत्याग्रह हे अन्यायाचा प्रतिकार करण्याचे साधन, हे गांधीजींचे सर्वाधिक महत्वाचे विशेष आहेत. यांतील सत्य हा शब्द सर्वात गहन. गांधीजींनी आपल्या आत्मचरित्राला 'सत्याचे प्रयोग' असे नाव दिले आहे. हे सत्याचे प्रयोग म्हणजे काय, याचा नेमका उलगडा आपल्यासारख्या सामान्य माणसाला होत नाही. अशा या कूट शब्दाचा गोखल्यांनी काही उलगडा केला आहे. व्यक्तिमत्वाचा विकास आणि अखिल मानवजातीचे कल्याण यांना उपकारक होणारे जे जे चांगले, उदात्त, उन्नत, मंगल' असे असेल, ते सत्य होय. 'मनाच्या विशुद्ध अवस्थेत त्याचे दर्शन होते. ते आपोआप दिसत नाही, प्रयत्नपूर्वक शोधावे लागते' (पृष्ठ ३८). त्या त्या प्रसंगात वागत असताना या सत्याला अनुसरून पाऊल टाकणे हे त्या सत्याचे व्यावहारिक रूप होय; असे गोखल्यांनी म्हटले आहे. या स्पष्टीकरणामुळे गांधीजींना अभिप्रेत असलेल्या सत्याचे काही आकलन आपल्याला होते. याहून अधिक समर्पक असा आणखी कोणता अर्थ लावता येईल, असे वाटत नाही. गांधीजींचे 'सत्याचे प्रयोग' आणि त्यांच्या एकंदर जीवनातील आंतर सुसंगती यांचे गोखल्यांनी फार नीटस विवेचन केले आहे (पृष्ठ २२७). त्यात त्यांची निर्भेळ गुणग्राहकता दिसते.

गांधीजींनी आपल्या आयुष्यात सतत अन्यायाचा प्रतिकार केला. मग तो अन्याय दक्षिण आफ्रिकेतील वंशभेदाचा असो वा चंपरणमधील शेतकऱ्यांवरील असो, अहमदाबादमधील मजुरांवरील असो वा इंग्रजांच्या भारतावरील राजवटीचा असो. हा प्रतिकार करतान अखेर त्यांच्या मनात सत्याचा शोध घेणाऱ्या उदात्ताची ओढ होती, असे गोखले म्हणतात. ते योग्य तर आहेत, पण गांधीजींना न्याय देणारे आहे. भारताच्या स्वातंत्र्यासाठी गांधीजींनी जो लढा दिला, त्याला त्यांनी सत्याग्रह हे नाव दिले. तो सत्याग्रह त्यांच्या जीवनाचे वैशिष्ट्य होऊन गेला. हे सत्याग्रहाचे साधन कसे विकसित होत गेले, याचा गोखल्यांनी घेतलेला आढावा अतिशय नेटका आहे. गांधीजींचा सत्याग्रह हा सुसंस्कृत समाजाला त्यांनी उपलब्ध करून दिलेला अन्यायाच्या प्रतिकाराचा एक अभिनव मार्ग होता, आणि त्यायोगे समाज उन्नत आणि

अधिक सत्त्वसंपन्न होण्याची दिशा मिळत होती, हे गोखल्यांनी टिपलेले त्याचे वैशिष्ट्य अतिशय महत्त्वाचे आहे. त्यात गांधीजींच्या महामानवत्वाचे बीज आहे, हे त्यांनी सविस्तर स्पष्ट केले आहे. हे सारे विवेचन करताना थेट दक्षिण आफ्रिकेतील लढ्यापासून तो भारतातील १९४२-च्या चलेजाव आंदोलनापर्यंतची त्यांची झालेली वाटचाल त्यांनी रेखाटली आहे. दांडीयात्रा किंवा धारसाणाचा सत्याग्रह यांतील नाट्य गोखल्यांनी मूर्तिमंत उभे केले आहे. हा सत्याग्रह म्हणजे एक अभूतपूर्व आणि लोकविलक्षण अशी गोष्ट आहे, असे साऱ्या जगाला का वाटले, याची त्यांनी केलेली मीमांसा सुरेख आहे.

राज्यकर्त्यांच्या ठायी एक विशिष्ट सुसंस्कृतपणा असेल, तरच हे सत्याग्रहाचे साधन वापरता येते, याकडेही गोखल्यांनी लक्ष वेधले आहे. केवळ निष्ठुर आणि असंस्कृत अशा व्यक्तीपुढे वा सत्तेपुढे सत्याग्रहाचे शहाणपण चालत नाही, हे गांधीजींच्या ध्यानात आले नाही, किंवा आले असले तरी त्याकडे दुर्लक्ष केले; असा निष्कर्ष अखेर गोखल्यांनी काढला आहे. समतोल आणि अनाग्रही दृष्टीने विचार करणाऱ्या कोणाही व्यक्तीला तो मान्य व्हावा. सत्याग्रहाला अहिंसेची साथ आरंभापासून होती. पुढे उपवासाची आणखी एक मिळाली. या उपवासाची सीमा कधीकधी प्राणांतिक उपोषणापर्यंत पोचली. त्या त्या वेळी गांधीजींचे म्हणणे विविध धर्मांच्या व निरनिराळ्या राजकीय पक्षांच्या नेत्यांनी मानले. पण हा सत्याग्रहाचा वा उपोषणाचा विजय नव्हता, तर गांधीजींचे प्राण वाचवणे हे सर्वांना महत्त्वाचे वाटत असे, आणि म्हणून त्यांचे म्हणणे मान्य केले गेले, हे गोखल्यांनी केलेले निदान अचूक आहे. यामुळे गांधीजींचे श्रेय उणे ठरते हेही खरे आहे. पण याची उदाहरणे शोधण्यासाठी फार लांब जाण्याची गरज नाही.

काही वर्षांपूर्वी महाविद्यालयातील प्रवेशामध्ये मागासवर्गियांसाठी राखीव जागा ठेवल्या गेल्या, आणि त्यामुळे अतिशय बुद्धिमान अशा काही विद्यार्थ्यांना अत्युच्च प्रतीच्या विद्यासंपादनाचा रस्ताच बंद झाला. उत्तर भारतात त्याविरुद्ध आपाज उठवताना विद्यार्थ्यांनी आत्मदहनाचा मार्ग स्वीकारला. पाचपंचवीस कोवळ्या वयाची मुले प्राणाला मुकली. पण या आत्मार्पणाचा काहीही उपयोग झाला नाही. मागासवर्गियांच्या जागांना धक्का न लावता देशातील अतिशय बुद्धिमान अशा विद्यार्थ्यांचा मार्ग मोकळा करावा, हे शासनाला सुचले नाही. इंदिरा गांधींनी पुकारलेल्या आणीबाणीला विरोध म्हणून एका सर्वोदयी कार्यकर्त्याने वर्ध्याजवळ स्वत:ला जिवंत जाळून घेतले. आपल्या मनाची तडफड व्यक्त करणारे त्याचे पत्रक सर्वत्र गुप्तपणे प्रसृत झाले. पण त्या आत्मसमर्पणामुळे आणीबाणी मागे घेतली गेली, असे घडले नाही. एवढेच नव्हे, तर पुढे आणीबाणी उठल्यावर आणि निवडणुकीत इंदिराजी पराभूत होऊन जनता पक्षाचे राज्य आल्यावर त्या सर्वोदयी हुतात्म्याचे साधे स्मरण कोणाला राहिले नाही. जनता मंत्रिमंडळातील सारे सदस्य मिरवणुकीने राजघाटावरील गांधीजींच्या समाधीवर पुष्पचक्र वाहण्यासाठी गेले होते, हे मात्र खरे. येथे तर ज्यांच्याविरुद्ध झगडा होता ते राज्यकर्ते स्वकीय होते. प्राणांतिक उपोषण कोण करतो, आणि ते कोणा विरुद्ध करतो, या दोन्ही गोष्टींना महत्व असते. अहिंसा आणि सत्याग्रह यांना मिळणारे यश मर्यादित तर असतेच, पण ते व्यक्तिसापेक्ष आणि कालसापेक्ष असते. गोखल्यांच्या विवेचनात हे सारे काही उत्तम प्रकारे स्पष्ट झाले आहे.



अनुक्रमणिका

आपल्याला असे जाणवते की, गांधीजींचे महामानवत्व आणि त्यांना मिळालेली जगन्मान्यता येथून त्यांच्या ग्रंथाचा प्रारंभ होतो, आणि हळूहळू त्यांच्या तत्वज्ञानाच्या मर्यादा स्पष्ट करण्याच्या दिशेने त्यांचे विवेचन सरकत जाते.

## जगद्वंद्य नेते आणि दुर्दैवी हिंदुसमाज

व्यवहार्यतेचे भान न राखणे, आणि व्यक्ती व समाज यांचे भिन्न मानस ध्यानात न घेणे, ही गांधीजींना अपयश देण्यास कारण झाली, हे गोखल्यांनी दाखवून दिले आहे, 'गांधीजी मुसलमानांचा व्यक्तिश: विचार करीत, पण समूहश: विचार करीत नसत,' हे गोखल्यांचे निरीक्षण मुळाशी पोचणारे आहे (पृष्ठ २०१). त्याचबरोबर 'समूह म्हणून मुसलमानांचा विचार जसा गांधीजींनी कधी केला नाही, तसा समूह म्हणून हिंदूंचा विचारही त्यांच्या मनाला कधी शिवला नाही', याचीही नोंद गोखल्यांनी घेतली आहे. हिंदुसंघटनेचे कार्य करणाऱ्या कोणाही व्यक्तीबद्दल वा संस्थेबद्दल निखालस गौरवाचे उद्गार गांधीजींनी कधी काढले नाहीत. उलट मुसलमानांच्या अत्याचारी वर्तनाबद्दलही त्यांना सांभाळून घेण्याचा प्रयत्न त्यांनी कसा केला, हे अबदुल रशीदने केलेला स्वामी श्रद्धानन्दांचा खून, मलबारमध्ये मोपल्यांनी केलेली तीन हजार हिंदूंची कत्तल, किंवा पाकिस्तानच्या मागणीसाठी डायरेक्ट ॲक्शन पुकारल्यावर एका कलकत्ता शहरात पडलेला एका आठवड्यातील अकराशे हिंदूंचा बळी, अशा घटनांवरील त्यांच्या प्रतिक्रियांवरून सहज समजण्यासारखे आहे. त्यांच्या अशा प्रतिक्रियांचे कारण स्पष्ट करताना 'खलांच्या शब्दावरील हृदय परिवर्तनावरील विश्वास' असे शब्द गोखल्यांनी टाकले आहेत (पृष्ठ १४).

या अनाठायी आणि अवास्तव विश्वासाचा परिणाम काय झाला? तर एकीकडे जिनांशी नमते घेणे आणि मुसलमानांना झुकते माप देणे, तर दुसरीकडे सावरकरांची मुक्तता होण्यासाठी करावयाच्या आवेदनावर स्वाक्षरी करण्यास नकार देणे आणि सतत बळी पडत असलेल्या हिंदुसमाजात जागृती उत्पन्न करण्याचा कोणताही प्रयत्न न करणे, असा विसंवाद गांधीजींच्या वागण्यात उत्पन्न झाला. हिंदुसमाजाची कोणतीही जाण त्यांना नव्हती, असे म्हणता येणार नाही. अस्पृश्यतानिर्मूलनाच्या कार्यासाठी त्यांनी उभा केलेला हरिजन सेवक संघ आणि अस्पृश्यांसाठी वेगळे मतदारसंघ करण्याच्या मागणीच्या वेळी त्यांनी केलेले उपोषण, एवढ्या दोन गोष्टीही त्यांना ते भान असल्याची साक्ष पटवतात. पण त्यांची ही जाण विधायक अंगाने याहून पुढे सरकू शकली नाही. त्यांच्या एकूण धोरणामुळे खरे तर ना मुसलमानांचे हृदयपरिवर्तन झाले, ना ब्रिटिशांचे. अहिंसा हे ब्रीद मानण्याच्या दृष्टीने आपल्या निकटच्या सहकाऱ्यांचेही मत आपल्यासारखे नाही, असे गांधीजींना आढळून आले. यामुळे त्यांचा भ्रमनिरास व्हावा, पण तसे घडले नाही. आपलेच शब्द त्यांनी फिरवले, आणि प्रसंग निभावून नेले. त्यांची वाक्येच गोखल्यांनी उद्धृत केली आहेत. 'ध्येय किंवा व्रत म्हणून मी काँग्रेससमोर अहिंसा कधीही ठेवली नाही', हे गांधीजींनी वर्ध्याच्या बैठकीत केलेले विधान धक्का देणारे आहे (पृष्ठ१६६). आपल्याला प्रश्न पडतो, की त्यांचे सत्य या वेळी कोठे गेले? आपला ध्येयवाद आपण आपल्या मुलावर एका मर्यादेबाहेर लादतो तेव्हा त्याच्यावर आपण अन्याय करतो, आणि दडपण आणून कोणाची कोंडी करणे किंवा एखाद्या गोष्टीची कोणावर सक्ती करणे ही

अहिंसेला बाधा आणणारी गोष्ट आहे, हे त्यांच्या ध्यानात कसे आले नाही, असा प्रश्न आपल्याला पडतो.

हा प्रश्न एवढ्या मर्यादेत रहात नाही. आपल्याला भेट म्हणून मिळालेले चार रुपये कस्तुरबांनी स्वत:जवळ ठेवले. हे आश्रमातील शिस्तीला सोडून झाले, म्हणून गांधीजींनी त्यांची जाहीर खरडपट्टी काढली. याबद्दल काय म्हणता येईल? गोखल्यांनी या संदर्भात केलेली टीका जितकी स्पष्ट तितकीच योग्य आहे. सत्याच्या अतिरिक्त प्रयोगापोटी गांधीजींना आपल्या सहधर्मचारिणीने आपल्यासाठी तोवर सहन केलेल्या अनेक गोष्टी आणि त्यासाठी घेतलेले कष्ट यांचा विसर पडला काय? त्यांच्या मातृहृदयाची होत असलेली कुचंबणा आणि तडफड गांधीजींच्या ध्यानात यावयास हवी होती. एखाद्या किरकोळ चुकीबद्दल क्षमाशील राहणे हाही एक गुण आहे, याचे भान गांधीजींना राहिले नाही. जी क्षमाशीलता जवाहरलालांना लाभली ती कस्तुरबांच्या वाट्याला आली नाही, आणि जे वात्सल्य जवाहरलालांना त्यांच्याकडून मिळाले त्याला हरिलाल पारखा झाला. 'स्वत:ची शुद्धता (महात्मेपण) वृत्तपत्रातून जाहीर करण्याचा जो मोह होता, त्याच्या आहारी गांधीजी गेले', असे गोखल्यांनी म्हटले आहे (पृष्ठ १०९).

हा विचार समाजाच्या पातळीवरूनही पाहता येतो. बहुसंख्य समाजाने अल्पसंख्यांचा विश्वास संपादन करण्यासाठी आपले सारे अधिकार त्यांना देऊन टाकावेत, प्रसंगी हिंदूनी आत्मसमर्पण करावे, मुसलमानांचे अपराध पोटात घालावेत, आणि त्यांना कोणताही प्रतिकार करू नये; असे गांधीजींनी म्हटले. परिणाम काय झाला? अन्यायाचा प्रतिकार करावयाचा असतो, हे हिंदुसमाज साफ विसरून गेला. कोणत्याही विचाराचा पाठपुरावा करताना त्याचे तात्कालिक परिणाम काय होतील एवढेच ध्यानात घेणे पुरेसे असत नाही, तर भविष्यकालात त्याचे दूरगामी परिणाम काय होतील यावर दृष्टी पोचवावी लागते. संपूर्ण समाजाचे भवितव्य ज्यात गुंतलेले असते, अशा प्रश्नांची सोडवणूक करताना हा विवेक फार सूक्ष्मपणे सांभाळावा लागतो. अत्याचाराचा प्रतिकार केवळ अहिंसेने करावा, अशी शिकवणूक कानांवर पडत राहिल्यामुळे दुर्बल व्यक्ती निमूटपणे अन्याय सोसून अहिंसेचे पालन केल्याचे फसवे समाधान मिळवते. पण त्यातूनच अन्यायाचा प्रतिकार करण्याची वृत्तीच ती हरवून बसते, आणि हे संपूर्ण समाजाच्या पातळीवर घडले, तर तो सारा समाज आपले पौरुष गमावून बसतो. शूराची अहिंसा आणि भ्याडाची अहिंसा यांतील सूक्ष्म भेद ओळखण्याचे सामर्थ्य सामान्य माणसाला असत नाही, आणि कोणताही समाज अशा सामान्य माणसांचाच बनत असतो.

हिंदुमुस्लीम प्रश्न हाताळताना गांधीजींनी हे कधी ध्यानात घेतले नाही. या चुकीच्या मार्गाने गेल्यामुळे हिंदुसमाजाची नियतीच भीषण विनाशाचे रूप घेऊन समोर ठाकली, हे जितके दारुण तितकेच विपरीत सत्य आहे. अनेक दंगली झाल्या, आणि शेकडो निरपराध हिंदू मारले गेले. पुढे तर देशाची फाळणीच झाली. ही गांधीजींच्या अप्रतिकाराच्या शिकवणुकीची अपरिहार्य परिणती होती. हजारो माणसांचे बळी पडले. असंख्य स्त्रियांवर अत्याचार झाले तर तितक्याच पळवल्या गेल्या. शेकडो बालके निराधार झाली. शतकाशतकांचे आपले वास्तव्यस्थान असलेली भूमी सोडून आणि सारी मालमत्ता मागे टाकून लक्षावधी हिंदू केवळ अंगावरच्या वस्त्रानिशी निर्वासित होऊन उर्वरित भारतात आले, आणि त्यांच्या नशिबी दीनवाणे जिणे आले. जे मागे

राहिले त्यांचे काय झाले? आदल्या दिवशी आपले देशबांधव असलेले नवनिर्मित पाकिस्तानातील सारे हिंदू एका रात्रीत स्वतंत्र झालेल्या शेष भारताच्या दृष्टीने परकी नागरिक ठरले, आणि त्यांची वास्तपुस्त करण्याची कोणतीही घटनात्मक जबाबदारी भारताच्या नव्या सरकारवर उरली नाही. आपल्या समाजाला दिलेल्या अहिंसेच्या आग्रही शिकवणुकीचा आणि परधर्मीय समाजाच्या हृदयपरिवर्तनावर गांधीजींनी ठेवलेल्या अतिरिक्त विश्वासाचा हा परिणाम झाला. लक्षावधी लोकाच्या या दुर्दशेची नैतिक जबाबदारी कोणावर पडते, असा प्रश्न गांधीजींसारख्या महामानवाला का पडला नाही, असा प्रश्न आपल्याला पडतो, त्याचे उत्तर ज्याने त्याने आपल्या सदसद्विवेकबुद्धिला अनुसरून शोधावे.

कस्तुरबांना त्यांच्या झालेल्या सार्वजनिक अवहेलनेच्या रूपाने गांधीजींच्या महात्मतेची किंमत मोजावी लागली, त्याहून कितीतरी प्रचंड प्रमाणात ती हिंदुसमाजाला मोजावी लागली. हे सारे गांधीजी का जाणू शकले नसतील? गोखले म्हणतात त्याप्रमाणे त्यांना 'मोह पडला' हेच खरे. मुसलमानांचा एक समूह म्हणून विचार न केल्यामुळे त्यांच्या आक्रमक आणि हिंसाप्रवण प्रवृत्तीपासून असलेला धोका एक तर गांधीजींच्या ध्यानात आला नाही, किंवा त्यांनी त्याकडे कानाडोळा केला. असे करण्यामुळे मुसलमानांच्या डायरेक्ट ॲक्शनला मोकळी वाट मिळाली. दुसरीकडे हिंदूंचा समूहशः विचार न केल्यामुळे सांस्कृतिक दृष्टया एकात्म असूनही जातिभेद आणि अस्पृश्यता अशा दोषांमुळे शतखंड झालेला आपल्या देशातील हा प्रचंड समाज एकत्रित उभा रहावा यासाठी काही प्रयत्न केला पाहिजे, तसा प्रयत्न कोणी करीत असेल तर तीही एक देशसेवाच आहे हे जाणले पाहिजे, आणि ते आपल्या उक्तींतून स्पष्टपणे व्यक्त झाले पाहिजे, असे गांधीजींनी कधीही मानले नाही. फाळणी झाली तर हजारो लोकांची आहुती पडेल, आणि लक्षावधी माणसे घरादाराला मुकतील, हे भीषण भवितव्य सर्वसामान्य लोक जाणून होते; पण ते या देशाचे नेतृत्व करणाऱ्या आणि साऱ्या जगात कीर्तिमंत असलेल्या नेत्यांना कळले नाही, ही वस्तुस्थिती आहे. हिंदुसमाज दुर्दैवी आहे, एवढेच यावर म्हणता येते. त्याला जगद्वंद्य नेते लाभले पण त्याचे रक्षण करणारा कोणी त्राता मिळाला नाही. गोखल्यांनी केलेले विश्लेशण वाचत असताना असे सारे मनात आल्याशिवाय रहात नाही.

'India has a mission' असे गांधीजींनी म्हटले आहे. भारताने हातात शस्त्र घेतले तर, असा प्रश्न करून ते म्हणतात की, मग भारत आपले कार्य करू शकणार नाही (पृष्ठ १०९). हिंदुस्थानात प्राचीन काळापासून चालत आलेली अहिंसेची अतूट परंपरा आहे, असे विधान गांधीजींनी केले आहे. गोखले सांगतात की, हा त्यांचा एक 'दैवी भ्रम' आहे. हिंदुस्थानची परंपरा सहिष्णुतेची आहे असे म्हणता येईल, पण सहिष्णुता म्हणजे अहिंसा नव्हे, असा सूक्ष्म भेदही गोखले दाखवतात (पृष्ठ १५५). अहिंसेबद्दलच्या गांधीजींच्या साऱ्याच कल्पना वास्तवापासून दूर होत्या, हे स्पष्ट करताना गोखल्यांनी म्हटले आहे,'ही टीका तिखट वाटली तरी सार्थ आहे' (पृष्ठ १६२) खरोखरीच ती सार्थ आहे. सळसळत्या सापाला आपण हातात खेळवू शकत नाही, याचे गांधीजींना वैषम्य वाटत असे, असा एक उल्लेख आहे. पण हे निसर्गाविरुद्ध जाणारे बोलणे आहे. सर्पाने दंश करावा हे निसर्गसिद्ध आहे. वास्तवाकडे गांधीजी किती दुर्लक्ष करू शकत, याचे हे एक सुस्पष्ट उदाहरण आहे. पण 'सर्प विंचू नारायण।

परी वंदावे दुरून ॥' असे संतश्रेष्ठ तुकारामांनी सांगून ठेवले आहे.

भारताच्या विशाल राजकीय मंचावर गांधीजींना केलेला अहिंसात्मक चळवळीचा प्रयोग पाहून, आणि अवघ्या मानवजातीविषयी त्यांना असणाऱ्या प्रेमाची प्रचीती येऊन आईनस्टाइनने उदगार काढला, 'अशा प्रवृत्तीचा कोणी हाडामांसाचा माणूस या पृथ्वीच्या पाठीवर वावरत होता, यावर पुढील पिढ्यांचा कदाचित विश्वासही बसणार नाही.' आरदभावाचा ठीक आहे. पण हे उदगार काढणाऱ्या आईनस्टाइनने हिटलरच्या भीषण संकटातून जग वाचवण्यासाठी अणुस्फोटकाचे संशोधन केले पाहिजे, असा सल्ला अमेरिकेच्या प्रेसिडेंट रूझवेल्टना दिला होतो, हे विसरून चालणार नाही. 'भौतिक शक्ती आणि आत्मिक शक्ती यांची क्षेत्रे भिन्न आहेत', असे अतिशय मार्मिक विधान या संदर्भात केले आहे. गांधीजी हा फरक जाणू शकले नाहीत. येथेच सत्य आणि अहिंसा यांचा निरपवाद पुरस्कार आणि ईश्वरावरील अविचल श्रद्धा हे गांधीजींचे विशेष ध्यानात घेऊन गोखल्यांनी त्यांचे वर्णन धर्मपुरुष या शब्दाने केले आहे (पृष्ठ १७७). पण त्या शब्दातील आशय वेगळा आहे. धर्म आणि अध्यात्म यांसाठीच जे आपले जीवन वाहतात, आणि त्या क्षेत्रात काही नवीन दर्शन मांडतात किंवा समाजावर काही प्रभाव पाडतात, त्यांना धर्मपुरुष ही संज्ञा लावता येते. गांधीजींचे जीवन त्या प्रकारचे नव्हते. गांधीजी सारा जन्मभर राजकारणात वावरले हे ध्यानात घेऊन धर्मशील राजकारणी किंवा राजकारणातील धर्मशील नेता असे त्यांचे वर्णन केले, तर ते नेमके ठरेल.

### शापित महामानव

'महात्मा आणि स्वातंत्र्यवीर' या प्रकरणात गोखल्यांनी गांधीजी आणि सावरकर यांची केलेली तुलना मार्मिक, समतोल, आणि मूलगामी आहे. त्याच्या विस्तारात येथे शिरण्याचे कारण नाही. 'सावरकरांनी लोकांचा मेंदू हलवला, तर गांधीजींनी त्यांच्या हृदयाला हात घातला', या एका वाक्यात सावरकरांविषयी विशेष ममत्व असलेल्या गोखल्यांनी गांधीजींना पूर्ण न्याय दिला आहे (पृष्ठ ३०५). पण हे वाक्यही एक मयदित घेतले पाहिजे. सावरकरांनीही एक हौतात्म्यशील क्रांतिकारक म्हणून व विशेषत: अंदमानच्या कारावासात असेतो, जे जे केले आणि लिहिले ते लोकांच्या हृदयाला हात घालणारे आहे. स्वातंत्र्यलक्ष्मीला उद्देशून त्यांनी लिहिलेले स्तोत्र, सिंधुनदीला उद्देशून एका व्याख्यानात उत्स्फूर्तपणे काढलेले सिंधुसूक्त म्हणावे असे उदगार, किंवा भगवान तथागताला त्यांनी सहज चाललेल्या विवेचनात वाहिलेली गौरवांजली, ही त्याची आजही परिणामकारक ठरणारी उदाहरणे आहेत. पण हे त्यांचे ह्रदयाला हात घालणे ज्वलंत आणि हौतात्म्यशील देशभक्तीपुरते मर्यादित होते. निकट संपर्कात येणाऱ्या भिन्नभिन्न व्यक्तींशी होणारे त्यांचे वागणे वैचारिक पातळीवरूनही अनाकलनीय आहे.

गंभीर आजारी असलेल्या पत्नीची ती रुग्णालयात चालली असता घरातल्या घरात सावरकरांनी भेट घेतली नाही. त्याहूनही पुढची गोष्ट म्हणजे अखेरचा श्वास सोडण्यापूर्वी आपल्या पतीची एकदा दृष्टिभेट व्हावी, ही शेवटची इच्छा त्यांनी पुरी केली नाही. सावरकरांचे रुबाबदार दर्शन या वेळी कमी झाले होते, गालफडे बसून तोंडात दाताची कवळी आली होती, आणि डोक्याला टक्कल पडले होते, हे याचे 'एक' कारण असावे; असे आपल्याला वाटल्याचे गोखल्यांनी म्हटले आहे (पृष्ठ पंचवीस, प्रस्तावना) सावकरांशी एकरूप झाल्याने हा थोडा उलगडा

आपल्याला झाला, अशी ग्वाहीहो त्यांनी दिली आहे. पण पत्नी आजारी पडण्यापूर्वी घरी होती, तेव्हा सावरकर तिच्यासमोर कधीच जात नव्हते काय ? पत्नी आजारी पडली व त्यानंतर सावरकरांचे दर्शन विरूप झाले, असे घडलेले नाही. ती वार्धक्याची कळा आधीच आली होती. तेव्हा हे स्पष्टीकरण वास्तवाशी सुसंगत नाही. शिवाय वृद्धत्वातही एक आगळे सौंदर्य असते. तारुण्याने मुसमुसलेली रूपवती रमणी दिसते, त्याचप्रमाणे अंगावर सुरकुत्या पडलेल्या वात्सल्यपूर्ण वृद्ध आजीचे दर्शनही मन तितकेच वेधून घेणारे असते. आपण कसे दिसतो हा केवळ शारीर पातळीवरील विचार एवढ्या वृद्ध वयात मनात येणे हे अपरिपक्वतेचे लक्षण आहे, व त्यामुळे सावरकरांना फार उणेपणा येतो. पत्नीच्या अखेरच्या इच्छेचा मान न ठेवण्यात निष्ठुरपणा तर आहेच, पण त्यात असंस्कृतपणा आहे. तसा उल्लेख गोखल्यांच्या विवेचनात येत नाही. पण अशी व्यक्ती महामानव या पदवीला पोचू शकत नाही.

पत्नीच्या मृत्यूनंतरही आपण तिच्या अंत्यसंस्काराला उपस्थित रहावे, ते आपले एक कर्तव्य आहे, असे सावरकरांना वाटले नाही. गोखलेच त्यांच्या उदगाराबद्दल लिहितात, 'सर्व थंड, भावशून्य', ही भावशून्यता माणुसकी जागवणारी नाही. पण पुढे लगेच गोखले दोन शब्द टाकतात, 'शिष्टाचारात विनचूक' (पृष्ठ ३०८). पत्नीशी झालेल्या या सावरकरांच्या वर्तनात शिष्टाचार बिनचूक कसा पाळला गेला, याचा उलगडा होत नाही. त्यांच्या या प्रकारच्या शिष्टाचाराचे अनुभव सार्वजनिक क्षेत्रातील काही व्यक्तींना आणि त्यांच्याबरोबर फाशीच्या तख्तावर चढून जाण्याची तयारी ठेवलेल्या त्यांच्या तरुण वयातील सहकाऱ्यांनाही उत्तरकाळात आला आहे. सावरकरांच्या मनुजमंगळविषयक काव्यपंक्तीचा उल्लेख गोखल्यांनी केला आहे. सावरकरांच्या प्रतिभेला अविषय असा नव्हताच. तरुण वयात अशी प्रतिभा विशेष रसरशीत उतरते. तिच्या भरारीला अनंत आकाशही थिटे पडते. पण मनुजमंगल हा विषय काव्यात सुंदर रीतीने व्यक्त होणे पुरेसे नसते. तशा कविता इतर कवींनीही मनाच्या क्षणिक ऊर्मीत लिहिलेल्या आहेत. मनुजमंगलाचा सावरकरांचा मार्ग काय? 'विश्वाचिया अखिल मंगलधारणाला। बोला असे कवण भक्ष्य हुताशनाला॥' असे त्यांनी म्हटले आहे. अग्नीचे भक्ष्य होणे हे क्रांतिकारकांच्या दिव्यदाहक अशा देशभक्तीच्या व्रताशी पूर्ण सुसंगत आहे, पण ही हौतात्म्यशीलता विश्वाच्या मंगलधारणेचा मार्ग होऊ शकत नाही. अवघ्या मानवजातीच्या मांगल्याची नुसती दिशा दाखवणेही फार अवघड आहे. शिवाय तो रस्ता शांतीचा आहे, संघर्षाचा नाही. त्यासाठी स्वदेशाच्या सीमा ओलांडाव्या लागतात, आणि तशा महापुरुषाचे मनाविश्वाएवढेच मोठे असावे लागते. त्यासाठी प्रेमाच्या बळावर हरएक मानव हा आपला बांधव आहे ही भावना अंतःकरणात बाणून जावी लागते, आणि ते प्रत्येक कृतीत प्रतीत व्हावे लागते. सावरकर अंतःकरणाने या व्यापक प्रेमभावनेपासून फार फार दूर होते, जितके आपल्या पत्नीच्या बाबतीत होते.

सावरकरांचा मार्ग हौतात्म्याचा, तर गांधीजींचा ऐकांतिक अहिंसेचा. सामान्या माणसाला अनुसरता येण्याच्या दृष्टीने हे दोन्ही मार्ग अशक्य कोटीतील होते. त्या मार्गाने सारा समाज पुढे नेऊ पाहणारे दोघेही हवेत तरंगत होते, दोघांचे ही पाय जमिनीला टेकलेले नव्हते. 'दोघेही हवेत' हे गोखल्यांनी येथे टाकलेले शीर्षक या अर्थानेही घेता येईल. त्यांनी ते शीर्षक अर्थातच समन्वय साधण्याच्या दृष्टीने टाकलेले आहे. सावरकरांचा राष्ट्रहित जपणारा व्यवहारवादी विचारही

हवा, आणि गांधीजींचा हरएक व्यक्तीला प्रेम देणारा भावही हवा, असे गोखल्यांना म्हणावयाचे आहे आणि ते योग्य आहे. हा समन्वय लोकमान्य टिळकांच्या ठायी होता. नाशिकला अभिनव भारताच्या तरुणांशी चर्चा करताना त्यांनी म्हटले,'या मार्गाने जाणारे पन्नास हजार युवक असतील, तर मी त्यांचे नेतृत्व करीन'. यातच हे घडून येणे अशक्य आहे, असे त्यांनी सुचवले आहे. टिळकांच्या लखनौ करारावर बोट ठेवून गांधीजींच्या हिंदुमुस्लीम ऐक्याविषयीच्या भूमिकेचे 'समर्थन करणे हा निव्वळ भोळेपणा आहे', हे गोखल्यांचे विधान अगदी यथार्थ आहे (पृष्ठ ३२७).

टिळकांची जहाल चळवळीची भूमिका अतिशय समतोल होती. समाजाला काय झेपेल याचा विचार त्यात होता, आणि नेत्यांवरील जबाबदारीचे भानही होते. 'इंग्रजांचे या देशातील राज्य जावे असे कोणीही सुज्ञ मनुष्य म्हणणार नाही', असे म्हणण्यापासून त्यांनी आपल्या राजकारणाला सुरुवात केली. परक्यांचे राज्य चांगले चालले असेल, तरी ते सुराज्य आणि स्वराज्य यांत फरक आहे, हे त्यांनी लोकांना समजावून सांगितले, आणि अखेर 'स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे,' अशी गर्जना करण्यापर्यंत ते पोचले. इंग्रजांचे राज्य म्हणजे मोगलाई नव्हे, तर ते कायद्याने चालणारे राज्य आहे, याचे टिळकांनी स्वागत केले; पण पुढे म्हटले की एखादा कायदा अन्यायाचा असू शकतो. तो तसा असेल तर तो बदलून घेतला पाहिजे, तो बदलण्यास सरकार तयार नसेल तर तो मोडला पाहिजे, आणि त्याबद्दल जे शासन होईल ते भोगून राजकीय नेत्यांनी उदाहरण घालून दिले पाहिजे, आणि त्याद्वारा सरकारशी झुंज देणारी लोकांची चळवळ उभी केली पाहिजे; असे टिळकांनी म्हटले आहे. तिला त्यांनी सनदशीर मार्गाने केलेला नि:शस्त्र प्रतिकाराचा कायदेभंगाचा लढा असे म्हटले. हा कायदेभंग आणि गांधीजींचा सत्याग्रह यात स्वरूपत: काहीही फरक नाही. नि:शस्त्र प्रतिकार म्हटल्यावर अहिंसेचा अवलंब आपोआप आला. पण टिळकांच्या दृष्टीने तो प्राप्त परिस्थितीत शक्य असलेला चळवळीचा मार्ग होता. त्यांनी अहिंसेचे स्तोम माजवले नाही. बंगालमध्ये बाँब पडले, कोणाकोणाची हत्या झाली. हा टिळकांचा मार्ग नव्हता, पण त्यांनी त्याचा निषेध न करता, तरुणांची माथी का भडकतात याचा सरकारने विचार करावा, असे म्हटले. सांस्कृतिक पातळीवर त्यांना अहिंसा मान्य होती, पण त्यांना व्यावहारिकतेचे पूर्ण भान होते. व्यक्तीसाठी कोणते ध्येय व शिकवणूक द्यावी, आणि त्याच गोष्टी संपूर्ण समाजासमोर ठेवताना त्यांचे रूप कोणते असावे, याचा विवेक टिळक जाणून होते.

हे भान राजकारणात वावरणाऱ्या टिळकांना होते, एवढेच नव्हे, तर संन्याशी असलेल्या विवेकानन्दांनाही होते. अहिंसेचे स्पष्टीकरण करताना त्यांनी म्हटले आहे की, संतप्त झालेल्या मुलाला वत्सल मातेने समजावून सांगावे तसे अहिंसेचे रूप असते. अहिंसेचा आश्रय करताना उभयपक्षी कोणते नाते असावे लागते, हे याहून समर्पक रीतीने सांगणे अवघड आहे. भलत्या व्यक्तीने भलत्या प्रसंगात अहिंसेचा आश्रय केला, तर तो हास्यास्पद ठरतो, असे त्यांनी म्हटले आहे. पराकोटीची अहिंसा ही व्यक्तिगत पातळीवर व्यवहार्य असते. शिवाय ती गांधीजींसारख्यांनाच जमते व शोभते, कारण तीमागे त्यांचे विशिष्ट व्यक्तिमत्त्व आणि त्यांची तपश्चर्या उभी असते. समाजाच्या पातळीवर ही अहिंसा अपवादात्मक प्रसंगापुरतीच शक्य

असते. गांधीजींना जी अहिंसा अभिप्रेत होती, ती समाजाने अनुसरली असा अनुभव त्यांना आला नाही, एवढेच नव्हे, तर १९४२-च्या छोडो भारत आंदोलनात त्यांना आपल्या भूमिकेला मुरड घालावी लागली. वास्तवाचे भान न राहणे आणि व्यावहारिकतेच्या मर्यादा न ओळखणे ही गांधीजींना आलेल्या अपयशाची कारणे होती. राजकारणाच्या धकाधकीच्या क्षेत्रात त्यांनी अहिंसेचा एक महान प्रयोग केला. एका मर्यादेत त्यांना यश मिळाले. हे यश आणि त्याची मर्यादा यांवर गोखल्यांनी उत्तम प्रकाश टाकला आहे, आणि त्यांचे महामानवत्वही उलगडून दाखवले आहे. त्यांच्या प्रस्तुत ग्रंथाचे श्रेय आणि महत्त्व त्यात आहे. सत्य आणि अहिंसा यांच्या केलेल्या पुरस्कारामुळे गांधीजी महामानव या पदवीवर चढले हे खरे, पण त्यांच्या श्रेष्ठत्वाबद्दल पुरेपूर आदरभाव मनात ठेवूनही असे म्हणावे लागते की, वास्तवता आणि व्यवहार्यता यांचे भान न राखल्यामुळे ते एक शापित महामानव झाले.

## श्रेष्ठ विभूतीची शोकांतिका

गोखल्यांसारखा चिकित्सक लेखकही गांधीजींच्या महामानवत्वाने क्षणभर भारावून गेला आहे. त्यांचे मूल्यमापन करताना सॉक्रेटिस, कबीर, ज्ञानेश्वर, रामकृष्ण आदी धर्मप्रवण व्यक्तींच्या भोवती गांधीजींएवढे कर्तृत्वाचे वलय तळपत नव्हते, असा उल्लेख त्यांनी केला आहे (पृष्ठ ३२७). गांधीजींचे कर्तृत्व अनेक क्षेत्रांत विस्तारलेले होते हे खरे, पण त्यांपैकी किती क्षेत्रातील वारसा त्यांच्या अनुयायांनी आता पन्नास वर्षांनंतर चालवला आहे, असा शोध घेण्यासारखा आहे. सत्य आणि अहिंसा ही त्यांनी अनुसरलेली तत्त्वे नवीन नाहीत. त्यातील सत्याचा शोध त्यांना पुरता लागला होता की नाही याची शंका घेण्यास जागा आहे, आणि अहिंसेचे अतिरिक्त अनुसरण अव्यवहार्य आहे हे गोखल्यांनीच सविस्तर दाखवले आहे. केवळ अनेक क्षेत्रे हाताळली या निकषावर गांधीजींना सर्वश्रेष्ठत्व देता येईल असे नाही. गांधीजी उदात्वाचा शोध घेत होते. त्या उदात्तत्वाच्या दृष्टीने गोखल्यांनी ज्या विभूतींचा उल्लेख केला आहे, त्यांची जीवने गांधीजींपेक्षा वरच्या कोटीतील होती. अथेन्सच्या रस्त्यांवरून फिरताना अनेक विचारवंत विद्वानांशी सॉक्रेटिसचा संवाद चालत असे. जीवनातील श्रेयाच्या दृष्टीने मानवी बुद्धीला पडणारे अंतिम प्रश्न त्या संवादांचे विषय होते. रूढ धर्माला विरोधी मते व्यक्त करण्याबद्दल त्याला तुरुंगात जावे लागले. तेथून त्याला सोडवण्याची व्यवस्था त्याचे अनुयायी करू पहात होते, पण त्याने त्याला नकार दिला. अखेरच्या क्षणी त्याच्या हातात दिलेला विषाचा पेला घशाखाली उतरवताना त्याची वृत्ती गांधीजींच्या रोजच्या प्रार्थनेत ज्याचे वर्णन येते, त्या स्थितप्रज्ञाची होती.

कबीराचे सारे भावनाविश्वच वेगळे होते. ज्ञानेश्वर केवळ आध्यात्मिकतेच्या अनुसंधानात बुडलेले होते, पण त्यांच्या काळाच्या तुलनेने त्यांची समाजसन्मुखता फार मोठी होती, आणि करुणाही विशाल होती, ईश्वराला समोरासमोर पहावे ही आपली आयुष्यभराची आकांक्षा असल्याचे गांधीजींनी अनेकवार बोलून दाखवले आहे. ती अनुभूती रामकृष्णांच्या आयुष्यात सतत साकार झालेली होती. रामकृष्ण संघाने प्रसिद्ध केलेल्या इंग्रजीतील अधिकृत चरित्राला १९२४ साली गांधीजींनी एक छोटीच पण अर्थपूर्ण प्रस्तावना लिहिली आहे. तीमध्ये त्यांनी म्हटले आहे, 'His life enables us to see God face to face', परमेश्वराच्या दर्शनाची

आपली इच्छा व्यक्त करताना गांधीजींनी नेमके हेच शब्द वापरले आहेत. राजकारण वा समाजकारण यात रामकृष्ण शिरले नाहीत, पण त्यांचे विचारांचे व भावनांचे सारे विश्व, गांधीजी जेथे पोचण्यासाठी जन्मभर धडपड करीत होते, त्या उदात्ततेची परिसीमा असलेल्या आध्यात्मिकतेच्या प्रदेशातील होते. प्राथमिक शाळेतील दोन इयत्ता पुऱ्या न केलेल्या या अवतारी पुरुषापुढे गांधीजी नम्र होते, ते केवळ उपचार म्हणून नव्हे. ' शिवभावे जीवसेवा' हा रामकृष्णांचा उदगार आहे. गांधीजींनी त्याच निष्ठेने सेवेचे व्रत घेतले होते.

'हिमालयात जाऊन ईश्वराचे दर्शन होणार नाही, मी सभोवतालच्या माणसांत ईश्वर पाहू इच्छितो', असे गांधीजींचे उदगार आहेत. विवेकानन्दांनी हा विचार त्यांच्या आधी अतिशय प्रकर्षाने मांडला आहे. किंवहुना शतकानुशतके रूढ असलेल्या भारतातील संन्याससंकल्पनेत विवेकानन्दांनी जी क्रांती घडवून आणली, तिचा तो गाभा आहे. गांधीजी उत्क्रांतिप्रवण होते, असा उल्लेख गोखल्यांनी केला आहे (पृष्ठ १२५). 'माझा क्रांतीवर विश्वास नाही; आंतरिक विकासावर आहे', असा उदगार विवेकानन्दांनी सामाजिक सुधारणेच्या संदर्भात मद्रासला दिलेल्या व्याख्यानात काढला आहे. 'हिमालयातील गुहांतून आणि अरण्यामधून अडकून पडलेला वेदान्त मला शेतकऱ्याच्या झोपडीत आणून पोचवावयाचा आहे', असे आपल्या उद्दिष्टाचे वर्णन करताना त्यांनी म्हटले आहे. महान सांस्कृतिक वारसा लाभलेल्या पण आज अवनत अवस्थेत येऊन पोचलेल्या हिंदुसमाजाला पुन्हा पूर्वीचे तेज प्राप्त करून देण्यासाठी कोणती संजीवनी दिली पाहिजे, हे स्पष्ट करताना कोलंवो-आल्मोरा व्याख्यानमालेत जे विचार त्यांनी व्यक्त केले आहेत, ते जितके मूलगामी तितकेच समन्वयशील आहेत. जगातील सर्व धर्मांचे अनुयायी विवेकानन्दांनी समान मानले व त्यांच्या श्रद्धांचा आदर केला, पण म्हणून हिंदुसमाजाच्या गौरवाची गाथा गाण्यात आणि त्याच्या भवितव्याची चिंता वाहण्यात त्यांना अडचण वाटली नाही.

'India has a mission' असे गांधीजींनी म्हटले, आणि त्यासाठी धर्माचा आश्रय घेतला. साऱ्या जगाला अध्यात्माचा संदेश देण्याचे ईश्वर दत्त कार्य भारताला करावयाचे आहे, आणि धर्म हा भारताचा जीवित हेतू आहे; असे विवेकानन्दांनी पुन्हा पुन्हा म्हटले आहे. १९२१ साली गांधीजी बेलूर मठात गेले होते. विवेकानन्दांचा जन्मदिनोत्सव साजरा होत होता. बराच जनसमुदाय गोळा झाला होता. गांधीजींनी चार शब्द बोलावेत, असा आग्रह झाला. त्या भाषणात ते म्हणाले : 'तुम्हाला असे वाटेल की, चरखा चालवणे किंवा सरकारशी असहकार पुकारणे या माझ्या मार्गाचा प्रचार करण्यासाठी मी इथे आलो आहे. पण तसले काहीही मनात आणू नका. विवेकानन्दांचे सार वाङ्मय मी काळजीपूर्वक वाचले आहे आणि त्यामुळे आपल्या मातृभूमीविषयीचं माझं प्रेम अधिक उत्कट झालं आहे. विवेकानन्दांच्या आजच्या जन्मदिनी त्यांच्या चरणी आपली आदरांजली वाहण्यासाठी मी इथं आलो आहे.'

गांधीजी आणि विवेकानन्द यांच्यातील फरकही आपल्याला पाहता येतो. गांधीजींमुळे जेवढी भारतीय संस्कृती पाश्चात्य जगाला कळली, त्याहून कितीतरी अधिक पटींनी ती विवेकानन्दांमुळे कळली. पंचाहत्तरीत आल्यावरही आपल्या ठिकाणी कितीशी विषयवासना शिल्लक आहे, याचा शोध गांधीजींना घ्यावा लागला. विवेकानन्द अमेरिकेत संचार करीत

असताना सुंदर युवतींच्या गराड्यात सतत सापडत असत. पण त्यांच्या चित्ताला कधी मोहाचा स्पर्श झाला नाही. कोणी कोणी तरुण आणि धनवंत युवतींनी आपले सौंदर्य आणि सर्वस्व त्यांच्या चरणी अर्पण करण्याची इच्छा व्यक्त केली. विवेकानन्द त्यावर एवढेच म्हणाले,'मी एक संन्यासी आहे.' असे हे आध्यात्मिकता जीवनात साकार केलेले विवकानन्द श्रीरामकृष्णांचे शिष्य होते. देशभक्तीच्या अंगाने पाहू गेले, तर त्यांच्या हृदयात धगधगता अंगार होता. 'मला हे इंग्रज सरकार गोळी का घालत नाही', असा तिरीमिरीचा उदगार त्यांच्या मुखातून दोनतीन वेळा बाहेर पडला. पण आपले कार्यक्षेत्र भिन्न आहे हे ते ओळखून होते. निवेदितांचे मन क्रांतिकारकांच्या चळवळीकडे वळले, तर विवेकानन्दांनी त्यांना स्पष्ट शब्दात बजावले,'अध्यात्म आणि राजकारण यातली कोणती तरी एक गोष्ट करता येईल, दोन्ही एकदम करता येणार नाहीत.' जी चूक निवेदितांनी करू नये म्हणून विवेकानन्दांनी त्यांना सावध केले, नेमकी तीच गांधीजींनी केली. त्यातील अव्यवहार्यतेचा आणि त्यामुळे त्यांना अखेर आलेल्या अपयशाचा सविस्तर उल्लेख गोखल्यांनी केला आहे.

अहिंसेचा पुरस्कार आणि राजकीय चळवळ हे दोन भाग वगळले, तर जी जी म्हणून अंतरीची आकांक्षा आणि जीवनविषयक मूल्ये गांधीजी मानीत होते, त्या सर्वांचा उल्लेख रामकृष्ण आणि विवेकानन्द यांचे संवाद आणि व्याख्याने यांतून आलेला आपल्याला पाहता येतो. शब्दयोजनाही नेमकी तीच आहे. आपले ध्येय आणि विचार यांची प्रेरणा आपण या दोन महापुरुषांकडून घेतली, असा उल्लेख गांधीजींनी केल्याचे कोठेही आढळत नाही. पण त्या दोघांविषयी बोलताना त्यांनी जे शब्द वापरले आहेत आणि जो भाव व्यक्त केला आहे, त्यावरून ते त्या दोघांना श्रेष्ठ कोटीतील महापुरुष मानीत होते हे स्पष्ट आहे. तशा प्रकारचे उदगार त्यांनी अन्य कोणाही व्यक्तीबद्दल काढलेले नाहीत, ही गोष्टही अर्थपूर्ण आहे, आणि ती गांधीजींच्या व्यक्तिमत्त्वातील आध्यात्मिक अंगावर प्रकाश टाकणारी आहे. मानवी जीवनात जे काही उन्नत, मंगल, आणि उदात्त आहे त्याची आस गांधीजींना होती, हा उल्लेख त्यांच्या सत्य या तत्त्वाच्या संदर्भात गोखल्यांनी केला आहे. या उदात्ततेची परिसीमा आपल्याला सॉक्रेटिस, कबीर, ज्ञानेश्वर, किंवा रामकृष्ण अशा विभूतींमध्ये आढळते. उदात्ततेच्याही श्रेणी असतात. जेवढे वरच्या श्रेणीवर पोचावे, तसे खालचे स्तर सुटत जातात. आध्यात्मिकता आपलीशी करावयाची असेल किंवा हर एक माणसात ईश्वर पाहावयाचा असेल, तर माणसामाणसांतील सारे भेद मागे टाकावे लागतात, आणि संघर्षाचा मार्ग बाजूला ठेवावा लागतो. राजकारण तर मुळातच भेदावर उभे राहते, आणि अहिंसात्मक असला तरीही संघर्ष हा त्याचा प्राण असतो. गांधीजींच्या सदहेतूबद्दल प्रश्नच नाही, पण राजकारण आणि अध्यात्मकारण ही एकाच वेळी साधण्याचा प्रयत्न त्यांनी केला, यात त्यांची शोकांतिका आहे.

गांधीजींच्या महामानवत्वापासून प्रारंभ करून डॉ. गोखले अखेर त्यांच्या जीवनातील शोकांतिकेशी येऊन पोचले आहेत. पण असे असले, तरी त्यांनी महात्मा गांधींना पुरेपूर न्याय दिला आहे, हे प्रस्तुत ग्रंथाचे मोठे वैभव आहे.

□□

डॉ. वि. रा. करन्दीकर

१३ क्षिप्रा सहनिवास, कर्वेनगर, पुणे ५२.








राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




अनुक्रमणिका

डॉ. मंदा खांडगे

# कवीच्या गावा जावे; कवी-माधव

वरंधा घाट संपायला लागला तशी कवी माधवांच्या हिरवे तळकोकणचं स्मरण व्हायला लागलं. कवी माधवांचं शीर गाव पहायचं ह्या ओढीने मी निघाले होते, परशुरामाच्या भूमीत. योग चांगला जुळून आला होता. माझ्या स्नेही लीलाताई दीक्षितांकडे गुहागरला गणेश जन्माचा उत्सव असतो. त्यांनी आग्रहाने बोलावलं होतं. हे निमित्त साधून 'राष्ट्रदेविचे निसर्ग निर्मित केवळ नंदनवन' अशा तळकोकणात मनमुराद भटकंती करायला मिळणार होती. कोकण किनारपट्टीवर आहे गुहागर. या गुहागरला समृद्ध किनारा लाभलाय. गुहागर तालुक्यातलं अवघं दोन तीन हजार वस्तीचं शीर गाव. मी माझ्या मैत्रिणींसह कोकण भेटीला निघाले होते ते दिवस होते. ऐन थंडीचे, पण उबदार थंडी असं म्हणायला हरकत नाही. थंडी हवी हवी वाटत होती थंडीतला प्रवास केव्हाही सुखकर. पौषाचे दिवस. नुकतीच संक्रात संपलेली. अवघं वातावरण चैतन्ययदायी. स्वच्छ मोकळं आकाश. निसर्गही ताजातवाना. घाटातलं सृष्टीसौंदर्य आगळंच !

'सह्याद्रीच्या तळी शोभते हिरवे तळकोकण,
राष्ट्रदेविचे निसर्गानिर्मित केवळ नंदनवन !
झुळझुळ गाणे मंजुळवाणे गात वाहती झरे,
शिलोच्चयांतुनि झरु झुरु जेथे गंगाजल पाझरे;'

चिपळूण परशुरामाच्या पायाशी वसलेलं गाव. अर्ध्या अधिक गावासभोवार वासिष्ठी. तिच्यावर नांदतंय चिपळूण. पावसाळ्यात गावात पाणी भरतं. भरतं तसंच आपोआप ओसरतंही. या चिपळूणमधे कवी माधवांचे अखेरचे दिवस गेले. अखेरचा श्वासही त्यांनी या भूमीतच घेतला. मुंबईत कस्टम खात्यात त्यांनी नोकरी केली. पण उच्च रक्तदाबाच्या विकाराने ते आजारी झाले तेव्हा नोकरीतून निवृत्ती घेऊन आणि कोकणात आले ते चिपळूणला स्थायिक झाले. चिपळूणच्या या वास्तव्यात त्यांना कवी आनंद (वि. ल. बर्वे) मित्र म्हणून मिळाले. कोकणभूमीवर नितांत प्रेम करणारे हे दोघे कवी.

परशुरामाच्या भूमीत आलो तेव्हा त्याच्या मंदिराला भेट दिल्याशिवाय पुढे कसं जाणार? चिपळूणहून परशुराम अवघं १८ किलोमीटर. मंदिराचा परिसर रम्य, एक गंभीर शांतता सर्वत्र जाणवत रहाते. परशुरामाच्या काळ्या पाषाणातील मूर्तीपुढे नतमस्तक होताना सप्तकोकण वसवणाऱ्या त्या महान ऋषीवराला आदराने त्रिवार वंदन केलं. चिपळूणपासून गुहागर अवघ्या २७ मैलांवर. घटकाभर विसावा घेऊन गुहागरला प्रस्थान केलं. तेव्हा उन्हं माथ्यावरून खाली उतरली होती.

यजमान लीलाताई वाट पहात होत्या. गणपती उत्सवाचं पारणं त्या दिवशी होतं. हातपाय










## परिचय



कवी-माधव- माधव केशव काटदरे
जन्म - ३ डिसे. १८९२ मलकापूर
(जि. कोल्हापूर)
मूळगाव - शीर, ता. गुहागर जि. रत्नागिरी.
(वडलांचे खोती गाव)
शिक्षण - शीर, गुहागर, हेदवी, रत्नागिरी
विवाह - २७ मार्च १९०५ -
सीता देवस्थळी ही प्रथम पत्नी
१३ जुलै १९१५ - अल्प आजाराने सीता उर्फ रमाचा मृत्यू
विवाह - १९२२ - मालती जठार हिच्याशी द्वितीय विवाह
नोकरी - १९१२ ते १९४२ मुंबईस कस्टम खात्यात नोकरी
निवृत्ती - १९५२ नंतर निवृत्त होऊन चिपळूण येथे स्थायिक
सत्कार - वयाच्या ६० निमित्त चिपळूणला कै. ना. ह. आपटे यांच्या अध्यक्षतेखाली सत्कार व चिपळूण नगरपरिषदेकडून मानपत्र व सत्कार.
मृत्यू - ३ सप्टेंबर १९५८

## काव्यसंग्रह

१) ध्रुवावरील फुले - १९१५, प्रकाशक, बाळकृष्ण रावजी पालवणकर, गिरगाव मुंबई ४
२) फेकलेली फुले - १९२०, प्रकाशक, बाळकृष्ण रावजी पालवणकर, गिरगाव, मुंबई ४
३) कवि माधव यांची कविता - १९४२, ह. वि. मोटे, प्रतिभा कचेरी, मुंबई.
४) गोड गीते - १९४२, नवभारत प्रकाशन संस्था, मुंबई ४.
५) गीत माधव - १९५२, स. म. फडके, एस. व्ही. एम. प्रेस, चिपळूण
६) माधविका - १९९२, संपादन, शांता शेळके, सौ. संध्या देशपांडे,
प्रकाशक-निशिकांत जोशी, कवी माधव जन्मशताब्दी समारोह समिती

## अन्य पुस्तके - गद्य

१) वत्सराज उदयन २) परलोकचे संदेश ३) काजव्याचा पराक्रम (बाल सा.) ४) अंधेरनगरीतील न्याय (बालसाहित्य) ५) तीन पढतमूर्ख (बालसाहित्य) ६) बुलबुल (बालसाहित्य) ७) ऊठ सोट्या तुझेच राज्य (बालसाहित्य) ८) फार फार वर्षांपूर्वी (बालसाहित्य) ९) डोंगरातला काका (बालसाहित्य) १०) पऱ्यांची देणगी (बालसाहित्य) ११) सांजवातीच्या वेळी (बालसाहित्य) १२) तिघे प्रवासी (बालसाहित्य) १३) गाढव जावई (बालसाहित्य) १४) शालिवाहनाची कथा (बालसाहित्य) १५) तीन रण योद्धे (बालसाहित्य) १६) तीन लढाऊ प्राणी (बालसाहित्य) १७) समुद्रातील महासर्प (बालसाहित्य)

धुवून गणपतीचं दर्शन घेतलं आणि उन्हउन्हीत जेवण केलं. उकडीचे पसाभर मोठाले मोदक मोठ्या निगुतीने रांधलेले होते. इथलं हे खास पक्वान्न. दुपार टळली तेव्हा संध्याकाळी समुद्रकिनारा गाठायचा ठरवलं. कारण हातात असलेला सगळाच वेळ सत्कारणी लावायचा असं मनोमन ठरवलेलं. या गुहागरातच माधवांचे बालपणचे काही दिवस गेले. बालपणीचा काळ सुखाचा असं म्हणतात. पण विद्या मिळविण्यासाठी त्यांना शीर, गुहागर, हेदवी, रत्नागिरी अशी भ्रमंती करावी लागली. शीर गावी त्यांचं प्राथमिक शिक्षण झालं. शाळा थोडी लांब असल्याने भाऊबंदाच्या घरी राहून ते पंतोजीच्या शाळेत जात. हे पंतोजीही या भाऊबंदाच्या घरीच रहात. त्यांनी माधवांकडून स्तोत्रं, श्लोक यांचे पाठांतर करून घेतले. लहानपणापासून वाचनाचा झपाटाही मोठा. त्यामुळे भाषेची आवड निर्माण झाली. पुढच्या शिक्षणासाठी माधवांना गुहागरला ठेवण्यात आले. गुहागर हे तालुक्याच गाव. चौदा-पंधरा हजार वस्तीचं गाव मोठं टुमदार आणि निसर्गरम्य. संपूर्ण गावाला समुद्रकिनारा लाभलाय. गावाला एकच रस्ता. दुतर्फा कौलारु घरं. हिरव्या दाट झाडीतन लालचुटूक कौलारू घरं उठून दिसतात. प्रत्येक घराच्या पाठीमागे वाडी. वाडीत नारळी-पोफळी. गगनाला भिडणारे माड. या माडांखालून जाताना छत्र-चामरं, चवऱ्या आपल्या डोक्यावर धरल्यासारख्या भासतात. पुढच्या भागात आंबे, फणस, रातांबे हे कोकणचं वैभव. डोंगराच्या पायथ्याशी भातशेती. प्रत्येक घराला ऐसपैस अंगणाचं सुख. प्रत्येकाच्या अंगणात दारी सुंदर रांगोळी रेखलेली. अशा या निसर्गरम्य गावात माधवांचे बालपणातल्या काही दिवस शिक्षणाच्या निमित्ताने नाना वेलदुरे यांच्याकडे वास्तव्य होते. इथल्या निसर्गाचे संस्कार आणि एकूणच कोकणातल्या निसर्गाचे संस्कार त्यांच्यावर संस्कारक्षम वयात झाले. पुढे ते कविता लिहायला लागल्यावर कोकणच्या निसर्गाची अत्यंत रेखीव, अचूक शब्दचित्रं त्यांच्या अनेक कवितांत बहरून आली आहेत. कोकणातली झाडं, फुलं फळं, पशुपक्षी, निसर्ग, वातावरण, स्थळ, तिथल्या दंतकथा या साऱ्यांसह वास्तव आणि अदभूतरम्य कल्पकथा यांचा सुरेख मेळ त्यांनी अनेक कवितातून साधलाय. त्यांच्या या अशा कवितेला प्रादेशिकतेचं परिमाण लाभलंय. कोकणच्या निसर्गावर त्यांचं गाढ प्रेम होतं. तो त्यांच्या जिव्हाळ्याचा विषय होता. कोकणची इतकी सुंदर रसगंधमय साऱ्या ऐंद्रिय संवेदनांना सजग करणारी शब्दचित्रं फारच थोड्या कवींनी रेखाटली. त्या दृष्टीने माधवांची कविता विशेषतः हिरवे तळकोकण सारखी कविता म्हणजे मराठी कवितेतील अक्षर लेणं आहे. म्हणावसं वाटतं, कविवर्य तुम्ही ही एकच कविता लिहिली असतीत तरी रसिकगणांनी तुमच्या कवितेच मोल मानलं असतं.

गुहागरातल्या वास्तव्यात शिकत असताना कवी माधवांना इतिहासविषयक वाचनाची आवड निर्माण झाली. या काळात त्यांनी इतर वाचनाबरोबर शिवाजी महाराजांचं चरित्र, मराठी रियासत, मुसलमानी रियासत, हरिभाऊ आपटे यांच्या कादंबऱ्याचं वाचन केलं. गावात मेळे निघत त्यात ते सहभागी होत. हया मेळ्याची प्रेरणा घेऊन आपल्या गावीही त्यांनी मेळा काढला होता. गोकुळ अष्टमीला त्याचा कार्यक्रम असे. ऐतिहासिक कीर्तन आख्यान या काळातच त्यांनी गुहागरला ऐकली. राष्ट्राभिमान, स्वदेशप्रेम यांचे संस्कार चिपळूणकरांच्या निबंधमालेने झाले. ऐतिहासिक प्रसंगाची काव्यातून गुंफण आणि राष्ट्राभिमाने झळाळणाऱ्या

त्यांच्या कवितेची बैठक अशी तयार होत होती. याच सुमारास अवघ्या बाराव्या वर्षी गुहागर जवळच्या असगोली गावातल्या नऊ वर्षांच्या सीता देवस्थळीशी त्यांचा विवाह झाला. अर्थात त्यावेळच्या प्रथेनुसार झालेला हा विवाह. त्यावेळी बालपणही सरलेलं नव्हतं. या बालपणातल्या गुहागरच्या वास्तव्यात गुहागरचा देखणा समुद्रकिनारा त्यांनी कितीदातरी पालथा घातला असेल. समुद्राचं वैभव, त्याची गहराई, नितळाई आणि त्याचं रौद्र मनात साठवलं असेल. गुहागरच्या समुद्रकिनाऱ्यावर संध्याकाळचे संध्यारंग आणि सूर्यास्त पहात असताना माधवांच्या कवितेची बैठक ज्या वातावरणात तयार झाली, त्यांच्या कवितेतली सौंदर्यस्थळं त्यांना ज्या निसर्गाने दिली तो निसर्ग मन भरून पहायचा होता. इतिहासाविषयी वाटणाऱ्या असीम प्रेमातून त्यांनी तारापूरचा संग्राम, शिवकालीन रायगड, गोकलखॉं, पानीपतचा सूड, आंगरे कालीन विजयदुर्ग उर्फ खेरिया अशी एकापेक्षा एक सरस कवने लिहिली. सिंधुदुर्ग जिल्ह्यातला देवगड जवळचा विजयदुर्ग हा जलदुर्ग एकेकाळी मराठ्यांच्या आरमाराचे प्रमुख आंग्रे ह्यांचे ते प्रमुख. आरमारी ठाणे. कोकणच्या दर्यावर्दी मर्दुमकीबद्दल माधवांना वाटणारे प्रेम कोकणातला हा जलदुर्ग, सभोवतालच्या अथांग समुद्र, शूर मराठे आरमार, ऐतिहासिक तपशील त्यातून झालेली वातावरणनिर्मिती यांचा सुरेख मेळ या कवितेत आढळतो. इतिहासाचा अभ्यास केल्याने अचूक तपशील, दर्यावर्दी जीवन आरमाराविषयक समृद्ध शब्दभांडार, उर्दू, फारसी शब्दांचा वापर त्यामुळे त्यांचा या अशा कवितातील ऐतिहासिक शैली आपल्याला त्या काळात घेऊन जाते.

'जलदुर्गाचे स्थलदुर्गाचे ध्वजवृन्दाचे धनी
येथुनि करिती दुर्विणीतुनी दर्याची पाहणी
जलवन्तींची वरी निशाणी पांचजन्य जरि खुले
ढालकाठिवर शिवशाहीचे निशाण येथे झुले'

असा अभिमान त्यांनी व्यक्त केलाय.

'गलबत मचवा फत्तेमारी मारुनि फत्ते करी
विजयदुर्गची दर्यावन्ती यशवन्ती सागरी.'

असा जाज्वल्य अभिमानही विजयदुर्गाबद्दल त्यांनी व्यक्त केलाय.

जे आपल्याला मिळत नाही ते नेहमीच हवसं वाटतं म्हणूनच समुद्र दिसला की त्याचं आकर्षण वाटतं आणि समुद्र तर मला फार आवडतो. तासन् तास रेतीमध्ये बसून समुद्राच रौद्र, अथांगता, लाटांचं नर्तन, निरखणं मला आवडतं. आतापर्यंत किती समुद्र किनारे पाहिले ! गोवा, रत्नागिरी, बोर्डी, हर्णे, मुरुड, दाभोळ, पण प्रत्येक समुद्रकिनारा एक वेगळीच अथांगता दृश्य स्वरूपाला पुढ्यात घेऊन येतो. सांज कलायला आल्याने समुद्राच्या लाटा लडिवाळपणे पायांवर येत होत्या. सांध्यरंग पाण्यात मिसळू पहात होते. मऊ रेतीवर खेकड्यांनी मधूनच रांगोळी उमटवली होती.

'त्या राजाची राजसकन्या मीनाक्षी सुंदर
सांजवेळची आज पातली समुद्रतीरावर !
करुनि खेकड्यावरि आरोहण फिरते पुळणीवरी

हळुच बघा तिज नातरी भिडली जाइल ती सागरी !'

खेकड्यांची रांगोळी पहाताना कवी माधवांची 'मत्स्यकन्या' मीनाक्षी ही कविता आठवली. मत्स्यलोकीची कन्या मीनाक्षी, कमरेखाली मत्स्यरूप पण वरचा भाग माणसासारखा अशी ही मत्स्यकन्या खेकड्यावर आरोहण करून समुद्रकिनाऱ्यावर फिरते. कवीकल्पनेला अदभूतरम्यतेची जोड मिळाली की कविताही चिरकाल मनात बंदिस्त होते. शालेय पाठ्यपुस्तकातली ही कविता कायमची मनात रेंगाळून राहिलेली. सांज कलताना एक धूसर वातावरण त्या समुद्रकिनाऱ्यावर भरून राहिलेले होते. आसमानाची निळाई त्या पाण्यात उतरत होती आणि समुद्राची गहराई दोन डोळ्यांत साठवताना माधवांच्या कवितेत वारंवार उल्लेख झालेली निळावंती कुठे समुद्रात दिसते का पाहू या असा विचार सहजच मनात आला. ही निळावंती काल्पनिक, लोककथेचे परिमाण घेऊन काव्यात वावरणारी एक अदभूत शक्ती अथवा निळावंती, मत्स्यकन्या, चंदनहिरा, बनाई इत्यादी संकेत कवी माधवांच्या कवितेत सहजगत्या येतात. निळावंती ही अद्‌भूतात रमणाऱ्या माधव यांची सांकेतिक कल्पना आहे. ही एक तरुण, सुंदर, मोहक अशी मायाविनी आहे. तिचे रूप अत्यंत आकर्षक पण कृती मात्र भयंकर आणि पाशवी! अनेक वर्षांपूर्वी कोकणातील एका बंदराजवळ 'संत तुकाराम' ही आगबोट बुडाली. अनेक प्रवाशांसह खवळलेल्या समुद्रात तिने जलसमाधी घेतली.

'लाटेवरि एका राहुनी उभी पुरोभागी ये ये ये इकडे खुणावी हाते नीलांगी !
मूर्ति तिची बघुनी जाहला भास फकीरातें उठला जलखांब सागरीं गिरगिरत्या वातें
परतवली त्यानें भीतिने बोट तुकाराम, निळावंतिचें ते जाहले सुलभची मग काम !
विकट हास्य करूनी बोटिची पाठ तिने धरिली !

या ओळीतल्या वर्णनाची मनात उजळणी होत असताना एक सूक्ष्म कंप अंगागातून लहरून गेला, समुद्रावरचे वरुण देवतेचे अधिपत्य नाहीसे होऊन निळावंती या मायावी जलदेवतेने समुद्राचा ताबा घेतला. ती लाटेच्या अग्रभागी उभी राहून हाताने बोटीच्या कप्तानाला खुणावते. तिची दूरवरून दिसणारी धूसर आकृती पाहून कप्तानाला वाटतं की, सागरात जलखांब उठला आहे. तो भीतीने बोट माघारी नेतो. आणि निळावंती प्रचंड लाटांचा जबडा उघडून आपल्या बळीचा घास घेते असा सारा कल्पनाविलास या कवितेत रेखला आहे. या कवितेतल्या वातावरणाला अदभूताची जोड मिळाल्यामुळे ती एक वेगळ्या उंचीवर जाऊन पाहोचली आहे वादळाने खवळलेला दर्या आणि सारं रौद्र याचं वर्णन डोळ्यापुढे उभं करण्याचं सामर्थ्य म्हणा किंवा हातोटी माधवांना साधली आहे. हीच निळावंती हिरवे तळकोकण मधेही भेटते !

'मागें त्यांच्या डुले नारळी पोफळिंचे आगर पुढे विराजे निळावन्तिचे निळेच जलमंदिर'

प्राजक्ताच्या कळ्या जेव्हा नाजूक पाकळ्या हळूवारपणे उघडतात तो उच्छवास पिऊन बिजेचा चंद्र बेभान होऊन निळावंतीच्या घरी नाचतो अशी रम्य कल्पना ते करतात तेव्हा निळावंती खरंच आपल्या समुद्रावरल्या जलमंदिरात आहे की काय असा क्षणभर भास आपल्यालाही होतो. अहोरात्र किनाऱ्यावर थडकणाऱ्या सागरलाटांचा निरोप घेऊन परतीच्या वाटेवरून जाताना दुर्गादेवीच्या मंदिरात जाऊन आलो. गंडकी शिळेतली महिषासुरमर्दिनी सिंहवाहिनी अष्टभुजा दुर्गा ही गुहागर वासियांची कुलदेवता. शिसवीच्या कलाकुसर केलेल्या

खांबावर हे मंदिर उभे आहे.

दुसऱ्या दिवशी कवी माधवांच्या शीर गावी जायचं होतं पण त्याआधी हेदवीला जायचं ठरवलं. कवी माधवांचं जिथे जिथे वास्तव्य होतं ती गाव पहावीत असं मनात होतं गुहागरपासून अंदाजे वीस किलामीटर अंतरावर हेदवी आहे. इथला गणपती प्रसिद्ध आहे. दशभुजा गणपती मूर्ती पेशवेकालीन आहे. नुकतीच गणेशजयंती झाल्याने आवार पताकांनी सुशोभित केलेलं होतं. गणेशाची मूर्ती अत्यंत रेखीव. दशभुजा गणपतीच्या मांडीवर सिद्धहस्त लक्ष्मी आहे. असा हा भारतातला एकमेव गणपती आहे. सोंडेवर सोन्याचा वर्ख; त्यामुळे मूर्ती आणखी तेजाने झळाळते. दशभुजा मूर्तीच्या प्रत्येक हातात एकेक आयुध-महाळुंग, गदा, चक्र, त्रिशुल, धनुष्य, कमल, पट्टा, नीलकमल, दंतधान्याची लोंबी आदी. पाठीमागे केळकर स्वामींची समाधी आणि पादुका आहेत. अलीकडे मंदिराची बरीच सुधारणा केलीय. हा सारा गावच जोगळेकरांचा आहे. मंदिर स्वच्छ सुंदर, थोडं उंचावर. इथूनच साऱ्या गावाचं दर्शन होतं. गाव लहानसं पण निसर्गरम्य. जिथे दृष्टी टाकावी तिथे माड पोफळी दिसतात. एक गर्द हिरवाई साऱ्या गावावर पसरलेली दिसते. इंग्रजी शिकण्यासाठी ह्या हेदवी गावात कवी माधवांच्या वडलांनी त्यांना वर्षभर ठेवलं होतं. कृष्णराव जोगळेकर नावाच्या एम. ए. झालेल्या बुद्धिवंत गृहस्थांची विद्याश्रम नावाची शाळा गुहागरच्या परिसरात त्या काळात गाजलेली होती. या शाळेत कवी माधव वर्षभर शिकले. या गावालाही भेट देऊन झाली. पुढे वेळणेश्वरला गेलो. वेळणेश्वर हे पराक्रमी सेनापती बापू गोखले या अष्ट्याच्या मैदानावर धारातीर्थी पडलेल्या मराठ्यांच्या शेवटच्या सेनापतीचं गाव. गोखलखाँ या आपल्या कवितेतून ते

संपला इथे इतिहास शिवरायाच्या राज्याचा !
आता न राहिला काळ मर्दानी पोवाड्यांचा !
आटला झरा येथून चैतन्य युक्त वाणीचा !
अष्टाचे तरि मैदान
स्फूर्तिपद गाते गान ! आठवतो तेथिल अजून
वृक्षलता पाषाणाला गोखलखाँ लढनेवाला

अशी आदरांजली कवी माधव वाहतात. बापू गोखलेचा मृत्यू मराठे शाहीचा पूर्ण विराम ! ही एक श्रेष्ठ एतिहासिक कविता.

इथे सुंदर शंकराचे पुरातन मंदिर आहे. मंदिरातला भव्य पितळी नाग लक्ष वेधून घेणारा. मंदिरातून थोड पुढे जाऊन समुद्राचं दर्शन घेतलं. भरतीची वेळ होती. लाटांवर लाटा फुटत होत्या. भरतीचा समुद्र थोडा रौद्र वाटतो. परतताना वाटेत शृंगारतळं लागलं. गावाचं नाव मोठं विलक्षण. हे आनंदीबाई पेशवेच माहेर. मनात आलं दासदासींसमवेत मेण्यात बसून येताना शृंगारतळीला थांबून थोडं नीटनेटकं होऊन आपला साजशृंगार ठीकठाक करून आनंदीबाई मोठ्या दिमाखात वाडयावर जात असेल. शृंगारतळी वेलम रस्त्याने सगळीकडे पोफळीच्या बागाच्या बागा दिसत होत्या.

आता गाठायचं होतं शीर गाव. शीरला जाण्याची ओढ लागली होती. असगोलीच्या धांडे फार्मवर जाऊन नंतर वेलदूर. अंजनवेल एनरॉन प्रकल्प पाहून दुपारी शीरला जाऊया असं ठरलं.

गुहागरपासून असगोली अवघं वीस मिनिटांच्या अंतरावर. ही कवी माधवांची सासुरवाडी. असगोलीच्या दादा देवस्थळींची सीता माधवांची प्रथम पत्नी. माधवांनी तिचे नाव रमा ठेवलं. तिला वाचनाची आवड होती. जात्याच ती हुशार होती. लिहिता वाचता येणारी ही रमा माधवांना अनुरूप अशीच होती. घरातल्या घरात रमाला पत्र लिहून माधव आपलं मनोगत कळवत. कारण त्या काळात पतीपत्नीला मोकळेपणाने एकमेकांशी बोलताही यायचं नाही. ह्या पत्रांमधून ते रमाला आपण काय वाचलं काय लिहिलं ते कळवत. पुढे नोकरीच्या निमित्ताने ते मुंबईला गेले. संसाराचा डाव मांडेपर्यंत अल्पशा आजाराने रमाचं निधन झालं आणि त्यांचं सार भावजीवनच उद्ध्वस्त झालं. ह्या सुमारास कवी माधवांचा पहिला काव्यसंग्रह 'ध्रुवावरील फुले' हा प्रसिद्ध झाला. पण दुर्दैवाने त्यावेळी रमा हयात नव्हती. आपल्या दिवंगत पत्नीच्या स्मृतीला हा संग्रह त्यांनी अर्पण करून त्यात 'समर्पण' नावाच्या कवितेतून त्यांनी आपल्या पत्निविषयीच्या कृतज्ञ भावना व्यक्त केल्या आहेत. ती त्यांची केवळ सहचारिणी नव्हती तर सखी होती, प्रेरक शक्ती होती. तिलाही कविता लेखनाची आवड होती. तिने काही कविताही रचल्या होत्या. माधवांचं कविता लिहिणं हे एक वेड आहे असं घरच्यांना आणि दारच्यांनाही वाटत होतं तेव्हा त्यांच्या या उपेक्षेच्या काळात रमानी त्यांना साथ दिली. म्हणूनच त्यांना आपल्या पत्निविषयीची कृतज्ञता काव्यफुलातून व्यक्त करावशी वाटली.

लोकांमध्ये कवि म्हणुनिया नाव काही करावे
पावो नाश तनु मम तरी, कीर्तिरूपी उरावे !
उत्तेजूनी जरि न असता त्वा दिला धीर माते
जात्या माझ्या खचित दयिते ! सर्व आशा लयाते !

प्रिय पत्नी गेली आणि त्यांच्या जीवनातला एक अध्याय समाप्त झाला. पुढे काही काळ लोटल्यावर त्यांनी दुसरा विवाह केला. कविपत्नीचे हे असगोली गाव अगदी लहानसं पण गुहागरमधलं अतिरम्य गाव. समुद्राचं वरदान लाभलेलं. इथे धांडे नावाच्या गृहस्थांनी टेकडीचा उपयोग करून फार्महाउस तयार केलंय. टेकडीच्या नैसर्गिक उंच सखलपणाचा फायदा घेऊन त्यांनी फार चांगला उपयोग करून इथे पिकनिक स्पॉट तयार केला आहे. निरनिराळी शोभिवंत झाडं लावून सारा आसमंत देखणा करून टाकलाय. टेकडीवरून खाली पाहिलं की सभोवार अथांग दूरपर्यंत पसरलेला समुद्र आणि पाणीच पाणी फक्त पाणी आणि वर निळं आसमान. बाकी काही नाही. दूरवर माड पोफळीच्या बागेची हिरवाई पार्श्वभूमीला आणि कानाला ऐकू येणारी समुद्राची गाज. 'मी तू' पण सार गळून आपणही या निसर्गघटकातील अणुरेणू व्हावं. खरोखर भान हरपून जावं असं वातावरण. संसाराचे सारे व्यापताप विसरून त्या वातावरणात मन केव्हाच तादात्म्य पावलं. इथून आता कुठेही जाऊ नये असंही वाटू लागलं. पण वेलदूर अंजलवेल मार्गे एन्रॉन प्रकल्पापर्यंत जायचं होतं.

ज्या प्रकल्पाविषयी रोज उलटसुलट वर्तमानपत्रात वाचायला मिळतंय तो एन्रॉन प्रकल्प जिथे वसवला जातोय तो भाग पहावा तरी असं वाटलं. त्यासाठी आधी परवानगी काढून ठेवली होती. ग्रामस्थांची या प्रकल्पाबद्दलची प्रतिक्रियाही ऐकायची होती. भरमसाठ पैसा देऊन वेलदूरमधल्या जमिनी प्रकल्पासाठी खरेदी केल्याचं समजलं. गुहागरपासून जायला अर्धा

तास लागतो. सुमारे चारशे हेक्टर जमिनीवर हा प्रकल्प वसवण्यात येत आहे. हा प्रकल्प आता इथे होणार हे निश्चित झालं. ग्रामस्थांनी विरोध खूप केला पण त्यांचे प्रयत्न अपुरे पडले. वेलदूर अंजनवेल ही गाव अगदी लहानसे. त्यामुळे एकदा प्रकल्प पुरा झाला की त्याचा सारा ताण गुहागरवर येणार. कारण गुहागर तालुक्याचं गाव. निसर्गरम्य अशा आजूबाजूच्या गावांचं शहरीकरण व्हायला वेळ लागणार नाही. निसर्गरम्य असा परिसर म्हणून जे आकर्षण आहे ते त्यामुळं कमी होईल. म्हणून हा प्रकल्प म्हणजे नैसर्गिक संपत्तीचा नाश असं मत इथल्या लोकांचं आहे. चिपळूण गुहागर पासून थेट एन्रॉन पर्यंत जायला रस्ता केलाय. परिसर खूप मोठा. आम्ही गाडी घेऊन गेलो त्यामुळे थेट सारा परिसर पहाता आला. काम तसं अजून प्राथमिक स्वरूपात आहे. मध्यंतरी ते बंदच होतं. समुद्रात भराव घालून समुद्र हटवला आहे. तिथे उभं राहून समोर पाहिलं तर दूरवर दाभोळ बंदर दिसतं. या प्रकल्पामुळे जलसंपत्तीचा नाश होईल की काय अशी भीतीही आहेच. नेप्थॉन वायूवरचा हा वीज प्रकल्प त्यामुळे हा वायू समुद्रात सोडल्यावर त्याचा परिणाम जलचर प्राण्यांवर होणार काय? हेही पहायला हवंच. भराव घालून समुद्रात जिथे जमीन तयार केली होती त्या टोकापर्यंत आम्ही गेलो. तिथूनही समुद्राच विराट दर्शन होत होतं पण असगोलीच्या धांडे फार्मच्या टेकडीवरून पाहिलेला समुद्र किंवा वेळणेश्वर, गुहागरच्या समुद्र किनाऱ्यावरून समुद्र पहाताना मन हर्षोत्फुल्ल झालं होतं तसं झालं नाही. कदाचित या प्रकल्पाबद्दलच्या मनात आलेल्या अनेक प्रश्नांमुळेही असेल कदाचित. ते प्रश्न तिथेच सोडून निघालो. आता इच्छित स्थळी पोहोचायचं होतं कवी माधवांच्या शीर गावी दोन दिवस लीलाताईंचं आदरातिथ्य झोडत त्यांच्या मार्गदर्शनाखाली कोकणतला हा सारा आसमंत न्याहाळणं चालू होतं.

गुहागरहून मळणच्या पुढच्या फाट्यावर शीर. शीरला जायला तास लागला. दुतर्फा अनेक दाट झाडं. पण सगळ्याच झाडांची ओळख नव्हती. कवी माधवांनी आपल्या कवितेतून असंख्य झाडांची, वनस्पतींची, फुलांची वर्णने केली आहेत. केवढं दांडगं निरीक्षण आणि अभ्यास त्यांनी केला असेल? या निसर्गसृष्टीचं आपण अवलोकन करू लागलो की निसर्गातील तपशीलांचा आलेख. झाडापेडांचं वर्णन, माधवांनी किती अचूक केलंय याचा प्रत्यय येतो. फळांचा राजा आंवा म्हणजे कोकणचा खास मेवा.

झिम्मा खेळे कोकणचा तो नृपाळ म्हणती मुली,
गळे वसन्ती टपटप जेव्हा आंब्याची डाहळी !
पिकले आंबे गळुनि भूतली रस जोंवरि वाहतो
वनदेवींसह खेळत झिम्मा तोवरि नृप राहतो!

परिपक्व आंब्यातला सारा रसाळपणा या पंक्तीत उतरलाय. कारण माधवांच्या सूक्ष्म निरीक्षणाचा परिसस्पर्श कोकणातल्या परिसरातल्या अवघ्या वस्तुजाताला घडलाय. असोगी-अशोकवृक्ष, औदुंबर, पांगारा, शेवरी, आईन, किंजळ, बेहडा, भेंडा, डंडीण, बकुळ, नादवटी, कोरांटी, नेवाळी, रातांबा, खुरचाका या वृक्षांखेरीज अनंत, कुरवक, नादवरी, कोरांटी, नेवाळी, आणि आमटी (वावडिंगाचे झुडूप) करमर कौंडल, काटली, कुरडू, कुडा, कोचिंदे, गोमेटी, चिरफळ, पांढरी सात्वीण, नेवाळी, बचनाग, मारवेल, वाळा, शितेचे पोहे, सोनावळ, सावड

अशा अनेक रानटी फुलांना कवी माधवांच्या कवितेत मानाचं स्थान लाभलंय. अवघं कोकणचं निसर्गवैभव आणि निसर्गलाघव त्यांच्या कवितेत अवतरलंय आणि याबरोबरच या परिसरातल्या दंतकथांची गुंफण त्यांनी आपल्या कवित्वशक्तीनं चपखलपणे केलीय. वानर, खारी, राघू, मैना, हे आपल्याला माहित असणारे पशुपक्षीखेरीज भिलकवडा, चामण, ढिसा, कुक्कुटकुंभ, ककणेर, काळिंदर हे अपरिचित पशुपक्षीही त्यांच्या कवितेतून कळतात. आजूबाजूची झाडी न्याहाळताना वाटलं की यातल्या कितीतरी किंवा सर्वच वृक्षवेलींना माधवांच्या कवितेत स्थान मिळालंय.

आसमंत न्याहाळेपर्यंत शीर गावाशी येऊन पोहोचलोही. गावात काटदऱ्याची दहा बारा घरं. थोडी चौकशी केल्यावर काटदऱ्यांचा पत्ता मिळाला. शीर. कवी माधव केशव काटदऱ्यांचं गाव. पायउतार होऊन त्यांच्या घराकडे निघालो. घराकडच्या वाटेत किंबहुना त्यांच्या घराच्या परिसरात संपूर्ण सुपारीची बाग बांधाच्या कडेने. बागेतून झुळुझुळू पाणी वहात होतं. अंगणातून घरात शिरताना लक्ष वेधलं ते सुंदर कडीपाटाच्या अंगणातल्या झोपाळ्यानी आणि सभोतालच्या सुंदर रंगीबेरंगी फुललेल्या फुलांनी. घर प्रशस्त दुमजली. दार उघडायला आल्या त्या कवी माधवांच्या चुलत नातसून. माधवांचं हे वडिलार्जित घर आता वाटण्या होऊन चुलत घरी गेलंय. मी त्या नातसूनबाईंना येण्याचा हेतू सांगितला. त्यांच्याजवळ कवी माधवांची फारशी माहिती नव्हती. माधवांच्या द्वितीय पत्नी भेटतील आणि त्यांच्याकडून बरीचशी माहिती मिळेल असं येताना वाटलं होतं. पण आता त्यांचं वास्तव्य चिपळूणला असतं असं समजलं. कोकणभूमीत येऊन त्यांची भेट झाली नाही याचं वाईट वाटलं. परत चिपळूणला जाऊन त्यांची भेट घ्यावी एवढा वेळही नव्हता. त्यांच्या भेटीचा योग नव्हता. पण प्रश्न थोडासा सुटला. मुख्य घराच्या मागच्या बाजूला कवी माधवांचे दुसरे पुतणे दत्तात्रय गंगाधर काटदरे राहतात. त्यांच्याकडे माहिती मिळेल असं समजलं. त्यांच्याकडे जाण्यापूर्वी कवी माधवांच्या घरात फिरून आलो. दुमजली प्रशस्त घरात ओटी, पडवी, माजघर, दिवाणखाना ऐसपैस छान घर. बालपणातले काही दिवस त्यांनी या घरात घालवले. कोकणभूमीवर नितांत प्रेम करणाऱ्या आणि या भूमितली रम्य निसर्गचित्रे आपल्या कवितेतून तन्मयतेने रेखाटणाऱ्या या कवीचा जन्म मात्र मलकापूरचा. मलकापूर हे कोल्हापूर संस्थानातील विशाळगड जहागिरीतीलं माधवांचं आजोळचं गाव. माधवांच्या आई आनंदीबाईंचे वडील श्रीधरपंत खेर हे विशालगडकर पंतप्रतिनिधींच्या पदरी मलकापूर येथे खाजगीकडे कारकून होते. माधवांचे वडलांचे वडील शीर गावातले नावाजलेले बागायतदार. शीर हे दोन अडीच हजार वस्तीचं गाव. हे त्यांचं खोती गाव. खोत म्हणून त्यांना गावचे लोक मानत. खाऊन पिऊन सुखी कुटुंब. श्रीधर काटदरे हे माधवांचे वडील. धार्मिक संस्कार, वडील माणसांकडून रामायण, महाभारतातल्या कथा, संतांची चरित्रं, श्लोकांचं पाठांतर असे संस्कार बालपणी माधवांवर झाले ते याच घराच्या साक्षीने. या घराभोवतीच्या निसर्गरम्य परिसरात त्यांचे बालपण गेलं. पुढे नोकरीव्यवसायानिमित्त ते मुंबईला गेले तरी त्यांच्या कवितेला ध्यास होता तो त्यांच्या कोकणभूमीचा. त्यांच्या कवित्वाची नाळ आपल्या भूमीपासून कधीच तुटली नाही. माधवांच्या चुलतघरातील मंडळींचा निरोप घेऊन आम्ही मागील भागात रहात असणाऱ्या दत्तात्रय गंगाधर काटदरे यांच्याकडे गेलो. दारातच

त्यांच्या पत्नी भेटल्या. कवी माधवांचं घर पहायला आम्ही पुण्याहून आलोय हे कळल्यावर त्यांना कौतुक वाटलं. त्यांनी घरात नेलं. घर बैठं पण प्रशस्त. इथेही सुंदर फुलांची बाग. ते उठून येईपर्यंत आम्ही त्यांच्या पत्नीसह घराभोवतीच्या परिसरात पाय मोकळा करून आलो. चोपलेलं सुंदर अंगण आणि भोवती बहरलेली सुंदर बाग. मंदार सर्वत्र फुलला होता. संपूर्ण बांधाच्या कडेने मंदार लावलेला होता. चित्रकाची लाल चुटूक फुलं मी पहिल्यांदाच पहात होते. चित्रकाची पांढऱ्या, पिवळ्या रंगाची फुलंही असतात याची माहिती मिळाली. बांधाच्या दुसऱ्या बाजूने कांचनाची झाडे. शेती हाच प्रमुख व्यवसाय. बांधावर इतर फुलवेली आणि भेटली कृष्णकमळाची वेलही. कृष्णकमळाची निळी जांभुळली फुलं पाहिली आणि मन आनंदून गेलं.

कुंजात हिच्या घे कान्हा  मुरलीवर मोहक ताना
म्हणुनीच हिच्या सुमनांचा  मन्द गन्ध मोहक साचा
कुंजात हिच्या घननीळ  प्रीतिचे खेळला खेळ,
म्हणुनीया हिच्या सुमनांचा  रंगनील लोहित साचा !

या चिमुकल्या कवितेत कवी माधवांनी कृष्णकमळाच्या फुलांचं अतिसुंदर वर्णन केलंय त्याला तोड नाही.

बागेचा मोह आवरता घेऊन आम्ही घरात गेलो. दत्तात्रय काटदरे यांच्याशी ओळख करून घेतली. तोपर्यंत पुढ्यात चहा आला. सकाळपासून भ्रमंती चालू होती. चहा पिऊन जरा ताजगी आली. दत्तात्रय काटदरे आपल्या चुलत्यांच्या कवी माधवांच्या अंगाखांद्यावर खेळलेले. त्यांना आपल्या चुलत्यांच्या अनेक आठवणी आल्या. आमचे चुलते माधव आम्ही त्यांना दादा म्हणत असू ते नोकरीनिमित्त मुंबईला वास्तव्य करून होते तरी त्यांच्या ओढा कायम गावाकडे होता. मधून मधून ते शीरला येत. सुट्टी नसेल तर रजा घेऊनही येत. अत्यंत सात्विक वृत्तीचे. धोतर-कोट-टोपी असा त्यांचा पेहराव होता. मुंबईला गेले तरी यात बदल झाला नाही. मुलांजवळ फार ममतेने वागत. त्यांची मुलसुद्धा सुट्टीत रहात. मुंबईहून खाऊ, फटाके, दिवाळीत पाठवत, पुतण्यांसाठी आवडीचा खाऊ खेळणी पाठवत. पुस्तकं पाठवत. कधी रागवत नसत. वृत्तीने शांत होते.''

'कवी माधवांना तीन भाऊ होते. वडील शेती करत. भात, नाचणी खेरीज नारळ, सुपारीची बागायत. शहरी लोकांना ठाऊक नाही अशा सुंदर वनस्पतींची चित्रं माधवांनी काढली. उत्तम चित्रं काढली. रंगसंगती आणि प्रमाणबद्धतेच्या दृष्टीने ती फार उत्तम आहेत. त्यांना तो नादच होता. पण त्यांच्या आजोबांना आवडायचं नाही. पण पुढे मात्र त्यांनी आपला हा छंद चालू ठेवला. उत्तम रंगसंगती त्यांच्या चित्रात आहे. चिपळूणच्या वासिष्ठीला दरवर्षीच पूर येतो. पण त्यावर्षी फार मोठा पूर आला. त्यावेळी दादा हयात होते की नाही हे आठवत नाही पण त्यातली बरीचशी चित्रं पुरात नष्ट झाली. त्यांनी आपलं आत्मचरित्रही लिहिलं होतं. त्याचेही काही कागद नष्ट झाले. तीन खंडाचं सुमारे २४० पृष्ठांचं हे आत्मचरित्र. त्यातून त्यांची विद्यार्थी दशा त्यांचा व्यासंग, प्रथम पत्नीबरोबरचे त्यांचे वाङ्मयीन सहजीवन ह्यांवर प्रकाश पडतो.' माधवांचे पुतणे ही माहिती सांगत होते. त्यांचे वडील म्हणजे कवी माधवांचे मधले भाऊ. पाठचे भाऊ

दिवंगत झाले आणि सगळ्यात धाकट्यांना मूळ घर वाटणीला मिळाले. ४७ साली माधवांचा ब्लडप्रेशरचा व्याधी वळावला. त्यावेळी आजच्यासारखी औषधे उपलब्ध नव्हती. नोकरी सोडून ते चिपळूणला स्थायिक झाले. नंतर नंतर त्यांना प्रवास झेपत नसे. मग क्वचित त्यांचं शीरला येणं होई. कवी माधव प्रसिद्धीपराङ्मुख होते. त्यांना हवी तशी प्रसिद्धी त्यांच्या हयातीत मिळाली नाही याची खंत त्यांच्या पुतण्यांनी व्यक्त केली. पण मला त्यांना सांगावंसं वाटलं की हिरवे तळकोकण ही कविता अक्षर वाङ्मयात झळकत राहिली आहे. त्यामुळे कवी माधव हे नाव मराठी काव्यजगतात अमर झालं आहे.

'शंकर गेले वनात म्हणुनी मनात गिरिजा झुरे
वेष घेऊनी भिल्लिणीचा मग वनोवनी संचरे
सह्याद्रीच्या तळी उतरली गौरी विरहाकुल
गेंद गळाले ! आणि अश्रुंसह नयनांतील काजळ !'

अशा पौराणिक संदर्भांनी, लोककथांनी आणि निसर्गातील नानाविध फुलांच्या वनस्पतींच्या वर्णनांनी ही कविता झळाळून राहिली आहे.

कवी माधवांच्या कवितेचा वारसा त्यांच्या पुतण्यांकडे-दत्तात्रय काटदरेंकडे गेला आहे. त्यांनीही पुष्कळ कविता केल्या आहेत. त्यांचा निरोप घेऊन निघालो. अजून गाव पहायचा होता. या परिसरातल्या व्यक्तीरेखा, इथली वर्णनं, अन्नपूर्णा, काळडोह, या साऱ्यांचं आकर्षण होतंच. गावातून वाहते ती अन्नपूर्णा नदी, साळकाईचा डोह गावातल्या डोंगराच्या पलीकडे, गावात दोन मंदिर आहेत. एक अंबावाईचं दुसरं महालक्ष्मीचं. महालक्ष्मीचं देऊळ सुंदर आहे. १९३५ साली ह. वि. मोटे यांनी कवी माधवांची कविता प्रकाशित केली. कविता लिहिण्यावद्दल पैशाच्या स्वरूपात मोबदला घेण्याचे त्यांचे ब्रीद नसल्याने मिळालेला २०० रु. मोबदला त्यांनी या लक्ष्मी केशव मंदिराच्या जीर्णोद्धारासाठी दिला. मुंबईत राहून ते त्याकाळात लक्ष्मी केशव मंदिराच्या जीर्णोद्धारासाठी निधी जमवत. मंदिराच्या जीर्णोद्धारासाठी त्यांनी खूप प्रयत्न केले. आज हे मंदिर सुस्थापित आहे. गाव अगदी लहानसं पण गावातली घरं आखीव रेखीव. माडापेडांनी वेढलेली. डोगराच्या पलीकडे वहाते ती साळकाई-घोळकाई नदी. या इथल्या डोहालाच काळडोह म्हणतात. हा सारा परिसरच मंत्रमुग्ध करणारा. दोन्ही बाजूंनी उंच डोंगर आहेत. कडांमधून मोठमोठी झाडं वाढली आहेत. या वाढलेल्या झाडांची सावली डोहात सदैव उतरलेली. त्यामुळे त्याचे पाणी काळसर दिसतं. एक अदभूत असं वातावरण या परिसराला त्यामुळे लाभलंय जे कवी माधवांनी आपल्या कवितेतून जिवंत केलंय. आधीच त्यांना अदभूताचे आकर्षण. त्यातून दंतकथेला जर अदभूताचं वलय लाभलं तर ती नितान्त सुंदर होणारच. 'मोऱ्यांची मोहना' हे त्यांच कथाकाव्य वाचताना याचा प्रत्यय येतो. कोकणातल्या या शीर या खेडेगावातील कन्या मोहना आणि तिचा प्रियकर मोहन त्यांच्या शोकांन्त प्रणयाची ही कहाणी. मोठी हृद्य आहे. प्रियकराच्या अकाली निधनाने मोहनेची सारी स्वप्नं धुळीला मिळतात. आणि मागे रहातात अतृप्त इच्छा, विरहव्याकुळ मोहना प्रियकरावरोवरचे प्रणयाचे विविध खेळ आठवत साळकाईतील डोहाच्या काठी उभी असते तोच तिचा प्रियकर अकस्मात तिच्या समोर येऊन उभा रहातो. ती भीतीने थरथर कापू लागते. तेव्हा तो म्हणतो,

असती ज्यांच्या जित्या वासना, मरणे त्यांना मना !
कशी न जाणे चतुर शहाणी मोऱ्यांची मोहना?

'असे म्हणून तो फणशीखाली उभ्या केलेल्या घोड्यावर घालून तिला घेऊन जातो. आणि मग-

'बारा वांवा सुंभ सोडिले तरि न गावला तळ साळकाइंतिल काळडोहिचे अस्थिर गहिरे जळ
वारु शिरे त्या जळी धन्याची पुरवाया कामना जळी बुडाली मोहन आणिक मोऱ्यांची मोहना'

दोन्ही प्रेमी जीवांना पाण्यात जलसमाधी मिळते. त्या ठिकाणी एक मनोहर जुवं (बेट) आपोआप पाण्यातून वरती येतं. आणि त्याबेटावर रोज रात्री अजूनही आपल्या प्रियकराबरोबर मोहना प्रणयक्रिडा करत विहरत रहाते. प्रादेशिकतेचं परिमाण लाभलेली ही अदभूतरम्य कहाणी काळजाचा ठाव घेणारी. बालेभोंक ..., टीं टीं करत येणाऱ्या टिटव्या, यांच्या वर्णनाने कवितेतलं अदभूत वातावरण अधीकच गहिरं झालं आहे. वाघजाईचं आणि खेमाचं देऊळ पोकी. धोंड, कवडेकोंड, काळडोह हे सारे शीर गावातले स्थलविशेष प्रादेशिक शब्दकळेतून कवितेत अवतरताना त्यांनाही एक काव्यमय परिमाण लाभलंय.

आता परतीचा प्रवास.
आजूबाजूला वाढलेल्या रानावनातील -
'तुरे साजिरे तांबुस ढवळे खोवुनि अपुल्या शिरी
हर्षभराने डोलत राहे वनांत कुरडू तरी '

असं माधवांनी वर्णन केलेली ही कुरडू दिसते काय पहायची होती. सोनावळीची फुलं पहायची होती. कोकणातली ही रानफुलं पण कवितेत स्थान देऊन आगळं सौंदर्य कवी माधवांनी या उपेक्षित फुलांना दिलंय पण ही फुलं कोणती ते कसं समजणार? कारण शहरात ती कधी पाहिलीच नाहीत मग कवितेतच त्यांचं वर्णन वाचायचं -

गन्ध तुला जरि नसला
भ्रमा तुला जरि भुलला
आदरितो परि तुज तो
पुष्पमित्र जो म्हणवितो तो कानी
ये वाणी 'सोनावलं मी राणी'

फार आवडली ही सोनावळ राणी पण कवितेतल्या वर्णनातली !

कोकणात लोककथांचं पेवच. या लोककथांतून वावरणारी आणखी एक प्रणयी जोडी. म्हणजे चंदनहिरा आणि बनाई. हे परिसदृश्य छोटे जीव 'एका रात्रीची गंमत' मध्ये त्यांचे वर्णन कवी माधव देतात -

वनी गालिच्यावरी फुलांच्या बसला चदंनहिरा
वनदेवांचा चिमणा राजा बनाईचा नोवरा
सान्निध्य त्याच्या बसली त्याची चिमणी ती नोवरी
इवली इवली पुष्पभूषणे घालुनि अंगावरी

कोकण वर्णनपर कवितेतून निळावंती मत्स्यकन्या, चंदनहिरा, बनाई आदि संकेत माधव कवितेतून मांडतात. शीर गावातून परतताना एका अदभूत रम्य वातावरणातून भारलेल्या वृत्तीनेच

मी परतीच्या प्रवासाला लागले. कोकणची इतकी सुंदर शब्दाचित्रं फार थोड्या कवींनी आपल्या कवितेत रेखाटली. माधवांनी तर ती अतिव जिव्हाळ्याने रेखाटली. ह्या कोकणच्या भूमिपूत्राची कविपुत्राची त्याच्या हयातीत फारशी दखल घेतली नाही असं जरी दत्तात्रय काटदरे म्हणाले तरी कवी माधवांच्या षष्ट्यब्दीपूर्तीचा सोहळा चिपळूणकरांनी मोठा गौरवाने केला. ज्येष्ठ साहित्यिक कै. ना. ह. आपटे यांच्या अध्यक्षतेखाली त्यांचा सत्कार झाला. चिपळूण नगर परिषदेने माधवांना सन्मानपत्र दिले.

१९९२ साली कवी माधवांच्या जन्मशताब्दीचं औचित्य साधून पाहिलं मराठी कोकण साहित्य सम्मेलन चिपळूणमधे कवी मंगेश पाडगावकर यांच्या अध्यक्षतेखाली झालं. आपल्या अध्यक्षीय भाषणात ते म्हणाले, 'कोकणच्या या भूमीनं अनेक तेजस्वी रत्नं महाराष्ट्र सारस्वतला दिली. माधव हे त्यापैकी एक देखणे रत्न. इथल्या निसर्गाचं रेखीव रसरशीत चित्रण कवी माधवांनी आपल्या कवितेतून केलंय.'

कवी माधवांच्या स्मृत्यर्थ तयार करण्यात आलेल्या शब्दशिल्पावर हिरवे तळकोकण या कवितेतल्या १४ ओळी लिहिल्या आहेत. हिरवे तळकोकणचं चिपळूणमधे या शताब्दी निमित्ताने कायमस्वरूपी केलेलं हे शब्दशिल्प हीच त्यांना वाहिलेली आणि त्यांच्यासाठी गौरविलेली आदरांजली. ३ सप्टेंबरला त्यांच्या मृत्यूला चाळीस वर्ष होत आहेत. काळ लोटला पण हे हिरवे तळकोकणचं शब्दशिल्प कायम हिरवंगारच राहील.

□

डॉ. मंदा खांडगे,
२४ ऋणानुबंध, डी. पी. रोड, औंध, पुणे ४११ ००७.

भाई वैद्य

## आचार्य अत्रे नावाच्या विराट वादळाचे छायाचित्रण !

आचार्य अत्रे नावाचे एक विराट वादळ महाराष्ट्रभूमीवर घडून गेले त्याचे स्मरण मराठी मन मनस्वीपणे व आवडीने सतत करत असते. कवी, विडंबनकार, शिक्षक, शिक्षणशास्त्रज्ञ, नाटककार, चित्रपटकार, पत्रकार, वक्ता, राजकारणी अशा अनेकविध नात्यांनी उभ्या आडव्या धाग्याप्रमाणे अत्रे हे नाव मराठी मनांत कायमचे गुंफलेले आहे. अत्रे या नावाचे स्मरण होताच आठवणींच्या लाटांवर लाटा निर्माण होतात. आणि मराठी माणूस त्यांत दंग होऊन जातो. कोणत्याही मार्गाने जा एखादे जंक्शन स्टेशन पुन्हा पुन्हा भेटावे तसे अत्रे नावाचा जंक्शन माणूस नेहमी जीवनात येतो. अत्रेंच्या जन्मशताब्दी वर्षाचा प्रारंभ १३ ऑगस्ट १९९७ रोजी झाला आणि त्यानिमित्ताने पुणे, मुंबई, सासवड येथे अणि अन्यत्र कार्यक्रम आयोजित करण्यात आले. आयोजित करण्यात आलेल्या कार्यक्रमांत सुप्रसिद्ध प्रकाशक श्री. सर्जेराव घोरपडे आणि मित्रमंडळींनी आखलेला कार्यक्रम वैशिष्ट्यपूर्ण होता. 'आचार्य अत्रे: प्रतिभा आणि प्रतिमा' हा शतसंवत्सरी




*आचार्य अत्रे यांच्या जन्मशताब्दीच्या निमित्ताने प्रकाशित झालेल्या या प्रचंड ग्रंथाने समग्र अत्रेच त्यांच्या विविध रूपगुणांसमवेत वाचकांना सादर होत आहेत. या ग्रंथाचा परिचय त्या ग्रंथांतील वैविध्यपूर्ण 'अवतरणां'सह करून दिला आहे. त्यामुळे नव्या पिढीला आचार्य अत्रे यांचे समग्र वाङ्मय निश्चितच वाचावेसे वाटेल.*
*संपादक*



अनुक्रमणिका

समालोचक ग्रंथ त्यांनी सिद्ध केला आणि सर्वोच्च न्यायालयाचे माजी मुख्य न्यायाधिश श्री. यशवंतराव चंद्रचूड यांच्या हस्ते या देखण्या व भारदस्त ग्रंथाचे प्रकाशन केले. ग्रंथाचे कार्यकारी संपादक नामवंत समीक्षक डॉ. वि. भा. देशपांडे हे असून त्यांना संपादनसहाय्य शिरीष पै, विजय कुवळेकर, मीना देशपांडे व सर्जेराव घोरपडे यांनी केले आहे. ग्रंथाचे संपादन साक्षेपी झाले असल्याच्या खुणा सर्वत्र आढळतात. कार्यकारी संपादकांनी प्रारंभीच स्पष्टपणे मांडले आहे की केवळ गौरवग्रंथ असे त्याचे स्वरूप नसून आचार्य गेल्यावर आता पंचवीस-तीस वर्षांच्या कालावधीनंतर त्यांची प्रतिभा आणि प्रतिमा कशी आहे, याचा शोध घेण्याचा हा यत्न आहे. आचार्य अत्रे यांच्या शब्दांतच उदाहरणांची जोड दिल्यामुळे तर हा ग्रंथ हृद्य बनला आहे.

मी कसा झालो या ग्रंथामध्ये आचार्यांनी आपल्या भूमिकांच्या समर्थनार्थ आणि अनुभवावर जे बहारदार व अतुलनीय असे रसदार विवेचन केलेले आहे ते विविध भागांतून

### *'मी कसा झालो' अत्यंत दर्जेदार साहित्यकृती*

*अत्र्यांनी साहित्याच्या अनेक क्षेत्रांत लक्षणीय कामगिरी केली; पण तरी त्यांनी लिहिलेल्या इतर सर्व साहित्यापेक्षा 'मी कसा झालो' ही अत्यंत दर्जेदार साहित्यकृती आहे असं माझं विचारांती मत झालं आहे. याचं एक कारण असं, की या आत्मचरित्राचा नायक आहे प्रल्हाद केशव अत्रे, हा अफाट, नाना क्षेत्रांत कर्तृत्व गाजवणारा, नाट्यपूर्ण वादळी जीवन जगणारा, विविध प्रकारचे अनुभव मार्मिकपणे टिपणारा, खळाळत्या उत्साहाने भारलेला, विधिनिषेध न मानता, मनाला येईल ते करणारा प्रचंड माणूस. अत्र्यांच्या कुठच्याही कथेला, नाटकाला अगर चित्रपटाला असा नायक लाभलेला नाही. तसंच, त्यांच्या लेखन कर्तृत्वाच्या सर्व अंगांना ज्यात वाव मिळेल, अस साहित्यातलं हे माध्यमही त्यांना अन्य लेखनांत लाभलं नाही.*

*अत्र्यांनी या पुस्तकातल्या पहिल्या लेखातच १९२० पूर्वीच्या पुण्याचं जे अप्रतिम वर्णन केलं आहे, ते त्यांच्या विडंबनगीतांत, नाटकांत अगर पटकथांत करता आलं नसतं. त्यांच्या जीवनाची विविध क्षेत्रांतल्या यशापयशाची आणि चढउतारांची कथा कुठच्याही नाटकात अगर पटकथेत मावली नसती. हास्यकारक आणि कारुण्यपूर्ण प्रसंगांचं चित्रण तितक्याच प्रभावीपणे करण्याची त्यांची क्षमता देखील या अन्य लेखन प्रकारात एकत्रितपणे व्यक्त होऊ शकली नसती; आणि असं गुंतागुंतीचं, अनेकवेळी, अनपेक्षितपणे दिशा बदलणारं कथानक, नाटक, चित्रपटाला तर सोडाच, पण एखाद्या कांदबरीलाही पेलणं अवघडच होतं आणि त्या काळांत कादंबरीच्या स्वरूपाविषयी जे संकेत रूढ होते, त्यांत तर ते बसणं शक्यच नव्हतं.*

*गंगाधर गाडगीळ*

*(आचार्य अत्रे- प्रतिभा आणि प्रतिमा प्रस्तावनेमधून)*

## *'झेंडूची फुले'- लोकप्रिय*

*'झेंडूच्या फुलां'ना महाराष्ट्रात जेवढी लोकप्रियता मिळाली, तेवढी कोणत्याही काव्यप्रकाराला आजपर्यंत मिळालेली नाही, हे अगदी सत्य आहे. 'झेंडूच्या फुलां'मुळे विडंबनाला मराठी वाङ्मयामध्ये स्वतंत्र स्थान मिळाले आणि त्या विषयावर गेल्या पंधरा-वीस वर्षांमध्ये अनेक विद्वानांनी विवेचनात्मक लेख लिहून चर्चा केली. शाळेच्या आणि विश्वविद्यालयाच्या अभ्यासक्रमात विडंबन-काव्याचा शिरकाव झाला. मध्यंतरी काही वर्षे तर विडंबन-काव्याला महाराष्ट्रात असा पूर येऊन गेला, की काही विचारू नका. तथापि, श्री. अनंत काणेकर आणि श्री. दत्तू बांदेकर यांच्या खेरीज विडंबन-काव्यप्रकार माझ्यानंतर कोणालाही विशेष साधलेला नाही, असे माझे प्रांजळ मत आहे. गद्य विडंबने लिहिण्याच्या बाबतीत श्री. पु. ल. देशपांडे यांनी अलिकडे कौतुकास्पद यश मिळवले आहे, हेही मला या ठिकाणी नमूद करावेसे वाटते.*

*आचार्य प्र. के. अत्रे*
*(मी विडंबनकार कसा झालो?)*



## *झेंडूची फुले : विनोदाचे उत्तम दर्शन !*

*अत्र्यांच्या झेंडूच्या फुलांनी जर फार मोठे असे कुठले कार्य साधले असेल, तर पन्नास एक वर्षांपूर्वीच्या केवळ मराठी काव्य-सृष्टितल्याच नव्हे, तर सामाजिक जीवनातल्या वास्तवाचं हसत-हसत दर्शन घडविले. अस्सल आणि भेसळ काय, हे त्यांच्या झेंडूच्या फुलांनी मराठी रसिक समाजाला दाखवून दिले.*

*अत्र्यांच्या विनोद बुद्धीविषयी नव्याने सांगायला पाहिजे असे काही नाहीये. पण त्यांच्या विनोदाचे उत्तम दर्शन घडते, ते झेंडूच्या फुलांत. नुसत्या त्यांतल्या विडंबन-कवितांतच नव्हे, तर त्यात ठिकठिकाणी ज्या मार्मिक गद्य टिपा आहेत, अर्पणपत्रिका वगैरे आहेत, त्या मजकुरात सुद्धा. मुळातली एखादी चांगली कविता विनोदासाठी विकृत करणे म्हणजे विडंबन नाही. एक तर कुठलीही कलाकृती ही नुसतीच विकृती असून चालत नाही. तिच्यात कलागुण असावाच लागतो.*

*चांगली विनोदनिर्मिती ही त्यामुळेच केवळ विकृती राहत नाही. विसंगतीचे दर्शन आणि विकृती यांच्यातला फरक ध्यानात घ्यायला हवा. त्यामुळे विडंबन-कविता म्हणजे दुसऱ्या एखाद्या कवितेच्या टवाळावर चालविलेला बिनभांडवली धंदा नव्हे.*

*कवितेची विडंबने करायला चांगल्या विनोदबुद्धीच्या जोडीला चांगली कवित्वशक्ती ही असावी लागते.*

*पु. ल. देशपांडे*
*('झेंडूची फुले: एक विडंबन काव्य)*



अनुक्रमणिका

दिल्यामुळे या ग्रंथाची गुणवत्ता व वाचनीयता भरपूर वाढलेली आहे. 'आचार्य अत्रे: एक खरीखुरी अतिशयोक्ती' ही थोर कथाकार श्री. गंगाधर गाडगीळ यांनी लिहिलेली समालोचनात्मक विस्तृत प्रस्तावना हे या ग्रंथाचे महत्वाचे वैशिष्ट्य आहे. अत्रेंच्या विविध कामगिरीला असलेली सामाजिक पार्श्वभूमी विस्ताराने मांडूनच गाडगीळांनी अत्रेंची वैशिष्ट्यपूर्ण कर्तबगारी मांडली आहे. महाराष्ट्राच्या आधुनिक इतिहासांतील ही प्रचंड अतिशयोक्ती होती असे सार्थ विश्लेषण त्यांनी केले आहे. मात्र अत्रेंच्या वरील खुनशीपणाचा आरोप अतिशयोक्त वाटतो. फडकेंच्या बरोबरीचा आपला वादही संपुष्टांत आणणाऱ्या अत्रेंच्या वरील हा आरोप अयथार्थ आहे. म. म. पोतदार तर म्हणतात की, अंतरी निर्मळ, वाचेचा रसाळ, त्याचे गळां माळ असो-नसो हे तुकोबांचे वचन आपल्या हृद्यावर अत्रे यांनी कोरून ठेवलेले होते.

भले तरी देऊ गांडीची लंगोटी । नाठाळांच्या माथा हाणू काठी ॥

हा तुकोबाचा परखडपणा त्यांनी आयुष्यभर पाळला, मात्र कोणाबद्दलचा मत्सर बाळगला नाही. ओवी व शिवी या दोन्हींचीही आराधना त्यांनी केली; परंतु ओवीबद्दलचा भक्तिभाव अधिक होता याचा पुरावा 'समाधीवरील अश्रू' आहेत.

एकूण वीस भागांत विभागलेला हा ग्रंथ सर्वसमावेशक घडला असून आचार्य अत्रे यांचे बहुरंगी व बहुपेडी व्यक्तिमत्व फार ठसठशीतपणे साकार झाले आहे. आचार्य अत्रेंच्या स्वत:च्या मांडणीबरोबरच त्या त्या विभागांतील विषयाचे समीक्षण करण्यासाठी ज्या लेखक मंडळींचे सहाय्य संपादकांनी मिळविले ती नावे पाहूनच या ग्रंथ संपादनामागची साक्षेपी दृष्टी व अपार परिश्रम ध्यानी येतात. वक्ता शतसहस्रेषु या विभागासाठी बाज वेगळा पण तीच प्रत असलेले राम शेवाळकर, चित्रपटकार अत्रे यासाठी मशहूर कलासमीक्षक ज्ञानेश्वर नाडकर्णी, गीतकार अत्रे यासाठी, थोर कवयित्री शांता शेळके, साहित्यविचाराच्या समीक्षेसाठी 'निळी पहाट' कार

### *शिक्षकांचे व्यक्तिसामर्थ्य*

*'शिक्षकांचे व्यक्तिसामर्थ्य' हा आचार्य अत्रे यांच्या चिंतनाचा एक प्रमुख विषय होता. 'अलिकडच्या शिक्षणात शिक्षकाच्या व्यक्तिमत्त्वाचे (पर्सनॅलिटी) फार महत्व आहे '. या मुद्याच्या आधारे त्यांनी जे विवेचन केले आहे. ते अत्रे यांच्या शिक्षकी व्यक्तिमत्त्वाशी बव्हंशी मिळते जुळते आहे 'अध्यापन ही एक अतिशय अवघड कला आहे. कलावंताला ज्याप्रमाणे विशिष्ट व्यक्तिमत्त्व लागते, त्याप्रमाणे यशस्वी अध्यापकालाही प्रभावी व्यक्तिमत्त्वाची आवश्यकता असते, असे अत्रे यांचे ठाम मत होते.*

*' शिक्षक हा बौद्धिक अन्न देऊन राष्ट्राचे संवर्धन करतो ', अशी त्यांची धारणा होती. म्हणून शिक्षकांच्या आर्थिक परिस्थितीसंबंधी जेव्हां अत्रे बोलत, तेव्हा ती अर्थिक परिस्थिती समाधानकारक असली पाहिजे असे ते आग्रहाने प्रतिपादीत.*

*डॉ. प्र. ल. गावडे*

*(अध्यापक अत्रे: आदर्श पाठ्यपुस्तकांचे जनक)*

## 'हेही दिवस जातील !'

*आपत्तीच्या आणि दु:खाच्या प्रसंगी माणूस हा आत्मलक्षी बनतो. शोकाच्या आवेगाने त्याचे हृदय तळापासून घुसळले जाते आणि जीवनातले मूलभूत सिद्धांत सुंदर सुभाषितांचे स्वरूप घेऊन त्याच्या मुखातून बाहेर पडतात. संकटात सापडलेला अडाणी माणूसही एकदम बोलून जातो. 'हेही दिवस जातील !' आर्त हृदयावर फुंकर घालणारे केवढे अमर सत्य आहे 'हेही दिवस जातील !' ह्या तीन शब्दांत, सत्य हे अतिशय सोपे आणि सुंदर असते. कीटस म्हणतो, 'सत्य हे सुंदर असते (Truth is Beauty).' जगप्रख्यात गणिततज्ज्ञ प्रो. डिएक म्हणतात, ' सत्य हे सोपे असते ' (Truth is simple).' तुकारामांनी सांगितलेले 'बीज तैसे फळ' हे जीवनातले एक महान सत्यच पहा की, किती सोप्या आणि सुंदर शब्दांत त्यांनी ते व्यक्त केले आहे.*

*कारुण्याने व्याकुळ झालेल्या हृदयातून जीवनामधली सत्ये सोप्या आणि सुंदर शब्दांमध्ये बाहेर पडली पाहिजेत. ही जाणीव सारखी मनात वाळगूनच मी 'उद्याचा संसार' हे नाटक लिहिले आहे. म्हणून त्या नाटकातील भाषेमध्ये एक निराळेच ओज प्रकट झालेले आढळून येईल.*

*आचार्य प्र. के. अत्रे (मी नाटककार कसा झालो?)*

रा. ग. जाधव, झुंजार पत्रकार या विभागासाठी झुंजार पत्रकार माधव गडकरी, वाङ्मयीन वादासाठी गं. ना. जोगळेकर, राजकीय विभागासाठी य. दि. फडके, शैक्षणिक कार्य विभागासाठी शिक्षणतज्ज्ञ प्रा. गावडे, नवयुग वाचनमाला संबंधी राजा मंगळवेढेकर याशिवाय रमेश तेंडुलकर, वि. भा. देशपांडे, सुभाष भेण्डे, विलास खोले आणि मी कसा झालो याच्या व्यापक समीक्षेसाठी ग. प्र. प्रधान अशा लेखकमंडळींनी अमोल सहाय्य केल्यामुळे हा ग्रंथ कायम स्वरूपी ग्रंथ बनला आहे. अत्रेमहात्म्य या विभागांतील काही लेख लिहून घेतलेले व काही आधीचे आहेत. शिरीष पैंच्या लेखांतील अत्रेंनी शाळकरी मुलाला दिलेला संदेश अत्रेंची प्रवृत्ति दिग्दर्शित करणाराच आहे. 'नळ होऊ नका, धबधबे व्हा' आचार्य अत्रे हाच मुळी प्रचंड प्रपात होता. या विभागांतील त्यांची धाकटी कन्या मीना देशपांडे, जयंत नारळीकर, मं. वि. राजाध्यक्ष, गोविंद तळवलकर, जयंतराव टिळक, प्रभाकर पणशीकर, म. श्री. दीक्षित व श्री. वा. जोशी यांचे संग्रहणीय लेख आहेत. मात्र 'जीवनाध्वरि पडे आज पूर्णाहुति' हा पु. ल. देशपांडे यांचा लेख त्यांत समाविष्ट करून एकंदर ग्रंथाचीच गुणवत्ता परमोत्कर्षास नेली आहे. अत्र्यांनी महाराष्ट्रभवानीपुढे हातांतल्या लेखणीचा आणि वाणीचा पोत करून केवढा प्रचंड जागर मांडला होता. 'अत्रे हे साहित्य संगीत, नाट्य, राजकारण, शिक्षण, अशा असंख्य क्षेत्रातल्या अबीर, बुका, हळद, कुंकुम, चंदन ह्यांनी अंतर्बाह्य माखलेले असामान्य जीवनभक्त होते.' हे अक्षरशः सत्य वाटते. गडकऱ्यांनी महाराष्ट्र देशाचे जे वर्णन केले आहे ते त्यांच्या शिष्यालाच कसे लागू पडते हेही पुलंनी मांडले आहे. संयुक्त महाराष्ट्र चळवळींतील अत्रे यांच्याबद्दल लिहिताना पु.

**'गर्दीचे मानसशास्त्र'**

*गर्दीच्या सभेपुढे बोलणे हे एका दृष्टीने सोपे आहे आणि अवघडही आहे. मुळामुठेच्या पुरात उडी मारली, की पूर माणसाला आपोआपच पुढे नेतो. हात पाय देखील हलवावे लागत नाहीत. वक्ता गर्दीच्या परिचयाचा असला, म्हणजे बोलणे तर फारच सोपे. माझी पद्धत ठरलेली असे. अनोळखी गर्दी असली, की ठणठणीत आवाजात पहिले वाक्य बोलायचे. त्यामुळे श्रोतेच एकदम शांत होतात. एवढेच नव्हे, तर हा वक्ता घाबरलेला नाही, अशी त्यांची ताबडतोब खात्री होते. हे महत्वाचे आहे. पहिल्या दोन-चार वाक्यांत काही विनोद किंवा कोटी करावयाची. एकदा श्रोते खदखदून हसले, की पुढचा मार्ग एकदम मोकळा होतो मग कसेही तुम्ही पुढे जा.*

*व्याख्यानाच्या वेळी कर्नल नायडूंचे बॅटिंग मी नेहमी डोळ्यांपुढे ठेवीत असे. खेळायला आल्याबरोबर पहिल्या चेंडूला सीमेबाहेर उडवायचे, की क्रीडांगणावर टाळ्यांचा कडकडाट. मग बारीकसारीक कोट्या करून एकामागून एक भराभर धांवा घ्यावयाच्या आणि पुन्हा एक टोला सीमेवर मारावयाचा, की फिरून टाळ्यांचा कडकडाट! गर्दीचे मानसशास्त्र ज्यांना माहित आहे, त्यांना सांगावयास नको, की गर्दीची मानसिक पातळी अगदीच खालच्या दर्जाची असते; एकदा गर्दीच्या मानगुटीवर आपण उडी मारून नीट पकड घेतली, की मग तिला पुढे कसेही पिटाळा, क्लोरोफॉर्म दिल्यानंतर डॉक्टर रोग्याला वाटेल तसा जसा कापीत सुटतो, तसे हे आहे.*

*पहिल्याने एकदा वक्त्याने श्रोत्यांना क्लोरोफॉर्म दिला, की काम झाले,*
*मग श्रोते निपचीत पडून, वक्ता जे सांगेल, ते एकून घ्यावयाला तयार होतात.*

*आचार्य प्र. के. अत्रे (मी वक्ता कसा झालो?)*

म्हणतात की, 'त्या काळांत अत्र्यांना पाहणे म्हणजे महाभारतीय युद्धातल्या भीमाचे दर्शन झाल्यासारखे वाटत असे.' त्या काळांत तर त्यांच्या मशालीचा भडका उडाला होता असे त्यांनी म्हटले आहे. अत्रे महात्म्याच्या अखेरीस आठ पानभर चाळीसावर चित्रे देऊन अत्रे गॅलरीच रचलेली आहे. अत्र्यांच्या हयातीत त्यांना डोळे भरून पहाणे हा छंद लाखोंनी जोपासला होता. आजही त्याला फारसा उतार नसावा. सत्तर वर्षांपूर्वीचे ट्रंकेवर कागद ठेवून लिहिणारे, खांडेकरांची थट्टामस्करी करणारे, लक्ष्मीबाई टिळकांचा सत्कार करणारे व स्वातंत्र्यवीरांनाही हसविणारे अत्रे पाहून आनंद वाटतो.

मी विनोदी लेखक कसा झालो ? या अत्रेकृत विस्तृत विवेचनानंतर श्री. बाळ गाडगीळ यांचा 'मराठी विनोद पीठाचे आद्य आचार्य' हा लेख आहे. मराठी विनोदी लेखकांनी विनोदाविषयी काही खास असे लिहिलेले नाही, स्वत:चा असा विनोदविषयक दृष्टिकोन मांडला नाही आणि ज्यांनी मांडला त्यांनी जुजबी मांडला. आचार्य अत्रे यांनीच 'विनोदावर आणि विनोद-प्रकारांवर तत्वचिंतन केले आणि त्याची सुबोध भाषेंत मांडणी केली' म्हणूनच

## *'गीतांचे मुखडे !'*

*चित्रपटगीतांत काव्य असणे आवश्यक आहे पण ती लिहिताना इतरही अनेक अवधाने गीतकाराला सांभाळावी लागतात. यशस्वी गीताचे एक ठळक लक्षण म्हणजे, त्याची अस्ताई किंवा नेहमीच्या भाषेत बोलायचे, तर 'मुखडा' हा अतिशय आकर्षक, सहज श्रोत्यांच्या तोंडी खेळत राहील आणि त्याचा अर्थ त्याला चटकन समजेल, असा असावा लागतो. व्यंजना किंवा सूचकता हा काव्याचा आत्मा असला, तरी गीत हे मुखत्त्वे ऐकण्यासाठी असते. त्यामुळे ते ऐकता-ऐकताच श्रोत्यांच्या मनांत अर्थ उलगडत जाणे यात त्याचे खरे यश असते, या दृष्टीने अत्र्यांच्या गीतांचे मुखडे किती आकर्षक आहेत हे वर वर बघितले, तरी धानात येते.*

*'अंगणात फुलल्या जाई जुई ! जवळी, ग, पति माझा नाही,'*

*'यमुनाजळि खेळू खेळ, कन्हय्या, का लाजता !'*

*'तुझ्या, ग, गुलाबी कळी लाजरी'*

*'उगवे पहा, प्रभात ! सुवर्णगंगा नभी वहात',*

*ऐन दुपारी, एकटी अशी का फिरतेस वनांत, फिरतेस वनांत. अशि कां, ग, उन्हात?'*

*'प्रीतीचा भिकारी आला तुझ्या दर्शनाला-'*

*एक ना दोन, किती गीतांचे मुखडे सांगावेत ? ते नुसते आकर्षक आहेत, इतकेच नव्हे तर चित्रपटातील त्या त्या घटनेची, प्रसंगाची प्रेक्षकाला सूचना देऊन, कथेचा ओघ पुढे चालू ठेवणारे असे आहेत. गीत कितीही सुंदर असले, तरी ते जर कथानकात अडथळा निर्माण करीत असेल, प्रेक्षकाचे लक्ष कथेवरून विचलित करीत असेल, तर तिथे अप्रयोजकच म्हणावे लागेल. अत्र्यांची गीते या दृष्टीने किती नेमक्या ठिकाणी येतात आणि कथानकातल्या विशिष्ट घटनाप्रसंगांची रंगत ती किती वाढवतात, हे मुळातूनच बघायला हवे.*

*शांता ज. शेळके*
*(चित्रपटगीतकार अत्रे)*

बाळ गाडगीळ त्यांना आद्य आचार्य म्हणतात. एवढे सांगून गाडगीळांनी अत्र्यांचा विनोदविषयक विचार संक्षेपाने एकूण चोवीस मुद्यांमध्ये मांडलेला असून तो पर्याप्त वाटतो. मात्र लेखनापलिकडच्या बहुजन समाजाकडे मौखिक विनोदी शब्दांनी अत्रे जितकं पोहोचले तितकी अन्य कोणाची हिंमत झाली नाही हेही लक्षात ठेवले पाहिजे. तसेच नवयुग, मराठा द्वारा अल्पशिक्षित वर्गही अत्रेंच्या शब्दाचा, विशेषत: विनोदी वा जळजळीत शब्दाचा, भुकेला बनलेला होता. 'आदर्श पाठ्यपुस्तकांचे जनक' हा प्र. ल. गावडे यांचा व नवयुग वाचनमालेबाबतचा मंगळवेढेकर यांचा असे दोन लेख अत्रेसरांबाबतचे आहेत. अत्रेंनी क्रमिक पुस्तकांत केलेली क्रांति बालवयात मी स्वत: अनुभविलेली आहे. परंतु ती क्रांति शहरी,

**'वास्तववादी लिखाण !'**

*वास्तववादी वाङ्मय निर्माण करणाऱ्या लेखकाने समोर दिसणाऱ्या सामाजिक परिस्थितीचे सूक्ष्मावलोकनाने पृथ्थकरण करावयाचे, याचा अर्थ त्याने कल्पनाशक्ति गुंडाळून ठेवावयाची, असा नाही. समाजातील गतिमान अंतः प्रवाहाचे भविष्यकाळात स्वरूप काय होईल, याची कल्पनाचित्रे रंगविणारा लेखकही वास्तववादी लेखक होऊ शकेल. वास्तव साधताना अदभूताचा हटकून त्यागच केला पाहिजे, असे मात्र ठरत नाही. अदभूताचाहि उपयोग करून समाजाच्या वास्तवसृष्टीत उपयोगी पडणारा किंवा समाजाचे भावी ध्येय पटविणारा कलाप्रबंध रचणे शक्य आहे, हे श्री तात्यासाहेब केळकरांचे विधान याच विचारांचे समर्थन करणारे आहे. आल्हस हक्सले यांचे Brave New World' किंवा रशियन लेखक ॲमि ऑटिन यांची 'We' ही कादंबरी हे या तऱ्हेच्या वास्तववादी लिखाणाचे उत्तम नमुने समजावयास हरकत नाही.*

*आचार्य प्र. के. अत्रे (पुरोगामी वाङ्मय आणि वास्तववाद)*



**'समीक्षक अत्रे'**

*अत्र्यांची समीक्षा ही मुख्यतः सामान्य मराठी माणसाच्या उदबोधनासाठी आहे; ती समीक्षकांनी समीक्षकांसाठी लिहिलेली समीक्षा नाही.*

*अत्रे व त्यांचे समकालीन इतर समीक्षक व विशेषतः फडके यांच्यात हा महत्त्वाचा फरक आहे. लोक हेच अत्र्यांच्या साहित्याचे व समीक्षेचे आवाहन क्षेत्रही आहे. व प्रतिसारक्षेत्रही आहे. म्हणूनच फडक्यांना ते इश्यूज कन्फ्यूज करतात, असे वाटते व अत्र्यांना फडके हे इश्यूज समजावून घेत नाहीत, असे वाटते. फडके अत्र्यांसाठी लिहितात; पण अत्रे लोकांसाठी लिहितात, असा हा उद्दिष्टांचा गुंता आहे.*

*आधुनिक मराठी समीक्षेत अत्र्यांचे स्थान मोठेच आहे, पण समीक्षक अत्रे मात्र समीक्षकांकडूनच, लोकांकडून नाही, उपेक्षित राहिले, असे मला वाटते.*

*प्रा. रा. ग. जाधव (आचार्य अत्रे यांचा साहित्य विचार)*

मध्यमवर्गीय मुले डोळ्यांपुढे ठेवूनच बेतलेली होती हेही विसरून भागणार नाही. नाट्याचार्य अत्रे विभागांतील 'नाटककार अत्रे' हा डॉ. वि. भा. देशपांडेचा लेख १९३० च्या 'गुरुदक्षिणा' पासून ते सामाजिक कृतज्ञता निधीसाठी पार अमेरिकेपर्यंत गेलेल्या 'लग्नाची बेडी' येथपर्यंतचा आढावा घेतलेला आहे. देशपांडे म्हणतात 'त्यांच्या नाट्य लेखनांत विषयांची, व्यक्तिरेखांची विविधता आहे. सामाजिक विषयांचे भान आहे. मराठी नाटक-रंगभूमीवर आपल्या आधी आणि आत्ता काय घडते आहे, याची पुरेशी जाण आहे. या परंपरेला छेद देऊन नाट्यप्रक्षेकांपर्यंत काय पोचवायचे आहे, याची निश्चित दृष्टि आहे.' त्यांच्या नाट्यलेखनाला साहित्य मूल्यांपेक्षा



अनुक्रमणिका

### *'मूल्यमापन'*

*आचार्य अत्र्यांच्या पत्रकारितेचे मूल्यमापन करताना वृत्तपत्रीय क्षेत्राचे नेहमीचे निकष लावून चालणारे नाही. चळवळीत जन्माला आलेले 'मराठा' दैनिक होते, त्यामुळे मराठी भाषा-संस्कृतीचा लढा प्राणपणाने, सर्व सामर्थ्याने लढणे हे 'मराठा' चे उद्दिष्ट राहिले. त्यामुळे निव्वळ नि:पक्षपातीपणा लक्षात घेऊन महाराष्ट्राविरुद्ध भूमिका घेण्याचे औद्धत्य काही मराठी संपादक दाखवितात, ते अत्र्यांनी दाखविले नाही.*

*वृत्तपत्रे ही व्यक्तिवादी नसावीत, एका व्यक्तिभोवती आणि व्यक्तिमुळे ती वाढली, तर व्यक्ति बाजूला होताच वृत्तपत्रे शून्यवत ठरतात. हे सत्य असले, तरी शेवटी अत्र्यांसारखी व्यक्ति पाठीमागे होती, म्हणूनच 'नवयुग', 'मराठा' नावारूपाला आले. नवयुग मध्ये 'अत्रे उवाच' आणि मराठा म्हणजेच अत्रे असल्याने त्यांच्यावरच सर्व चालले आणि ते बाजूला होताच ती नियतकालिके बंद पडली. संपादकाने स्वत:ची चित्रे, स्वत:च्या बातम्या वृत्तपत्रात छापू नयेत, असे काहींना वाटते. 'मराठा' दैनिक तर अर्धे अत्र्यांबद्दलच्या बातम्यांनीच भरलेले असे. त्याला अत्र्यांनीच एकदा उत्तर दिले, 'अत्रे इज न्यूज', अत्रे काय करतात, काय बोलतात हीच बातमी आहे, त्यामुळे ते सर्व येते. 'सामना' हे वृत्तपत्र त्यांच चालीने चालते. परंतु दोन्हींमध्ये मोठा फरक असा, की, सत्ताधीश आणि पत्रकार ही एकत्र भूमिका शिवसेनाप्रमुखांची आहे. ती आचार्य अत्र्यांची नव्हती. उलट, पत्रकार हे मुख्यत्वे सरकारविरोधी असतात. या भूमिकेत अत्रे होते.*

*माधव गडकरी*
*(झुंजार पत्रकार)*

प्रयोगमूल्य अधिक आहे असाही अभिप्राय देशपांडे यांनी दिलेला आहे. वक्ता शतसहस्रेषु या विभागांतील टिळक, शिवरामपंत परांजपे, खापर्डे,अच्युतराव कोल्हटकर आणि सावरकर यांच्या वक्तृत्वाबद्दल अत्रेंनी केलेले लिखाण मनोरम आहे. तसेच राम शेवाळकर यांचा लेख त्यांच्या ख्यातीला साजेसा आहे. शेवाळकर म्हणतात,'आपल्या भाषा सिद्धीवर, विषय प्रभुत्वावर व वाक्सामर्थ्यावर आचार्यांचा दांडगा विश्वास होता. प्रत्युत्पन्नमतित्व, समर्पक कोटिक्रम आणि चपखल नादपूर्ण शब्दयोजना स्फूरण्याबद्दलही त्यांना आत्मविश्वास होता. श्रुतयोजनामुळे त्यांच्या विवेचनांची कांती वाढत असे व समयास्फूर्त शाद्बिक विनोदामुळे प्रतिपादनाची रंगतही खुलत असे. या लेखांत त्यांनी अनेक किस्से सांगितले आहेत. त्याबरोबर त्यांनी हेही सांगितले आहे की,'विनोदाचा अवाजवी वापर, श्रोतृवर्गाच्या अनुनयासाठी अशिष्ट क्लृप्त्या, अतिशयोक्तीची सवय हे अत्र्यांच्या उत्तरकालीन वक्तव्याचे अविभाज्य विशेष ठरले.' चित्रपटकार अत्रे विभागांत अत्र्यांची चित्रसंपदा यावर ज्ञानेश्वर नाडकर्णींनी लिहिले आहे. ब्रह्मचारी, श्यामची आई व

*'वाङ्मयाचा हेतू'*

*'कलेला केवळ कलेची कसोटी लावून भागत नाही. लेखकाने किंवा कलावंताने कलेच्या बाहेर जाऊन समाजाचे किंवा मानवाचे हित बघितलेच पाहिजे. ललित वाङ्मयाची प्रेरणा जिज्ञासा आहे, असे फडके ह्यांच्या कालच्या म्हणण्यावरून वाटते. ते म्हणाले, 'मला पोष्टमन व्हावेसे वाटते, (हशा) इंजिन ड्रॉयव्हर व्हावेंसे वाटते, (हशा) मला वेश्या व्हावेसे वाटते, (हशा)' ठीक आहे. इच्छा काही वाईट नाही. (प्रचंड हशा) दुसऱ्याच्या जीवनात डोकावून पहाण्याची माणसाला जिज्ञासा असते, हे मला समजते.*

*खिडकी उघडी दिसली, रे, दिसली, की आत डोके खुपसून बघायचे. चुकलो. खिडकी बंद दिसली, की तिच्या फटीतून चोरून बघायचे (प्रचंड हशा) ही माणसाची प्रवृत्ती सुप्रसिद्धच आहे. पण अशा फुटकळ जिज्ञासेचे समाधान करणे हा काही खऱ्या वाङ्मयाचा हेतू नाही. कारण तसे वरवर बघून काहीच समजणार नाही. (हशा).*

*'आता ह्या सभेत हजारो माणसे जमली आहेत. पण कोण-कोणत्या हेतूने येथे आलेला आहे, हे वर वर बघून कसे समजणार ? (हशा) सगळेच कांही माझे व्याख्यान ऐकायला आले आहेत, असे मानण्याइतका मी घमेंडखोर नाही. ह्या गर्दीचा फायदा घेऊन कुणी तरी कुणाला भेटायला सुद्धा इथं आले असेल : (प्रचंड हशा) म्हणून असंख्य घटनांच्या किंवा संघर्षाच्या कोलाहलातून नेमके नाडीवर बोट ठेवून जीवनाचे निदान करणे हा वाङ्मयाचा हेतू आहे.*

*आचार्य प्र. के. अत्रे*
*(अत्रे-फडके वाद-कऱ्हेचे पाणी)*

महात्मा फुले याबाबत स्वाभाविकच त्यांनी भरभरून लिहिले आहे. त्यांना नाट्यसाहित्यापेक्षा चित्रसंपदा संपन्न वाटते. 'अत्र्यांच्या चित्रपटकर्त्यांची छाया आजतागायत मराठी चित्रपटसृष्टीवर पसरून राहिलेली आहे' असा अभिप्राय नाडकर्णी व्यक्त करतात. लागोपाठ दोन राष्ट्रपती पुरस्कार मिळवून अत्रेंनी विक्रमच प्रस्थापित केला आहे. शांता शेळके अत्रे यांच्या चित्रपटगीताबद्दल म्हणतात की प्रसन्न, आनंदी आणि मुक्त प्रीतीचा जयजयकार करणाऱ्या त्यांच्या अनेक गीतांनी समकालीन मराठी प्रेक्षकांना जीवनाची एक वेगळी, रम्य, विलोभनीय जागा दिली.' आपल्यात आठ प्रकारचे मी व अष्टकावर नियंत्रण करणारा नववाही अत्रे असल्याचे त्यांनीच स्वतः सांगितले पण त्यांत समीक्षक अत्रे शोधण्याचा प्रयत्न झाला नाही असे रा. ग. जाधव म्हणतात आणि स्वतःच अत्रेंच्या साहित्यविचाराची विपुल संदर्भसामग्री वाचकांपुढे ठेवतात हे महत्वाचे आहे. काव्यसमीक्षा, लोकवाङ्मयाची आधुनिक संकल्पना, पुरोगामी वास्तववाद, संतप्रणीत साहित्य कल्पना, जीवनवादी साहित्यदृष्टी, दलित साहित्याची प्रस्फुरणे, समाजवादी वास्तववाद, बहुजन साहित्य-संस्कृतीचा पुरस्कार या अंगांनी मैत्रेय साहित्यविचार विशद करतात. जाधव म्हणतात की 'अवघ्या साहित्य संस्कृतीला बहुजनाप्रेय ;

*लेखनशैली*

*आचार्य अत्रे यांच्या चरित्रलेखनाच्या शैलीविषयी एकच शब्द पुरेसा आहे, की अत्रे 'उमाळ्या'ने लिहितात. अंत: स्फूर्ती, आवेश, पोटतिडीक या भावनांनी मुक्त अशी त्यांची लेखणी शब्द धारा स्रवू लागते, तेव्हा दोन्ही काठांना कवळत खळाळत्या नदीचा प्रवाह फेसाळत वेगाने पुढे जातो, त्याची आठवण होते.*

*सुभाषितांची जागोजागी पेरणी, सुंदर व प्रत्ययकारी शब्दांची फवारणी, आणि वाकप्रचार, म्हणींचा चपखल वापर हे अत्रे यांच्या लेखनशैलनीचे वैशिष्ट्य जागोजागी आढळते.*

*न. म. जोशी*
*(चरित्र लेखक आचार्य अत्रे)*

व बहुजनप्रबोधक वळण देण्याचा त्यांनी लेखनातून व समीक्षेतून अथकपणे प्रयास केला'. ते अखेरीस निष्कर्ष काढतात की 'सामान्य लोकांसाठी समीक्षा लिहिणारा अत्र्यांइतका प्रभावी समीक्षक मराठीत झाला नाही.' 'मी पत्रकार कसा झालो' ही आचार्यांची मांडणी प्रभावी व रंगतदार आहे. त्यावरील माधव गडकरी यांची 'झुंजार पत्रकार' ही समीक्षाही बहारदार आहे. नवयुग व मराठी ही परजाणारी शस्त्रे होती. मराठा ने वृत्तपत्रसृष्टीत नवा इतिहास घडविला. माधवराव म्हणतात की 'मराठा' दैनिक नसते तर मुंबई महाराष्ट्राला मिळाली नसती' या विधानाशी तीन-चार दशकानंतरही कोणी असहमत होईल असे वाटत नाही. केसरीच्या सिंहगर्जनेशीच मराठाची तुलना होऊ शकेल. 'कोणतीही सत्ता नसलेला एक पत्रकार लेखणीच्या जोरावर त्या राज्याचे भवितव्य ठरवतो. असे उदाहरण दुसरे नाही.' हे गडकरींचे भाष्य यथोचित आहे.

आ. अत्रे यांचे वाङ्‌मयीन वाद या समालोचनात गं. ना. जोगळेकर यांनी अत्रे-माटे वाद, अत्रे-भावे वाद, अत्रे-फडके वाद यांची समीक्षा केलेली आहे. या वादांमध्ये मराठी जनता रस घेत होती, त्यासाठी वृत्तपत्रे घेत होती आणि श्रोते म्हणून अक्षरश: हजारोंच्या संख्येने जमत होती हे महत्वाचे आहे. त्यांत कोण जिंकला-हरला याला आज महत्व नाही. या पदाला सनातनी विरुद्ध पुरोगामी, कलावादी विरुद्ध जीवनवादी हा जो रंग होता तो मात्र सनातन आहे यात शंका नाही. य. दि. फडके यांनी राजकीय कार्याचे समालोचन केले आहे. फडके हे अत्रेंना संयुक्त महाराष्ट्राचे एक शिल्पकार मानतात हे यथार्थच आहे. परंतु 'संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीच्या या तुफान गर्दी खेचणाऱ्या नाटकाचे ते सूत्रधार मात्र कधीच नव्हते. अत्र्यांच्या राजकीय जीवनाचीही शोकांतिका' असे फडके यांनी का म्हणावे याचे आश्चर्य वाटते. आचार्य अत्रे यांनी राजकारणांत, मग ते काँग्रेस प्रचाराचे असो, समाजवादाचे असो की समितीचे असो, नेतृत्वाचा दावा कधी केला नाही. गांधी-नेहरू, जेपी-लोहिया, डांगे-एसेम यांचेच नेतृत्व त्यांनी स्वत:च मान्य असेपर्यंत पत्करलेले होते. मात्र त्यांचे स्थान राज-वजिराचे नसले तरी हत्तीचेही नव्हते. ते स्थान निदान प्रभावी सेनापतीचे होते. त्यांना नेतृत्व म्हणजे काय याची

## आचार्य अत्रे : स्वप्न आणि सत्य यांचा मिलाफ

'मी कसा झालो' या पुस्तकाच्या प्रकाशन-समारंभाला मी हजर होतो. हा प्रकाशन-समारंभ गोखले हॉलमध्ये झाला आणि सभागृह प्रेक्षकांनी तुडुंब भरले होते. वक्त्यांमध्ये प्रा. श्री. म. उर्फ बापूसाहेब माटे हे होते. प्रा. माटे म्हणाले,

'आत्मचरित्र लिहिण्यासाठी लेखकाची स्मरणशक्ति फार तल्लख असावी लागते. आमच्या बाबुराव अत्रे यांना अशी असामान्य स्मरणशक्ति लाभलेली आहे.' आणि थोडे थांबून डोळे किलकिले करून प्रा. माटे मिस्किलपणे म्हणाले, ' अत्रे यांना झालेल्या, न झालेल्या गोष्टी विनचूक आठवतात.'

प्रा. माटे यांच्या या 'गुगली' मुळे श्रोत्यांची दांडीच उडाली. या वाक्यातील कोपरखळी लक्षात येताच सभागृहात एकदम हास्याची लहर उमटली.

आचार्य अत्रे हे एक कलावंत लेखक असल्यामुळे त्यांचे लेखन नाट्यपूर्ण असते आणि ते नाट्यपूर्ण करण्यासाठी अत्रे हे काही वेळा सत्याला थोडी कल्पनेची जोड देतात, हे प्रा. माटे यांनी मोठ्या कौशल्याने सांगितले. सत्याचा विपर्यास न करता सत्य आणि स्वप्न यांचा मिलाफ आचार्य अत्रे यांच्या लेखनात होतो. हे माटे यांच्या उदगारातून आम्हा श्रोत्यांना उमजले.

'मी कसा झालो' हा ग्रंथ मराठी साहित्याचे एक अपूर्व लेणे आहे.

ग. प्र. प्रधान

(मराठी साहित्याचे अपूर्व लेणे)



## 'अत्रे-कर्मयोगी कलावंत'

अत्रे हे नुसतेच जीवनाच्या काठावर वीणेवरती गीते गात बसणारे कलावंत नव्हते. तर जीवनात घुसून आपल्या कलेच्या साह्याने जीवनातल्या ढोंगाचा नाश करणारे अन्यायाविषयी चीड उत्पन्न करणारे कर्मयोगी कलावंत होते. ते उग्ररूप धारण करणारे नरसिंह होते. हे खरेच. परंतु मुख्यत: जीवनावर उदंड भक्ति करणारे ते उत्तम प्रल्हाद होते. म्हणूनच उत्तम नरसिंह होते. प्रल्हाद आणि नरसिंह हे दोन नव्हते. नुसताच नामस्मरण करणारा प्रल्हाद हा भावनाविव्हल होणारा रडका माणूस. हास्याची खरी शक्ति न ओळखणाराला अश्रुंचीही शक्ति कळत नाही, म्हणूनच हास्य आणि कारुण्य पाठीला पाठ लावून येते. एरवी हास्य आणि आचरटपणा किंवा कारुण्य आणि रडकेपणा यांतला फरक लक्षात येणार नाही. उलट, सदासर्वकाळ उग्ररूप धारण करून थैमान घालणारा गुंड हा नरसिंहातल्या पशुत्वाचाच प्रतिनिधी होईल.

अत्र्यांच्या प्रतिभेत माणसांतला देवमाणूस आणि पक्षांतला शार्दूल यांचा संगम होता.

पु. ल. देशपांडे

(जीवनाध्वरि पडे आज पूर्णाहुती)

खचितच जाणीव होती. प्रा. प्रधानांनी मी कोण आहे ? या अत्रेकृत विवेचनाचे चांगले समालोचन केले आहे. त्यांच्या मते ते साहित्याचे अपूर्व लेणे आहे. प्रा. विलास खोले यांनी त्यांच्या प्रस्तावनांचा समाचार घेतला आहे तर न. म. जोशींनी गुणग्राहक, गुणांचे उपासना चरित्रलेखक आचार्य अत्रे रंगवले आहेत. अत्रेंचे कितीतरी अवतार आहेत व ते एकाच अवतारात ठासून भरलेले. किती रंग, किती कला, किती नाट्य ! अत्रे म्हणत माझ्या नावातच नाट्य आहे. मूलत: अत्रे जीवनासक्त, जीवनाचे उपासक, जीवनावर सतत फिदा असलेले व्यक्तिमत्त्व होते. अशा व्यक्तिमत्त्वाचे विलोभनीय रंगांचे सुंदर आकर्षकरितीने मराठीच्या दरबारांत लटकविल्याबद्दल प्रकाशक, संपादक, चित्रकार व मांडणीकार या सर्वांना मानाचा मुजरा.

☐☐

भाई वैद्य

जलाधारा सहकारी गृहरचना संस्था मर्यादित, राजेंद्रनगर, पुणे ४११ ०३०.

आचार्य अत्रे : प्रतिभा आणि प्रतिमा, प्रेस्टीज प्रकाशन, पुणे ३०

---

**खालील ग्रंथ शोमाशेट्टीवार यांनी ग्रंथालयास भेट म्हणून दिली**

- ☐ **माणदेशीची माणसं** : व्यंकटेश माडगुळकर, १ प्रत
- ☐ **प्रशोवर्मत्र** : संजय सोनवणे, १ प्रत
- ☐ **ओडिसी** : संजय सोनवणे, १ प्रत
- ☐ **अजुनी खुली ही** : अनुरावधा वैद्य, १ प्रत
- ☐ **जोगवा** : अनुराधा वैद्य, १ प्रत
- ☐ **टाचा टिंभा** : लहु कानडे, १ प्रत

---

## २८२ अंकातील आजीव सभासद यादी

पिंगळे सौ. शीतल शशिकांत, पुणे
राणा सचिन रमेश, पुणे
रेडकर शामराव वामन, पुणे
दारव्हेकर मिलिंद वसंत, पुणे
जोशी कीर्ती दत्तात्रय, पुणे
शेळके निलेश विश्वास, पुणे
गुप्ते युगीन सुरेश, पुणे
जादव अनिल केशवभाई, पुणे
गोडबोले सुनीता सुरेश, पुणे
संगमनेरकर नितिन अरविंद, पुणे
संगमनेरकर सचिन अरविंद, पुणे
सरनाईक अर्चना माधवराव, पुणे
सहस्त्रबुद्धे वासुदेव गंगाधर, पुणे
मुळे प्रदीप चंद्रकांत, पुणे
बाम रवींद्र रघुनाथ, पुणे
वाघ सलील, पुणे
भोगले गजानन दत्तात्रय, पुणे
मराठे ह. मो., पुणे
आरोळे पांडुरंग ज्ञानेश्वर, पुणे
शर्मा कुमारी सुनीता, जळगाव
निकुंभे प्रभा, धुळे
वसेकर पवन केशवराव, परभणी
शिंदे विश्वनाथ, कोल्हापूर
लालीवाला नाहिद, अहमदाबाद
वडगणेकर विष्णुपंत लक्ष्मण, कोल्हापूर
माळी भाईदास सुरजन, धुळे
पोरे स्वप्निल श्रीकांत, वडगाव बु.



अनुक्रमणिका













अनुक्रमणिका








अविनाश वामन आवलगावकर

# वि. स. खांडेकरांची कविता

एकोणीसशे वीसच्या आसपास बालकवी, गोविंदाग्रज, रे. ना. वा. टिळक इत्यादी कवींचे निधन झाल्याने मराठी काव्यक्षेत्रात एक विलक्षण पोकळी निर्माण झाली, हे खरे असले तरी याच कालखंडात कविवर्य भा. रा. तांबे, चंद्रशेखर, वि. दा. सावरकर, बी इत्यादी कवी काव्यलेखन करीत होते. मराठी काव्यनिर्मिती ही परंपरा अखंडपणे सुरू होती. काहींनी परंपरा निर्माण केली, काहींनी ती जपली तर काहींनी त्यात परिवर्तन घडविण्याचा प्रयत्न केला. वि. स. खांडेकर हे या पिढीचेच कवी होत. खरे तर कवी खांडेकर असे म्हटल्यावर कुणालाही आश्चर्यच वाटावे. 'घरी एकच पणती मिणमिणती' ही त्यांची उल्का कादंबरीत आलेली कविता मराठीच्या अभ्यासकांना माहिती असली तरी कादंबरीकार खांडेकर, कथाकार खांडेकर किंवा समीक्षक खांडेकर हेच अधिक परिचित आहेत. खांडेकरांच्या समर्थ लेखणीने वाङ्मयाच्या सर्वच प्रांतांत आपले स्थान निर्माण केले आहे. कथा, कादंबरी, समीक्षालेखनाबरोबरच लघुनिबंध, रूपककथा, चित्रपटकथा, नाटक, व्यक्तिचित्रणपर लेख, आत्मचरित्रात्मक लेख इत्यादी वाङ्मयप्रकार त्यांच्या लेखणीने हाताळले आहेत. यात त्यांच्या कवितेलाही महत्वाचे स्थान आहे. कादंबरीप्रांतात स्थिर होण्यापूर्वीच त्यांची लेखणी काव्यप्रांतात वावरली आहे. 'हृदयाची हाक' ही त्यांची पहिली कादंबरी १९३० ला प्रसिद्ध झाली. तत्पूर्वी 'विद्युत प्रकाश' हा कथासंग्रह १९१७ ला प्रसिद्ध झाला. याच सुमारास नवयुग, यशवंत, मनोरंजन, प्रमोद, प्रतिभा, उद्यान इत्यादी नियतकालिकांतून त्यांच्या कविता प्रसिद्ध होत होत्या. खांडेकर शाळा कॉलेजात होते तेव्हापासूनच साधारणत: १९१९ पासून खांडेकरांची कविता प्रकाशित होऊ लागली. 'केशवसुतांचा संप्रदाय' या ग. त्र्यं. माडखोलकरांच्या लेखाला 'तुतारी वाङ्मय व



*पद्मभूषण वि.स.खांडेकर यांच्या जन्मशताब्दि -निमित्ताने पुणे विद्यापीठाच्या मराठी विभागाने दि. १४ व १५ फेब्रुवारी १९९७ रोजी आयोजित केलेल्या वि. स. खांडेकर यांच्या साहित्यावरील चर्चासत्रात वाचलेला निबंध पत्रिकेच्या वाचकांसाठी सादर केलेला आहे.*

*संपादक*

दसरा' हा लेख लिहून खांडेकरांनी उत्तर दिले. हा त्यांचा पहिला टीकालेख नवयुगच्या ऑगस्ट १९१९ च्या अंकात प्रकाशित झाला. आणि विशेष म्हणजे याच अंकात त्यांची 'होळी' ही पहिली कविता प्रकाशित झाली. म्हणजे खांडेकर टीकालेखक व कवी म्हणून अभ्यासकांसमोर आले ते एकदमच. एकूणच गद्यलेखक म्हणून स्थिर होण्यापूर्वी खांडेकर कवी म्हणूनच त्या काळी प्रसिद्ध होऊ लागले होते. कधी वि. स. खांडेकर या नावे तर कधी 'कुमार' या टोपण नावाने त्यांच्या कविता प्रसिद्ध होत होत्या.

खांडेकरांचा मूळ पिंडच कवीचा होता. त्यांच्या इतर साहित्यातूनही त्यांच्या काव्यात्मक वृत्तीची ओळख पटते. उदा. उल्का कादंवरीतील हा उतारा पहा -[१]

नवा बंगला बांधून झाला.
त्याची मंगलौरी कौले किती लाल
आणि सुरेख दिसत होती.
संध्याकाळी फिरून परत येताना दुरून
बंगला दिसू लागला की माझी दृष्टी
त्या कौलांवर खिळून जाई,
प्रेमाचा रंग तांवडा असतो म्हणतात !
भोवतालच्या साऱ्या घरांची कौले काळसर दिसत.

किंवा 'आगरकर चरित्रा' त ते लिहितात[२] 'धैर्याच्या मंदारचा मंथनदंड करून रुढिरूप वासुकीला रज्जूचे रूप देऊन नवे विचार व जुनी मते या देवदानवांना मंथन करावयाला लावून जनसमुद्र तळापासून घुसळून काढण्याचे सामर्थ्य सुधारककर्त्यांपूर्वी कोणीही दाखविले नव्हते. एवढेच काय परंतु खांडेकरांच्या टीकालेखनानेही काव्यात्म पातळी गाठली आहे. या सर्व बाबींचा विचार करता खांडेकरांचा मूळ पिंड कवीचा होता हे स्पष्ट होते. असे असतानाही खांडेकर पुढे कथा, कादंवरी, ललित गद्य या वाङ्मयप्रकारात अधिक रमलेत. या पिढीतील बहुतेक लेखक वाङ्मयाच्या विविध प्रकारांमध्ये स्वैरसंचार करीत होते. डॉ. एस. एस. भोसले म्हणतात[३] त्याप्रमाणे सगळे वाङ्मयप्रकार हाताळून पाहावे आणि आपल्या मन:पूत वृत्तीप्रवृत्तीना मनसोक्त वाव द्यावा, अशी त्यांच्या ठायी आस असावी. अर्थात सर्व वाङ्मयप्रकार हाताळण्यासाठी तेवढी प्रतिभाही समर्थ पाहिजे. खांडेकरांच्या बाबतीत हेच झालेले आहे. उदंड प्रतिभाशक्ती लाभलेल्या खांडेकरांनी, आपल्या लेखणीला असेच स्वातंत्र्य दिले. ती 'कथा, कादंबरी, ललित गद्य या वाङ्मयप्रकारात अधिक रमली. परंतु त्यातही तिने काव्याशी आपले नाते तोडले नाही.

खांडेकर म्हणतात, '१९२७-२८ साली गद्यलेखनाकडे वळल्यापासून माझे आधीच तुटपुंजे असलेले कवितालेखन जवळजवळ संपुष्टात आले होते. पण 'उल्के'च्या एकंदर वातावरणामुळे किंवा ज्या काव्यात्मक मनोवृत्तीने मी या कादंवरीचा विचार करीत होतो तिचा परिपाक म्हणून असेल भाऊसाहेबांच्या पूर्व-चरित्राचे चित्रण करता करता सहजासहजी ती कविता - 'घरि एकच पणती मिणमिणती' मी लिहून गेलो. एवढेच नव्हे, ज्या काळाचे मी या कादंबरीत चित्रण करीत होतो तो काळ आधुनिक मराठी कवितेच्या ऐन बहराचा असल्यामुळे या कादंबरीत

अगणित वांधव बघ अंधारी
किर्र रान ! भय भवंती भारी
चरणिं जिवाणूं ! भरे शिरशिरी
यमदूत - न कीटक - किरकिरती !'

पणतीचा प्रकाश मिणमिणता असला तरी दुसऱ्यांच्या जीवनातील अंध:कार नाहीसा करण्यासाठी आपण त्याचा वापर करू शकतो याची जाणीव खांडेकरांना सातत्याने होती. त्यांच्या ललित वा वैचारिक सहित्यामागेही खऱ्या अर्थाने त्यांची हीच भूमिका उभी आहे. मनाची ही विशालता धनिकांजवळ नाही. तेथे विजेचे दिवे असूनही त्यांचे अंत:करण अंधारलेले आहे. अशा धनिकांचे अस्तित्वच शून्यवत आहे.

'दिवे विजेचे धनिकमंदिरी
प्रकाश पाडिति परोपरी जरि
स्नेहशून्य ते सदा अंतरी
कां करिसि तयांची शिरगणती ?'

पणतीवर विश्वास असला तरी त्यात लाचारीची भावना नाही. दगडी देवासोवत अखंड तेवणारी 'नंदादीपज्योति'ही यावेळी त्यांना महत्त्वाची वाटत नाही. हे सगळे प्रश्न आपणच निर्माण केले आहेत, तेव्हा त्याची उत्तरेही आपणच शोधायला हवीत याची जाणीव त्यांना होती. म्हणून दगडी देवासमोर गाऱ्हाणे मांडणे त्यांना उचीत वाटत नाही. दिव्यत्वावर, भव्यत्वावर खांडेकरांचा विश्वास असला तरी मिणमिणती पणतीच परिवर्तनाची नांदी आहे, यावर त्यांचा विश्वास होता. एखाद्या पांथस्थाचा कंठ सुकून गेला तरी हा 'जलद्रव्याचा कुवेर' उपयोगी पडणारा नाही हे सांगताना 'समुद्र व निर्झरिणी' या कवितेत ते म्हणतात -

'रम्य रत्नाकर नाम जगीं गाजे
सकल सरितांचा नाथ हा विराजे
लाट साधी चुंविते गगनगाभा
कुठें तुलना लाभेल महाभागा ?

नित्य मेघांतें अर्पितो अहेर
जलद्रव्याचा भासतो कुबेर
कंठ पांथाचा सुकुनि जरी गेला !
जलधि मौजेनें पाहतसे लीला

धार नाहीं जरि वोटभरी रुंद
नसे भरती कधिं, गति सदैव मंद
कड्यावरुनी धडपडे पडे खालीं
श्रांत पांथां परि निर्झरिणी वाली'

सर्वसामान्यांच्या जीवनाला खांडेकरांनी जवळून अनुभवले होते. श्रीमंताच्या दांभिक खोट्या प्रतिष्ठेचाही अनुभव त्यांनी घेतला होता. श्रमिकांच्या जीवावर श्रीमंत गर्भश्रीमंत बनतात आणि श्रमिक त्याच गर्तेत आपले जीवन संपवतो. ही सत्ता उलथून टाकण्यासाठीच श्रमिकशक्तीने विराट स्वरूप धारण करून यायला हवे. (कधि पाताळातुनि). मार्क्सवादी विचारप्रणालीचा खांडेकरांच्या कवितेवरील हा प्रभाव कालखंडाच्या पार्श्वभूमीवर लक्षात घेण्यासारखा आहे. खांडेकरांची जीवनावर श्रद्धा आहे, म्हणून परिवर्तनावर त्यांचा विश्वास आहे आणि म्हणूनच ते नव्या युगाचे स्वप्न पाहतात. यासंदर्भात 'नवयुग' या दीर्घ कवितेतील काही ओळी पहा -



अनुक्रमणिका

'नवयुग क्षितिजावरतीं आले ।
कभिन्न काळी रात्र पळाली ।
रातकिड्यांची किरकिर सरली ।
ढोल्यामध्यें घुबडें दडली ।
निशाचरांचे राज्य निमालें ॥१॥
नव्या युगाचा लोंढा आला ।
आपलपोट्या तारा बुडल्या ।
चंचल चंद्रासंगे गेल्या । -
क्षणांत सगळ्या निजधामाला ।
भिन्नपणाचा भाव उडाला ॥२॥
भूल भयंकर जुनी पुराणी ।
देऊनि निजविलि जागृति-राणी ।
शासन अपुलें शाश्वत मानी ।
क्रूर तामसी रजनी निजमनिं ।
परि विरली ती नवयुग बघुनी ॥३॥
हृदय सृष्टिचें हलूं लागलें ।
पक्षिमुखानें अस्फुट गाई ।
अरुणमिषानें लाली दावी ।
लहरीवरती विहरत जाई ।
चैतन्यासह नवयुग आले ॥४॥
मातृभूमिच्या हंवरण्याला ।
संधिकाल हा धाडुनि दिधला ।
निजरक्ताने रंगविण्याला ।
शुभ्र यशानें शोभविण्याला ॥
स्थिर करण्याला रविरायाला ॥५॥
उठा उठा तर आळस भिरकुनि ।
मुखीं काळिमा अपकीर्तीचा ।
मार्जन करूनी धुवावयाचा ।
अभिषेकानें मग अश्रूंच्या ।
माता लाविल मोह हांकुनी ॥६॥
तरुणांनो तर बांधा कमरा ।
पिकली पाने, कोमल पल्लव ।
व्यवहाराला उपयोग न लव ।
उमद्या हिरव्यांचें हे वैभव ।
विडा उचलुनी पुढें तर सरा ॥७॥

परंपरेने जपलेल्या जीवनमूल्यांना खांडेकरांनी या कवितेत सुरुंग लावला आहे. भारतभूमीचे नवे स्वप्न त्यांनी चितारले आहे. खांडेकरांना हे परिवर्तन सर्वांग पातळीवर हवे आहे. सामाजिक, आर्थिक, भाषिक, वाङ्मयीन इत्यादी पातळीवरील परिवर्तनातच मानवी जीवनाचा विकास अवलंबून आहे.ज्ञानदेव, एकनाथ, शिवाजीमहाराज, केशवसुत, गोविंदाग्रज, रानडे, गोखले, टिळक, बालकवी हे या परिवर्तनवादी चळवळीचे वारकरी आहेत (भाऊबीज). या सर्व वारकऱ्यांविषयी खांडेकरांच्या मनात नितांत आदराची भावना आहे.

त्यांची जीवनावर जशी श्रद्धा आहे, तशी या देशावरही त्यांची निष्ठा आहे. 'हा हिंद देश माझा', 'वृथा' यांसारख्या कवितांतून त्यांच्या ठिकाणी असणाऱ्या राष्ट्रप्रेमाची जाणीव होते. भारतीय इतिहास तथा संस्कृतीची यशोगाथा चित्रित करणारी खांडेकरांची 'सिंहगड व ताजमहाल' ही कविता पहा —

परदेशस्थ कविमित्र

'हिंदिस्थान न देशनिर्झर परी विस्तीर्णसा सागर ।
नाहीं पाणबुड्या प्रवीण, सुहृदा आलो फिरस्ता इथें ।
भासे भव्य असें कुबेरगृहही रत्नांविना ज्यां रितें ।
तीं दावी, मज बिंदुमात्र बघुं दे हा रम्य रत्नाकर ॥'

कवी -

'शोभे उत्तरभूमिचा तिलक जो तो ताज घे रेखुनी ।

जाई सिंहगडीं, यमास रगडी जेथे मराठा गडी।
दोन्ही वामन पावलां परि पहा काळाप्रती व्यापुनी।
स्वर्भूसंगम साधिती - न दुबळी देवें दिलेली कुडी ! ॥

लाजावी अमरावती मयसभा - कारागिरी मंदिरीं।
लाजावा मनिं कार्तिकेय असल्या तेजें भरे दुर्ग हा।
कीं रामायण भारतासह रमे श्रीशारदा सुंदरी।
गीता सहयशिरीं कुराण यमुनातीरीं विराजे पहा ॥'
'राज्यें भंगुर, देशभक्ति अथवा प्रीती चिरंजीविनी।
तानाजी - मुमताज हिंदुयवनी गातात एक्या स्वनी ॥'

देशभक्ती आणि स्वातंत्र्याच्या कल्पनेने हा सबंध कालखंडच भारावलेला होता, हे येथे लक्षात घेणे महत्त्वाचे ठरते. केशवसुतांनी संगीताला विशेष अनुकूल असणारे शार्दूलविक्रीडित हे एकोणीस अक्षर गंभीर वृत्त सुनीतासाठी निश्चित केले व ते मराठी कवितेत रूढ झाले. खांडेकरांची सुनीत रचना ही या प्रकारची आहे. त्यांचे प्रस्तुत सुनीत वाचल्यावर केशवसुतांच्या 'मयूरासन आणि ताजमहाल' या मराठीतील पहिल्या सुनीताची आठवण अभ्यासकांना झाल्याशिवाय राहणार नाही. 'मनोरथ', 'अरण्यरोदन', 'मनुष्य अथवा उलटी सृष्टी', 'आगरकर', 'प्रेमजीवन', 'फुलें वेंचिलीं तिथें गोवऱ्या', इत्यादी त्यांची सुनीत रचना पाहण्यासारखी आहे. त्यातून देशभक्तीबरोबरच प्रेमभावना ही समर्थपणे व्यक्त केली आहे.

सामाजिक जीवनाचे वास्तव चित्र रेखाटणारे आणि परिवर्तनाची आशावादी भूमिका ठेवणारे कवी खांडेकर सृष्टीसौंदर्याकडेही आपले लक्ष वेधून घेतात. 'दवबिंदूचे गाणे', 'बाळाची शाळा', 'भाऊबीज' यासारख्या त्यांच्या कविता पाहण्यासारख्या आहेत. 'दवबिंदूचे गाणे' या कवितेत तर ते स्वतः बाळ होऊनच सृष्टीशी संवाद साधतात.--

'आकाशाच्या अंगणात। प्राजक्ताचा सडा होत
फुलवाया पृथ्वीलागी। प्रेम वर्षू या ॥१॥'

किंवा

'किरणांच्या विमानांत। वायूवारी झोंके घेत।
प्रेमगीत गात गात घरीं येऊ या ॥९॥'

यासारख्या सुंदर कल्पना रसिक मनाला आकर्षित करणाऱ्या आहेत. 'बाळाची शाळा' ही कविता तर संवादातून साकार झाली आहे. त्यामुळे आपोआपच तेथे नाट्यात्मकता निर्माण होते. खेळात गुंग झालेल्या बाळाला आई शाळेत जाण्यासाठी सांगते, तेव्हा बाळ निसर्गातील सुंदर चित्रांची एक मालिकाच गुंफतो. स्वच्छंदपणे रानात फिरणारा, वेणुच्या कर्णी शीळ घालणारा वारा कधी शाळेत जातो का ? आकाशात गडगडाट करणारी वीज कधी शाळेत जाते का ? मग मीच शाळेत का जावे असा प्रतिप्रश्न बाळ आईला विचारतो. त्याने आईशी साधलेला हा संवाद पहा -



अनुक्रमणिका

'खेळुनी पहाटे नक्षत्रें जीं निजिली ।
कां अजुनी नाहीं शाळा त्यांची भरली ॥
बागेंत सदोदित फुलें खेळतीं सारीं ।
कधि कटकट नाही शाळेची त्यां भारीं ॥
हासऱ्या झऱ्याला नाचत नाचत जातां ।
'चल शाळेला जा' कधी न सांगे माता ॥
स्वच्छंद गाउनी राघू रमतो रानीं ।
कां घोकावीं मी पाढ्यांची रडगाणी ॥
हीं देवाजींची बाळें उधळिति रंग ।
मग खेळ सोडुनी शाळा मज का सांग ?'

येथे सबंध निसर्गाचा एक सचेतन प्रत्यय येतो. जीवनाचा गंभीरपणे विचार करणारे खांडेकर निसर्गाकडे तेवढ्याच निरागसतेने पाहतात. त्यांच्यातील बाल्यसुलभ निरागसतेचा प्रत्यय येतो. 'भाऊबीज' ही कविताही अशीच बोलकी आहे. या दीर्घ कवितेतील हे कडवे पाहा -

'चंद्र विजेचा आनंदाचा येई उदयाला ।
लहरि - करी निज भगिनी लक्ष्मी ओवाळी त्याला ॥
या लहरींच्या कोमल हाती वर्तुळ-तबकांत ।
निरंजने ही फेनमिषानें चमकत हसतात ॥
दशा सुताची लोक अर्पिती, भाऊरायाला ।
हिनें अर्पिला निळासांवळा सुंदरसा शेला ॥
चंद्र सुधेची तबकामध्यें ओवाळणि घाली ।
प्रीती भेटली प्रीतीलागीं क्षणीं एक झाली ॥९॥'

निसर्गातील दृश्यांचे इंद्रियगोचर असे सौंदर्य कवी खांडेकर जेव्हा चित्रित करतात तेव्हा निश्चितच बालकवी समोर उभे राहतात. शाळेत आणि कॉलेजात असताना बालकवींचे अनुकरण करून आपण खेडेगावचे विविध ऋतूतील सौंदर्यवर्णन करणाऱ्या अनेक कविता लिहिल्या असल्याचे स्वत: खांडेकरांनीच कबूल केले आहे.[५] याचा अर्थ खांडेकरांची निसर्गकविता बालकवींच्या अनुकरणातच संपली असे नाही. त्यातून त्यांच्या स्वतंत्र सौंदर्यदृष्टीचाही प्रत्यय येतो. 'बाले', 'अरण्यरोदन', 'भग्न हृदय', 'उदास उत्कंठा', 'भरतीची लाट' इत्यादी त्यांच्या निसर्गकवितातून याची प्रतिती येते. 'अरण्यरोदन' या कवितेत बालिकेच्या सौंदर्याचे चित्रण करताना तिच्यावर निसर्गाचा केलेला हेत्वारोप त्यांच्या स्वतंत्र प्रतिभेचे दर्शन घडविणारा आहे.

ते लिहितात -

'कठी सोडुनि आम्रवृक्ष बसली रानांतली कोकिळा
आले गाल गुलाब बंधु म्हणुनी चांफेकळीच्या घरीं
कुंदाच्या कलिकाहि हट्ट धरूनी तैमागुनी धांवल्या
ओष्ठांच्या मधु पाळण्यात निजुनी डोकावती ज्या वरी'

या कवितांमधूनच त्यांची प्रेमविषयक जाणीवही स्पष्ट होते. 'भरतीची लाट' या कवितेत

प्रेमाचे सामर्थ्य चित्रित करताना ते म्हणतात -

'पुरुष कठोरच प्रेमळ कोमल काय तयां ठाउके,
होती अबलांपुढती मुके
अखेर हटला हट्ट कठोरच प्रेमळ प्रीतीपुढे
लहरिंच्या रसीं किनारा बुडे '

'गुलाबाचे फुल' या कवितेतूनही त्यांनी प्रेमावरची अढळ निष्ठा चित्रित केली आहे. परंतु या प्रेमाला शारीरिक वासनेचा स्पर्श नाही.

लाभे गृहसुख निर्मल ज्याला।
स्वर्गी काय अधिक त्याला ?॥

अशी स्वर्गसुखाशी त्याची तुलना करून प्रेमाचे महत्त्व स्पष्ट केले आहे. प्रीतीचा प्रारंभ शारीरिक सौंदर्यामुळे निर्माण होणाऱ्या आकर्षणात असला तरी तिची परिणती आत्मिक मीलनात, बाह्य सौंदर्याकडे दुर्लक्ष करून अंत:सौंदर्याचा आस्वाद घेऊ शकणाऱ्या मनात होते अशी आपली भूमिका खांडेकरांनी कवी यशवंतांच्या 'पाणपोई'[६] या काव्यासंग्रहाला लिहिलेल्या प्रस्तावनेत स्पष्ट केली आहे. त्यांच्या प्रेमविषयक कवितेतूनही या भूमिकेचे दर्शन होते.

खांडेकरांची कविता अशी विविधांगांनी फुलत गेली आहे. 'अशोकवनात' यासारख्या कवितेतून खांडेकर पौराणिक शब्दचित्र रेखाटतात, तर 'रांगण्याकडे दे कान', 'आजचा इतिहास' 'आगरकर' या कवितांतून भारतीय इतिहास पुरुषांच्या शौर्याचे पोवाडे गातात. या विविधतेतच खांडेकरांच्या कवितेचे सौंदर्य दडलेले आहे. 'स्फूर्तिलहरी'[७] च्या प्रस्तावनेत ते लिहितात - 'काव्याला कल्पना, भावना व तत्त्वचिंतन यांच्यापैकी कशाचेही वावडे नाही. कल्पनेचे सौंदर्य, भावनेचे हृदयस्पर्शित्व अथवा तत्त्वचिंतनाचे तेज ह्यांच्यापैकी कशानेही कवितेवर रम्यता झळकू लागते. खांडेकरांच्या कवितेतही या मूल्यांशी आपले नाते जपलेले आहे.

***संदर्भ-टीपा***

*१) 'उल्का' वि. स. खांडेकर, देशमुख आणि कंपनी १९४६, पृ.१६१*
*२) आगरकर चरित्र - वि. स. खांडेकर, गणेश महादेव आणि कंपनी, १९३२*
*३) साहित्यिक खांडेकर-संपादक डॉ. एस.एस. भोसले, अजब पुस्तकाल्य, १९८०, पृ. ३०७*
*४) तत्रैव - पृ. १२३*
*५) तत्रैव - पृ. १२२*
*६) पाणपोई - कवी यशवंत, १९६३, प्रस्ता. पृ.१९*
*७) स्फूर्तिलहरी - कवी काव्यविहरी, प्रस्ता. पृ.२३,२४*



अविनाश वामन आवलगावकर
सी - ३, शिक्षक निवास, पुणे विद्यापीठ, पुणे ४११ ००७.











डॉ. गं. ना. जोगळेकर

# 'ज्ञानपीठ' पुरस्कार आणि मराठी साहित्य

## प्रतिष्ठेचा पुरस्कार

अखिल भारतीय पातळीवर सर्वोच्च सन्मानाची समजली जाणारी आणि साहित्यकृती किंवा लेखक यांच्यासाठी असलेली जी पारितोषिके विशेष प्रसिद्ध आहेत, त्यात 'ज्ञानपीठ पुरस्कार' हा सर्वाधिक महत्त्वाचा मानला जातो. मूर्तिदेवी, सरस्वती असे आणखीही काही मानाचे पुरस्कार आहेत. मध्यप्रदेश, उत्तरप्रदेश, बिहार अशा काही राज्यांनीही अखिल भारतीय स्तरावर पुरस्कार देण्याचा उपक्रम चालू केला आहे. गेली पंचेचाळीस वर्षे साहित्य अकादमीची पारितोषिके दिली जात आहेतच. पण मान्यताप्राप्त अशा प्रत्येक भाषेतील साहित्यकृतीसाठी असल्यामुळे त्यांचे महत्व त्या त्या भाषेपुरतेच उरते. ज्ञानपीठ पुरस्कार देणे सुरू होऊन आता तीस वर्षे झाली. या पुरस्काराची रक्कम प्रारंभी एक लाख होती. तीही आता वाढली आहे. पण रक्कम कमी असो की जास्त, भारतीय साहित्याच्या दृष्टीने हा केवळ त्या लेखकाचा नव्हे, तर त्या भाषेचाही गौरव मानला जातो. गेल्या तीस वर्षांत हे सातत्य राखले गेल्यामुळे ज्ञानपीठ पुरस्कार मिळणे ही प्रतिष्ठेची बाब ठरली आहे.

## पुरस्काराचे प्रयोजन

लेखकाला किंवा साहित्यकृतीला पुरस्कार दिल्यामुळे काय विशेष साधते ? आणि पुरस्कार न दिल्यामुळे काय बिघडते? असाही प्रश्न एखाद्याच्या मनात येणे शक्य आहे. जे उपलब्ध आहे त्यालाच गुणवत्तेच्या काही कसोट्या लावल्या जाणार, कसोट्या लावण्याचे काम ज्यांच्याकडे असते त्यांच्यासुद्धा काही आवडी-निवडी असणार, आणि त्यांच्या नि:पक्षपातीपणालाही काही मर्यादा असणार. पण एकदा कशातून तरी निवड करायची आणि ती निवड कुणीतरी करायची असे म्हटले की, त्याच्या काही जमेच्या बाजू आणि काही त्रुटी असणार, हे क्रमप्राप्तच आहे. साहित्यकृती निर्माण करणे हे आपले काम. त्याची प्रशंसा झाली काय किंवा न झाली काय, आपणास त्याच्याशी काही कर्तव्य नाही, असे निरपेक्ष आणि उदासीन वृत्तीचे लेखक असू शकतात. नव्हे, असतातच. मात्र असे लेखक अगदी अपवादात्मक असणार, हेही मान्य करावे लागते. एखाद्याने आपल्या कृतीला चांगले म्हटले, तिचा गौरव केला तर त्या लेखकाला आनंद वाटणे हे मनुष्य स्वभावाला धरूनच आहे. आपल्या साहित्यकृतीचा गौरव व्हावा, किंवा या साहित्यकृतीच्या निमित्ताने मानसन्मान पदरात पडावेत अशी खटपट करणारा कुणी साहित्यिक असणे अशक्य नाही. पण अशा व्यक्तींची असली कृत्ये केव्हा ना केव्हा उजेडात येऊन त्या व्यक्तीची मानहानीही संभवू शकते. स्पर्धेची भावना, जिंकण्याची म्हणजे विजिगीषु वृत्ती असणे यात अस्वाभाविक काहीच नाही. असे सन्मान प्राप्त झाल्यामुळे तो लेखक किंवा त्याची



अनुक्रमणिका

साहित्यकृती नंतर काही काळ टिकून रहाते, चर्चेचा विषय होते आणि कित्येकदा मानदंडही ठरते. गेली शंभर वर्षे दिला जात असलेला 'नोवेल पुरस्कार' यामुळेच महत्त्वाचा ठरला आहे. हा पुरस्कार तर साहित्य, विज्ञान, अर्थव्यवहार, शांतता किंवा मानवाचे कल्याण, आरोग्य, सेवा अशा विविध प्रकारचा असल्यामुळे या पुरस्काराचे महत्व अधिकच आहे. पुरस्कार स्वीकारण्याप्रमाणे पुरस्कार नाकारण्याचेही कोणाही व्यक्तीला स्वातंत्र्य असतेच. अशी व्यक्ती कित्येकदा पुरस्कार नाकारण्याने अधिक चर्चेचा विषय बनू शकते. पण सामान्यतः अशा पुरस्काराच्या व्यवहारात गोपनीयता पाळली जाते. आणि पुरस्कार स्वीकृतीबद्दलची संमती घेऊनच त्याची घोषणा होत असल्यामुळे पडद्यामागील हालचाली सहसा लोकांपुढे येत नाहीत.

### भारतातील भाषिक स्थिती

ज्या देशाची एकच एक भाषा आहे किंवा फारतर दोन-तीन प्रमुख भाषा आहेत, अशा देशांमध्ये दिल्या जाणाऱ्या पुरस्कारात गुंतागुंत किंवा अडथळे वहुधा निर्माण होत नाहीत. पण भारतासारख्या देशांचे या बाबतीतले प्रश्न मुळातच किचकट आहेत. चौदा भाषा या भारताच्या अधिकृत भाषा म्हणून घटनेने स्वीकारल्या. त्यात आणखी चार भाषांची भर पडली. या भाषांच्या लोकसंख्येच्या बाबतीत पुष्कळ विषमता आहे. हिंदी ही या देशाची राष्ट्रभाषा आहे असे मानणारेही अनेक जण आहेत; आणि हिंदीला विरोध करणाऱ्यांची संख्याही काही कमी नाही. हरियाणा, हिमाचल प्रदेश, दिल्ली, राजस्थान, उत्तरप्रदेश, विहार आणि मध्यप्रदेश एवढा मोठा भूभाग हिंदी भाषकांचा आहे. या खेरीज गुजरात, महाराष्ट्र, काश्मिर, ओरिसा, पंजाब येथील लोकांना हिंदी भाषा सहजपणे समजते. आसाम, वंगाल आणि पूर्वेकडची काही राज्ये येथे हिंदी भाषा समजण्यात थोडीफार अडचण येते. पूर्वीच्या निजाम राजवटीमुळे आंध्र प्रदेशातही हिंदी-उर्दू समजू शकते. हिंदीला मुख्यतः विरोध आहे तो तामीळ भाषकांचा. तेथेही हिंदी समजत नाही असे नाही; पण त्यांचा विरोध कायम आहे. या सर्व अवस्थेला इंग्रजीचे अस्तित्व कारणीभूत आहे.

### इंग्रजी, हिंदी आणि प्रादेशिक भाषा

भारतीय घटनेनुसार इंग्रजी ही काही भारताची भाषा नाही. तरीही राज्य कारभाराची भाषा आणि संपर्काची भाषा म्हणून इंग्रजीचे वर्चस्व गेली पन्नास वर्षे टिकून आहे. स्वातंत्र्यानंतर पंधरा-वीस वर्षांत क्रमाने इंग्रजीची जागा हिंदी घेईल आणि त्या त्या प्रादेशिक भाषांनाही महत्त्वाचे स्थान मिळेल अशी राज्यकर्त्यांची भूमिका होती. काही प्रमाणात प्रादेशिक भाषांचे महत्त्व वाढले. पण अपेक्षित वदल झाला नाही. हिंदी भाषकांचा हिंदीचा आग्रह म्हणून इंग्रजीला विरोध आणि दक्षिणेतील अहिंदी भाषकांचा हिंदीला विरोध म्हणून इंग्रजीचा आग्रह, हा घोळ गेली अनेक दशके सतत चालू आहे. इंग्रजी आणि हिंदी यांचा संमिश्र कारभार हा नवाच प्रकार आता रूढ झाला आहे. रेडिओ किंवा टीव्ही वरच्या वातम्या, खेळांची समीक्षणे इथपासून राष्ट्रपतींच्या अभिभाषणापर्यंत इंग्रजी, हिंदी हा द्वैभाषिक आविष्कार सर्वांच्या अंगवळणी पडत आहे. १९४८ मध्ये महाराष्ट्र, गुजरात यासारख्या प्रदेशांनी हिंदीच्या स्वीकारापोटी इंग्रजीकडे दुर्लक्ष केले. दहा-पंधरा वर्षे अशीच गेली. मग पुन्हा पहिलीपासूनही इंग्रजीचे स्वागत सुरू झाले. मुंबईसारख्या महानगराचे



अनुक्रमणिका

बहुभाषी रूप असल्यामुळे आणि अमराठी भाषकांची तेथे बहुसंख्या असल्यामुळे शिक्षणाचे माध्यम, उद्योग-व्यवसाय, अर्थव्यवहार या सर्व ठिकाणी इंग्रजी शिवाय भागणारच नाही अशी स्थिती मुंबईत निर्माण झाली. इंग्रजी नियतकालिकांचे धोरण यांस पोषकच होते. सभा-संमेलने, प्रसारमाध्यमे, चित्रपट आणि इतर करमणुकीचे प्रकार येथे हिंदीशिवाय भागेनासे झाले. मुंबईचे अनुकरण महाराष्ट्रात सर्वत्र प्रथमपासून होतेच. त्यामुळे हिंदीच्या आकलनात फारसा अडथळा नसणाऱ्या मराठीसारख्या भाषांची सतत कोंडी होत आली आहे. मराठी प्रमाणेच गुजराती, सिंधी, काश्मिरी, पंजाबी आणि उडिया या भाषकांचीही अशीच स्थिती आहे. इंग्रजी शिक्षणात धरसोड आणि हेळसांड झाल्यामुळे इंग्रजीवर प्रभुत्व कुणी मिळवलेले नाही, आणि हिंदी भाषा समजत असली तरी तिच्यावर प्रभुत्व मिळवून हिंदी आत्मसात करणेही कुणाला जमलेले नाही. तेव्हा भारतातील भाषिक धोरणाचा (किंवा धोरण नसण्याचा) परिणाम मराठी-गुजराती सारख्या भाषांना भोगावा लागत आहे.

## मराठीपुढील समस्या

भारतातील या भाषिक समस्येमुळे मराठीसारख्या हिंदीला जवळच्या आर्य गटातील भाषांना वेगवेगळ्या अडचणींना तोंड द्यावे लागते. हिंदी-इंग्रजीवर प्रभुत्व नसल्यामुळे अखिल भारतीय स्वरूपाच्या नियतकालिकांमध्ये मराठी भाषिक पत्रकार किंवा स्तंभलेखक आढळत नाहीत. दक्षिण भारतीय, बंगाली आणि पंजाबी किंवा हिंदी अशा लेखकांचे तेथे वर्चस्व दिसते. गुणवत्तेच्या दृष्टीने मराठी पत्रकार काही कमी नाहीत. पण त्यांच्या पत्रकारितेचे कौतुक महाराष्ट्राबाहेर कधी होत नाही. इंग्रजीच्या बाबतीत दिल्ली आणि उत्तर प्रदेश येथील लोकांचे वर्तन दुटप्पीपणाचे असते असे दिसून येईल. मातृभाषा आणि राष्ट्रभाषा म्हणून हिंदी, ज्ञानभाषा आणि शिक्षणाचे माध्यम म्हणून इंग्रजी आणि प्राचीन भारतीय भाषा म्हणून संस्कृत या भाषांचाच हे हिंदी भाषिक स्वीकार करतात. मराठी, गुजराती यांसारखी हिंदीला जवळची भाषा शिकण्याचे त्यांना अगत्य वाटत नाही. साहजिकच हिंदी आणि इंग्रजी अशा दुहेरी बळावर त्यांना प्रशासकीय पदे आणि मानाच्या जागा मिळविणे शक्य होते. हिंदी, इंग्रजी आणि याखेरीजची एक प्रादेशिक भाषा शिक्षणात असली पाहिजे असे त्रिभाषा सूत्र एकेकाळी ठरविण्यात आले आणि त्याचा बराच गाजावाजाही झाला. प्रत्यक्षात मात्र सोयिस्करपणे त्रिभाषा सूत्राकडे डोळेझाक करण्यात आली आणि इंग्रजी आणि हिंदी या दोनच भाषा आपले महत्त्व वाढवीत आहेत. लहान लहान गावांपर्यंत इंग्रजी माध्यमांच्या शाळांचे लोण पसरल्यापासून तर कोणतीच भाषा धड येत नाही आणि मराठीसारख्या मातृभाषेचेही संस्कार होत नाहीत. मराठी वाचन नाही, लेखन होणे दूरच, मराठीतून चांगले संभाषणही करता येत नाही आणि आधीपासून हिंदी किंवा इंग्रजीचे दृढ संस्कार झालेल्या उत्तर किंवा दक्षिण भारतीयांची बरोबरी करता येत नाही अशी ही दुःस्थिती आहे. मराठी माणसाची उद्योग, व्यापार, अर्थव्यवहार यांमध्ये कधीच चांगली स्थिती नव्हती, ती आजही नाही. पण तेथे भाषिक प्रश्नापेक्षा व्यापारी मनोवृत्ती आणि परंपरा नसणे हे मुख्य कारण आहे. जेथे भाषेचा फारसा संबंध येत नाही अशा क्रीडाक्षेत्रात मराठी माणसाला थोडेफार स्थान आहे. शास्त्रीय संगीताच्या

परंपरेमुळे आणि अनुकूल वातावरणामुळे गायन वादनाच्या क्षेत्रातही मराठी माणसे चांगली चमकतात. महाराष्ट्राची स्वतंत्र अशी अभिजात नृत्यकला नाही. पण गेल्या पन्नास-साठ वर्षातील सामाजिक सुधारणांमुळे कथ्थक, ओडिसी, भरतनाट्यम अशा नृत्यप्रकारांमध्ये पारंगत असणाऱ्या कलावंतांची संख्या वाढती आहे. जे हिंदीवर चांगले प्रभुत्व मिळवू शकतात असे अभिनेते आणि अभिनेत्री यांना चित्रपट आणि चित्रवाणी येथेही चांगला वाव आहे. पण एकंदरीत तुलनेने क्रीडा आणि कला या क्षेत्रात अखिल भारतीय स्तरावर मराठी माणसे फार पुढे नसली, तरी अगदीच मागे आहेत असेही म्हणता येत नाही.

## पुरस्कार मिळण्यात मराठीची उपेक्षा सकारणच

पण जीवनाचे महत्त्वाचे अंग असलेल्या साहित्यक्षेत्राकडे वळल्यास मराठीची स्थिती चांगली नाही असे म्हणणे भाग आहे. ज्ञानपीठासारखे साहित्यक्षेत्रात अखिल भारतीय स्तरावरचे जे सन्मान पुरस्कार आहेत त्यात मराठी माणसे बहुधा आढळत नाहीत, याला मुख्यत: भारताचे भाषिक धोरण कारणीभूत आहे, असेच म्हटले पाहिजे. ज्यांनी प्रथमपासून इंग्रजीचा स्वीकार केला आणि हिंदीला विरोध केला अशा कन्नड, मल्याळम आणि बंगाली भाषेतील लेखकांनीच आजपर्यंत ज्ञानपीठ पुरस्कार बहुसंख्येने मिळविले आहेत. हिंदी ही मातृभाषा असल्याच्या बळावर हिंदी भाषिक लेखकांनाही हा मान अधिकवेळा प्राप्त झाला आहे. पण धड हिंदी नाही इंग्रजीही नाही, अशा मराठी, गुजराती, सिंधी, पंजाबी, उडिया या भाषांतील साहित्यिकांना फारच अल्प प्रमाणात हे पुरस्कार मिळाले आहेत. वस्तुत: कोणत्याही लेखकाची योग्यता त्याला किती आणि कोणते पुरस्कार मिळाले यावर अवलंबून असू नये. पण स्पर्धेच्या जगात पहिल्या क्रमांकाने यशस्वी होणे स्पर्धा जिंकणे हे अपरिहार्य झाले आहे. ज्ञानपीठ पुरस्कार ही भारतीय साहित्य किंवा साहित्यिक यांची अघोषित स्पर्धाच आहे. कन्नड, मलयालम, बंगाली आणि हिंदी या भाषांमधील साहित्याला बहुतेक वेळा ते पुरस्कार प्राप्त झाले आहेत. याचा अर्थ त्या भाषा तेवढ्या साहित्याच्या बाबतीत श्रेष्ठ आहेत असा लावला जाण्याची शक्यता आहे. नव्हे, अनेकांच्या मनात हाच अर्थ अभिप्रेत असतो. एकदा पुरस्कार मिळाल्यावर त्या भाषेतील लेखकाला सामान्यत: तीन वर्षे पुरस्काराची वाट पहावी लागते. ही अट नसती तर याच भाषांनी हे सन्मान ओळीने मिळविले असते. ज्यांची ज्ञानपीठ पुरस्कार मिळण्याबद्दल चर्चा आहे असे कन्नड, मलयालम, बंगाली व हिंदी या भाषांमधील लेखक या सन्मानाची वाटच पहात आहेत. आणि त्याची ते पूर्वतयारी नेहमीच करत असतात.

## अनुवादाचे महत्त्व

ही पूर्वतयारी म्हणजे काय ? तर ज्या भाषेतील साहित्यकृतीची ज्ञानपीठासाठी निवड होण्यासारखी असते अशा साहित्यकृतीचा अनुवाद हिंदी किंवा इंग्रजी या संपर्क भाषेच्या माध्यमातून व्हावा लागतो. एवढ्यानेच भागत नाही तर हिंदी, इंग्रजीखेरीज आणखीही किमान एका भारतीय भाषेतून ती साहित्यकृती अनुवादरूपाने प्रकाशित झालेली असावी लागते. अशी साहित्यकृती आणि संबंधित लेखक याबद्दलची चर्चा किंवा समीक्षा हीही अशा बाबतीत व्हावी लागते. वर उल्लेखिलेल्या

भाषांपैकी हिंदी भाषेतील लेखक तसे सुदैवी म्हणता येतात. कारण त्यांच्या साहित्यकृतीचा अनुवाद इंग्रजी आणि एक भारतीय भाषा एवढ्यापुरताच झाला की भागते. कन्नड, मलयालम व बंगाली या भाषांमधील लेखकांनी इंग्रजी अनुवादावर प्रथमपासून लक्ष केंद्रित केले आहे. बंगाली साहित्याचा तर दबदबा विसाव्या शतकाच्या प्रारंभापासून होताच. बंकिमचंद्र, शरदचंद्र आणि रवींद्रनाथ यांनी बंगाली साहित्याला प्रतिष्ठा मिळवून दिली असल्यामुळे अन्य भाषेतील लेखक आपण होऊनच बंगाली साहित्य आपल्या भाषेत आणण्यास उत्सुक असत (हरि नारायण आपटे. वा. गो. आपटे, मामा वरेरकर, वि. सी. गुर्जर, अशोक शहाणे यांसारख्या अनेकांनी बंगाली साहित्याला मराठी रूप दिले आहे). स्वातंत्र्याच्या चळवळीत राष्ट्रभाषा म्हणून हिंदीचा अभ्यास करण्यावर सगळीकडे भर दिला जात होता. प्रेमचंद, प्रसाद, पंत, निराला, महादेवी वर्मा, जैनेंद्रकुमार, दिनकर, आज्ञेय अशा अनेक लेखकांचे व कवींचे हिंदी साहित्य मराठी किंवा इतर भाषा यांमध्ये गेल्या पन्नास वर्षांपासून अनुवादाच्या रूपाने आणले गेले. प्रभाकर माचवे, श्रीपाद जोशी, चंद्रकांत बांदिवडेकर, प्र. न. जोशी इत्यादी हिंदी आणि मराठीवर सारखेच प्रभुत्व असणाऱ्या अनुवादकांनी यांतील वाटा उचलला आहे. प्रभाकर माचवे, अनंत गोपाळ शेवडे, गजानन माधव मुक्तिबोध यांसारखे अनेक मुळात मराठी भाषिक असूनही ते हिंदीचे लेखक म्हणूनच मान्यता पावले आहेत. कन्नड आणि मलयालम या दक्षिण भारतातील भाषांच्या लेखकांनी इंग्रजी अनुवादाचा मार्ग अनुसरला आहे. या दोन्ही भाषांतील अनेक मान्यता प्राप्त लेखक इंग्रजीचे प्राध्यापक असतात. त्यामुळे त्यांना इंग्रजी अनुवाद करणे सहज शक्य होते. आणि एकदा सर्वोच्च सन्मान या भाषांना मिळाल्यावर इतर भाषांचे प्रकाशक मुद्दाम अशा गाजलेल्या साहित्यकृतींचे भाषांतर तत्परतेने करवून घेतात.

### मराठी साहित्यिकांचे अनुवादाबाबत दुर्लक्ष

एखाद्या भारतीय भाषेतील साहित्य दुसऱ्या भाषेत नेताना मध्यस्थ भाषा म्हणून हिंदीचा वापर आकाशवाणी व साहित्य अकादमी यांनी रूढ केला आहे. पण कुणाच्या तरी आग्रहामुळे किंवा लाभाच्या अपेक्षेने अनुवाद कार्य झाल्यास ते फारसे समाधानकारक होत नाही. असे अनुभवास येते. स्वत:च्या भाषेबद्दल आणि त्यातील साहित्याबद्दल ज्यांना उत्कट प्रेम आणि अभिमान असतो त्याच व्यक्ती प्रामाणिक तरीही सुंदर असे अनुवादकार्य करू शकतात. उमा आणि विरूपाक्ष कुलकर्णी किंवा मीना वांगीकर यांसारख्या अनुवादकांनी गेली पंधरा वर्षे अनुवाद कार्याला वाहून घेतले आहे. त्यामुळे गाजलेल्या कन्नड साहित्यकृती मराठीत मोठ्या प्रमाणावर व अल्प कालावधीत अनुवादित झाल्या आहेत. हे झाले स्वत:च्या भाषेतील साहित्य दुसऱ्या भाषेत आणण्याबद्दल गुजराती अनुवादक विशेष तत्पर असतात असे आढळते. मराठीत गाजणारे प्रत्येक नाटक भाषांतर होऊन गुजरातीत जाते. एवढेच नव्हे तर मराठी कवितांची भाषांतरे ही गुजरातीत सातत्याने होत असतात. मराठीच्या बाबतीत बोलायचे तर ललित वाङ्मयाच्या अनुवादाला वाहून घेणारी माणसे फारशी आढळत नाहीत. (आधी उल्लेखलेली नावे अपवादात्मकच ठरतात). सरस अनुवादासाठी साहित्याची उत्तम जाण असणारे आणि मराठीखेरीज अन्य भाषांवर चांगले प्रभुत्व संपादन केलेले अनेक

अनुवादक निर्माण झाल्याशिवाय खऱ्या अर्थाने आदान प्रदान होणार नाही. अनुवाद हे जसे शास्त्र आहे तशी ती कलाही आहे. रसिकता, मर्मज्ञता आणि परिश्रमशीलता, भिन्न भाषांची अचूक जाण अशी गुणवत्ता असणारा अनुवादक मूळ लेखकाइतका (किंवहुना त्याहून) मोठा मानला पाहिजे. पण मराठीत अनुवादकाला सन्मानाचे सोडाच, पण हक्काचे स्थानही देण्यात येत नाही. 'आम्ही फक्त मराठीत लिहिणार इतर भाषांशी आम्हाला कर्तव्य नाही' अशी भूमिका आजवरच्या बहुसंख्य मराठी लेखकांनी घेतली आहे. त्यामुळे मराठीत समर्थ लेखकांची, कवींची, नाटककारांची आणि विचारवंतांची वाण नाही (ती कधीच नव्हती) असे असूनही मराठी साहित्याच्या परंपरेविषयी आणि योग्यतेविषयी फक्त मराठी लेखकांनी व समीक्षकांनी आपला डांगोरा पिटला असला, तरी हा आवाज इतर भाषकांपर्यंत पोचलेला नाही हे कटु असले तरी सत्य आहे. गेल्या पाच-दहा वर्षांपासून यात हळूहळू वदल होत आहे. अभ्यासक्रमात (विद्यापीठाच्या पातळीवर) अनुवादित आणि तौलनिक साहित्य असे नवे विषय सुरू झाले आहेत. अनुवादासाठी कार्यशाळा, चर्चासत्रे यांचे आयोजन होत आहे. अनुवादित साहित्याला आकर्षक असे ग्रंथ पुरस्कारही मिळवू लागले आहेत. औद्योगिक क्षेत्रात एक गरज म्हणून व्यावसायिक अनुवादक पुष्कळ प्रमाणात निर्माण झाले आहेत. साहित्याच्या क्षेत्रातही असे घडल्यास येत्या पाच-दहा वर्षांत मराठी साहित्य अधिक प्रमाणात अन्य भाषांमध्ये जाऊ शकेल असे म्हणता येते. मात्र त्यासाठी व्यक्तिगत किंवा सामुदायिक प्रयत्नामधील सातत्यासाठी अनुवादशास्त्राच्या मुलभूत तत्त्वांचा परिचय योजनावद्ध रीतीने होण्याची गरज आहे. केवळ अनुवादाची लाट आली म्हणजे सगळे होऊ लागते असे नाही. कारण लाट जशी येते तशी ती तरूनही जाते. शासकीय योजनेनुसार पुण्यात डेक्कन कॉलेजमध्ये एक (पश्चिम भारतासाठी) प्रादेशिक भाषाकेंद्र आहे. गुजराती, सिंधी आणि मराठी यांतील अभ्यासकांना येथे प्रवेश मिळतो. या योजनेला तीस वर्षे झाली तरी अजून अनेकांना अशी काही सोय असल्याची माहितीही नाही. आजवर फार थोड्या मराठी अभ्यासकांनी या योजनेचा लाभ घेतला आहे. नवीन शिकण्यावद्दलची उदासीनता याला





अनुक्रमणिका

कारणीभूत आहे.

## अनुवाद आणि परावलंबित्व

कोणत्याही भाषेतील वाङ्‌मयाचा त्याच भाषेतून प्रत्यक्ष आस्वाद घेता येणे ही गोष्ट कितीही महत्वाची मानली, तरी भारतासारख्या बहुभाषिक देशात मध्यस्थ म्हणून अनुवादाचा आधार घेतल्याशिवाय भागत नाही. नोवेलसारख्या जागतिक स्तरावरच्या पारितोषिकासाठीही इंग्रजी, फ्रेंच, जर्मन यांसारख्या भाषांमधील अनुवादाचाच आधार घेतला जातो. स्वतंत्र भारतात इंग्रजीचे स्तोम मानणे योग्य नाही हे खरे असले, तरी अमराठी आणि अभारतीय वाचकांपर्यंत पोचण्यासाठी आज (आणि भविष्यकाळातही) इंग्रजीचा वापर होणे अपरिहार्य आहे. दक्षिण भारतीय लेखक आपल्या साहित्यकृतीचा अनुवाद स्वतःच करतात. कारण चांगला अनुवाद करण्याइतके इंग्रजीवरील प्रभुत्व त्यांनी संपादन केलेले असते. आणि जरी तो अनुवाद तितका समर्थ नसला तरी मूळ लेखकाला अमूक म्हणायचे होते, अनुवादकाला मात्र ते इंग्रजीत व्यक्त करता आले नाही, अशी टीका झाली तरी त्या बऱ्या वाईटाची जबाबदारी मूळ लेखकाचीच असते. स्वतः लेखकच अनुवादक असल्यामुळे अनुवादाचे कार्य अल्पावधीत होते. त्यामुळे गाजणारे कन्नड किंवा मल्यालम् भाषेतील पुस्तक अनुवादाच्या रूपाने सर्वांपर्यंत लगेच पोचते. मराठी लेखक येथेही कमी पडतात, असे म्हणावे लागते. मराठीतून चांगले ललित लेखन करणारे आणि स्वतःच त्याचा इंग्रजीत (किंवा हिंदीत) सहजसुंदर अनुवाद करू शकणारे लेखक आज तरी फार दुर्मिळ आहेत. विंदा करंदीकर, दिलीप पुरुषोत्तम चित्रे, भालचंद्र नेमाडे, के. ज. पुरोहित, गंगाधर गाडगीळ अशी चारपाच नावेच घेता येण्यासारखी आहेत. याही लेखकांना स्वतःच्या साहित्याचा स्वतःच तत्परतेने अनुवाद करावा असे कधी वाटलेले नाही. चांगल्या अनुवादकांची आणखी दोन-चार नावे घेता येतील. पण हे अनुवादक चांगले ललित लेखक नाहीत असे दिसून येते. एकंदरीने मराठी ललित लेखक हा अनुवादक नावाच्या मध्यस्थावरच आज तरी अवलंबून आहे. हे बदलायचे असेल तर कन्नड किंवा मल्यालम् लेखकांप्रमाणे मराठी लेखकांनी स्वतःच अनुवादक बनणे गरजेचे आहे.

## लेखनातील सातत्याचा अभाव

ज्ञानपीठ पुरस्काराला आता तीस वर्षे झाली. याचा उल्लेख आधी आलाच आहे. हा पुरस्कार कोणाही लेखकाच्या समग्र साहित्यिक कर्तृत्वाला अनुलक्षून दिला जात असला, तरी असामान्य योग्यतेची साहित्यकृतीही विचारात घेतली जात असते. पुरस्कार दिला जाण्यापूर्वी सामान्यतः दहा-पंधरा वर्षांतील ती साहित्यकृती असावी लागते, ( हा कालावधी वीस वर्षांपर्यंतचा धरला असल्याचेही उदाहरण आहे. पण ते अपवादात्मक ) या नियमाकडे लक्ष देणे अगत्याचे आहे. याचा एक अर्थ असा की, लेखनकार्याच्या सुरुवातीला मोठी उंची गाठलेली एखादी साहित्यकृती लेखकाने निर्माण केली म्हणजे तो लेखक कायमचा मोठा झाला असे नव्हे. केवळ एकच नव्हे, तर कसदार अशा अनेक साहित्यकृती दीर्घकाळपर्यंत निर्माण करण्याची क्षमता त्या लेखकाच्या ठिकाणी असली पाहिजे. गंगाधर गाडगीळ, व्यंकटेश माडगूळकर 'ऋतुचक्र' लिहिणाऱ्या दुर्गा भागवत, 'रथचक्र' लिहिणारे श्री. ना. पेंडसे हे सर्व मोठ्या योग्यतेचे मराठी

लेखक खरे; पण ज्या ताकदीचे लेखन त्यांनी सुरुवातीच्या पाच-दहा वर्षांत केले तसे नंतरच्या काळात केले असे म्हणता येईल का? या सर्वांचे लेखन विशिष्ट मर्यादेखाली घसरले नाही एवढे फारतर म्हणता येईल. अनेक कवी आणि नाटककार यांच्या बाबतही असेच म्हणावे लागते. लेखनात सातत्य आहे, असे काही लेखकांबद्दल निदान म्हणता तरी येते; पण पुष्कळ लेखक असेही दिसतात की, एखाद्या दुसऱ्या पुस्तकामुळे ते गाजतात, लेखक म्हणून त्यांचा बोलबाला त्याच्या बळावर होत रहातो. त्यातले जे कवी असतात ते त्याच त्या पाच सहा कविता कविसंमेलनांतून सादर करत राहतात. अशा स्थितीत मराठी वर अन्याय होतो असे म्हणण्याने वस्तुस्थिती लपविता येत नाही.

### तत्त्व आणि व्यवहार

मराठीत आजवर फक्त दोन मान्यवर लेखकांना ज्ञानपीठ पुरस्कार देण्यात आले. दोघांनाही ते तसे उशिराच मिळाले. हे पुरस्कार जाहीर झाले तेव्हा दोघांनीही वयाची पंचाहत्तरी ओलांडली होती. इतर भाषांमध्येही प्रायःवयोवृद्धांनाच हा मान मिळाला आहे. सुभाषचंद्र मुखोपाध्याय (बंगाली कवी) वा यू. आर. अनंतमूर्ती (कन्नड कादंबरीकार) यांना हा मान साठीच्या सुमाराला मिळाला आहे, हेही लक्षात घेतले पाहिजे. अनुवादाच्या रूपाने वि. स. खांडेकर बऱ्याच आधीपासून अमराठी वाचकांना चांगले परिचित असले तरी मराठी तज्ज्ञांच्या समितीमध्येच त्यांच्या निवडीबद्दल एकवाक्यता होत नव्हती. म्हणून खांडेकरांचे नाव पुढे आले नाही. जेव्हा एकवाक्यता झाली तेव्हा 'ययाती' कादंबरी प्रकाशित होऊन पंधरा वर्षे उलटली होती. कालावधीची अट शिथिल झाली तेव्हा कुठे खांडेकरांना हा मान मिळाला ! शिरवाडकरांचीही स्थिती फारशी वेगळी नाही. 'नटसम्राट' ही त्यांची सर्वश्रेष्ठ कृती हे सर्वमान्य आहे. पण केवळ याच कृतीबद्दल त्यांना हा मान मिळालेला नाही. तर 'मुक्तायन' सारख्या काही कविता संग्रहांनाही जमेस धरावे लागले. कवी म्हणून कुसुमाग्रज श्रेष्ठ खरे; पण चांगल्या अनुवादाच्या अभावी अमराठी वाचकांपर्यंत ते पोचले नव्हते. कन्नड, हिंदी, बंगाली इत्यादी भाषांतील समितीचे सदस्य आपल्या लेखकाला हा मान मिळावा म्हणून सतत प्रयत्नशील आणि दक्ष असतात. या भाषांमधील ज्या लेखकांना किंवा कवींना हा पुरस्कार मिळाला ते सगळेच काही अगदी सारख्या योग्यतेचे नव्हेत, हे त्या समिती सदस्यांनाही माहीत आहे. पण मराठी सदस्यांइतके तत्त्वनिष्ठ आणि आग्रही असे न राहाता तत्त्व आणि व्यवहार













यांची सांगड घालणे त्यांना इष्ट वाटते.

**'वृथा ही बढाई सुकार्याविणे'**

पन्नास वर्षापूर्वी मर्ढेकरांनी जागतिक साहित्यात 'मराठीला मानाचे तर राहोच पण नामाचेही स्थान नाही', असे मत व्यक्त केले होते. त्यामुळे नोवेलसारख्या आंतरराष्ट्रीय पातळीपर्यंत मराठी साहित्य पोहचणे ही फार दूरची गोष्ट झाली. (१९६८ च्या सुमारास मराठी नोवेल पारितोषिक द्यायचे झाले तर कोणास द्यावे ? अशी विचारणा 'ललित' मासिकाने केली होती. ललितच्या वाचकांनी आचार्य अत्रे यांची निवड केली होती. (आचार्य अत्रे हे मराठीतले गाजलेले लेखक खरे. त्यांचे इंग्रजीवरही चांगले प्रभुत्व होते. पण त्यांचे किती साहित्य अमराठी किंवा अभारतीय वाचकांना माहीत होते ? याचे समाधानकारक उत्तर मिळत नाही. तेव्हा सर्वश्रेष्ठ पारितोषिकाची नुसती अपेक्षा वाळगून काय होणार?) नोवेल पारितोषिकाचे राहू द्या, पण भारतीय साहित्यातल्या श्रेष्ठत्त्वाचा मानविंदू ठरलेले ज्ञानपीठ (किंवा सरस्वती, मूर्तिदेवी इत्यादी आणखी काही) पुरस्कार मराठीकडे अधिक प्रमाणात आणि सातत्याने वळायला पाहिजे असतील, तर व्यक्तिशः आणि सामुदायिकपणे बरेच काही करायला पाहिजे हे उघड आहे. आणखी दोन चार मराठी लेखकांना हा मान मिळाला म्हणजे मराठी साहित्यावद्दल भारतीय वाचकाला अधिकच कुतूहल वाटेल आणि मराठी साहित्य इतर भाषांत पोचण्याची प्रक्रिया अधिक प्रमाणात सुरू होईल. असे घडावे असे कुणाही मराठी माणसाला वाटणे स्वाभाविक आहे. पण फार पूर्वी माधव जूलियन यांनी आपल्याला इशारा देऊन ठेवला आहे:

'मराठी असे आमुची मायवोली
वृथा ही बढाई सुकार्याविणे ।'

बढाई मारण्यात विसावे शतक गेले. निदान एकविसाव्या शतकात तरी 'सुकार्य' होईल असे वाटते.

□□

डॉ. गं. ना. जोगळेकर
मनीषा सोसायटी, कर्वेनगर, पुणे ४११ ०५२

## *ज्ञानपीठ पुरस्काराचे मानकरी कोण असावे?*

*मराठीतील साहित्यिकांपैकी यापुढील ज्ञानपीठ पुरस्कार कोणाला मिळावा असे तुम्हाला वाटते आणि का?*

*आपले मनोगत सुमारे तीनशे शब्दांत मुद्देसूद मांडून ते संपादक, महाराष्ट्र साहित्य पत्रिका, टिळक रोड, पुणे ४११ ०३० या पत्त्यावर १० ऑक्टोबर १९९७ पर्यंत अवश्य पाठवावे. निवडक मनोगतांना म.सा.पत्रिकेच्या दिवाळी अंकात प्रसिद्धी दिली जाईल. कृपया फक्त नावे सुचवू नयेत.*

*संपादक*



अनुक्रमणिका

शीला निपुणगे

# मल्हार महुर्डे गगनीं दाटलें ...!

'पाऊस' ही कवीमनातल्या कवितेला जाग आणणारी अनोखी नैसर्गिक घटना आहे. पाऊस जरी दरवर्षी नित्यनेमाने येत असला, तरी प्रत्येक वेळी त्याच्या येण्यात नावीन्य असतं. कितीतरी वेगवेगळ्या रूपातून तो आपल्याला भेटत असतो. कधी तो टपोऱ्या थेंबांतून टपटपत येतो; तर कधी अनावर वेगाने धाराधारांतून बरसतो. कधी रिमझिम पडत रहातो; कधी अहोरात्र रिपरिपत रहातो तर कधी धुवांधार कोसळून मोकळा होतो !

पावसाच्या जोडीला कधी घनगंभीर मेघगर्जना असते; कधी विजांचा चमचमाट असतो; तर कधी पाऊसथेंबांतून उन्हात चमकणारं मनोहर इंद्रधनुष्य असतं !

पावसाची ही अनेकविध रूपं-त्याचे विविध आविष्कार-मानवी मनावर जादू करीत असतात. मग कधी आश्चर्याने, कधी भीतीने, कधी अतीव आनंदाने तर कधी कमालीच्या समरसतेने तो पावसाची विविध अंगे न्याहाळीत असतो, अनुभवीत असतो; आणि अशाच एखाद्या उत्कट अनुभूतीतून कविता जन्म घेते !

पावसाविषयीचे मनुष्याचे हे आकर्षण फार पुरातन आहे. अगदी जुन्या मराठी काव्यातही 'पाऊस' या विषयाला अत्यंत जिव्हाळ्याचे स्थान मिळालेले दिसते.

विशेषतः संतकाव्यात पावसाचे उल्लेख अनेक वेळा आलेले दिसतात. संत ज्ञानेश्वर, संत नामदेव, समर्थ रामदास अशा थोर संतांपासून जोगा परमानंद, दासोपंत, निजानंद, निळोबाराय, कृष्णदास, रमावल्लभदास इत्यादी अनेक संतकवींच्या कवितेत, गर्जणाऱ्या मेघांचे, चमकणाऱ्या विजांचे आणि वर्षणाऱ्या जलधारांचे वेगवेगळ्या प्रकारांनी केलेले वर्णन आढळते.

संतकाव्याची प्रमुख प्रेरणा ईश्वरभक्ती ही असल्याने भौतिक, चराचर सृष्टीमध्ये त्यांनी ईश्वराला पाहिले. त्याचे अस्तित्व अनुभवले आणि आपल्या काव्यातून या भौतिक घटनांच्या साक्षीने ईश्वराचे आराधन केले.

'पाऊस' ही तर सर्वांनाच जीवन देणारी चैतन्यमय भौगोलिक घटना. या पावसाचा चैतन्यदायी स्पर्श संतकवींच्या अंतःकरणाला झाला. तनामनाला चैतन्य देणारा पाऊस कधी त्यांचा सखा बनला, कधी सांसारिक उपाधींचे प्रतीक बनला, तर कधी त्यांचा सावळा श्रीरंग बनून आला. कधी ते चातक होउन तर कधी मयूर बनून त्याची वाट पाहू लागले. त्याच्या कृपेच्या वर्षावाने आनंदू लागले, धन्य होऊ लागले.

त्यांच्या काव्यातून त्यांच्या मनात दाटलेली ही असोशी पावसाप्रमाणेच झिरमिरत राहिली, भक्तिप्रेमाने त्यांचे मन तुडुंब भरून वाहू लागले. भक्तिप्रेमाचा हा उमाळा कवितेच्या शब्दाशब्दातून उमटत राहिला. यापैकी काही रचना तर आशय आणि अभिव्यक्ती या दोन्हीतील एकरूपतेमुळे अक्षर ठरल्या आहेत.



अनुक्रमणिका






*प्राचीन मराठी संतवाङ्मयात संत नामदेवांची भावकविता आपल्या वेगळेपणाने उठून दिसणारी आहे. नामदेवांची भक्तिभावना मुळातच उत्कट. त्यातून शब्दांच्या अपूर्व व्यंजक शक्तीमुळे त्यांच्या कवितेला एक उच्च परिमाण लाभले आहे. त्यांच्या कवितेत मनाला मोहून टाकणारे भावसौंदर्य आहे. नेमकेपणा, अल्पाक्षररमणीयत्व, प्रासादिकता, श्रुतिमनोहरता, नादमयता, चित्रमयता इत्यादी गुणवैशिष्ट्यांमुळे नामदेवांची काव्यरचना चटकन् मनाला भिडते. त्यांच्या भाववृत्तीला अध्यात्मिक चिंतनाची जोड आहे. ऐंद्रिय संवेदनांच्या द्वारे अतींद्रिय अनुभूती व्यक्त करण्याचे विलक्षण सामर्थ्य त्यांच्या प्रतिभेत आहे. त्यातूनच सिद्ध होते त्यांची अध्यात्मिक भावकविता !*

*आषाढ वद्य त्रयोदशी ही नामदेवांची पुण्यतिथी. या निमित्ताने त्यांच्या दोन काव्यरचनांचा शीला निपुणगे यांनी घेतलेला हा रसास्वाद.*

*संपादक*

संतवाङ्मयातील या पावसात मुशाफिरी करीत असताना मला सर्वांत भारावून टाकले ते संत नामदेवांच्या एक -दोन रचनांनी ! नामदेवांची भक्तिभावना तर निर्विवाद श्रेष्ठ प्रतीची. त्यात त्यांच्या रचनेतील अपूर्व व्यंजना आणि अनुपम शब्दलावण्य यांमुळे त्यांच्या या रचना फार उत्कृष्ट उतरल्या आहेत. नामदेवांच्या काही रचना आकलनसुलभ आहेत तर काही, गूढार्थामुळे अधिकच आकर्षक बनल्या आहेत.

कधी-कधी अगदी सांकेतिक अशी चातकाची प्रतिमा योजून साध्या-सोप्या, प्रासादिक शब्दात नामदेव ईश्वरभेटीविषयीची तळमळ प्रकट करतात —

तळियाचें पाळीं वृक्षावरीं बैसुनी । कैसा चातक वोभाइतो रे ।
ताहाना फुटे परी उदक नेघे । मेघाची वाट पाही रे ।
तैसा येईं बा कान्हया येईं बा कान्हया ।
जीवींच्या जीवना केशीराजा रे ॥

येथे-तळयाकाठच्या वृक्षावर बसून मेघाची व्याकुळतेने वाट पाहणाऱ्या चातकाच्या प्रतिमेतून ते ईश्वरभेटीविषयीची आपली तळमळ व्यक्त करतात. येथे भक्त हा चातक; तर परमेश्वर हा मेघ आहे. तो जीवांचे जीवन आहे. 'या मेघासारखाच तूही कृपेचा वर्षाव करीत ये' असे नामदेव स्वत:च्या जीवाचे जीवन असलेल्या कान्हयाला-केशीराजाला आर्ततेने आळवीत आहेत.

ईश्वरभेटीविषयीची ही तळमळ, ही आर्तता आणि व्याकुळता हा नामदेवांचा स्थायीभाव आहे. त्यांच्या अंत:करणातील ही उत्कट ओढ तितक्याच भावरम्यतेने त्यांच्या रचनांमधून आविष्कृत झालेली दिसते.

आशय आणि अभिव्यक्ती या दोन्ही अंगांनी अभिनव तरीही प्रभावी असलेल्या त्यांच्या दोन रचनांचा आस्वाद येथे घ्यावासा वाटतो.

यापैकी पहिली रचना अशी आहे -

'मल्हार महुडें गगनीं दाटलें । विजु खळें गर्जिन्नलें । गे माये ॥

गावद पाहाया लोकरी । कैसे वरुषताह मधुधारा । ग माय ॥
आनंदे मयूरें नाचती आपैसे । प्रेमें नीलकंठ झाले तैसे । गे माये ॥
नामया स्वामी दृष्टी सोज्वळ । जीव लागला गोपाळे । गे माये ॥

ही संपूर्ण रचना म्हणजे नामदेवांच्या काव्यकलेचा अपूर्व असा आविष्कार आहे. मुळात नामदेवांच्या अंत:करणातील अनन्य भक्तीला खेंव देतच यातील प्रत्येक शब्द आलेला आहे. भक्तिरसात डुंबत असलेले नामदेवांचे अंतरंग अनुपम शब्दलाघवातून येथे प्रकट झाले आहे. यातील प्रत्येक शब्दात हे अनोखे लाघव जाणवत रहाते.

रचनेचा पहिलाच चरण याची साक्ष पटवितो —

'मल्हार महुडें गगनीं दाटलें ।'

आकाशात दाटून आलेल्या मेघाला, नामदेव 'महुडा' हे लाडिक नाव देतात. एखाद्या लाडक्या, छोट्या, गोड बाळाला आत्यंतिक प्रीतीने 'बबडा' 'छबडा' म्हणावं, तसे नामदेव आकाशातल्या सावळ्या मेघाला 'महुडा' असं कौतुकाने, प्रेमाने म्हणताहेत आणि हे 'महुडें' तरी कसे तर 'मल्हार' आळवीत येणारे...।

'मल्हारा'ची सुरावट पावसाचे आगमन सूचित करणारी !

शास्त्रीय संगीतातील 'मल्हार' या रागाचे घनगंभीर मेघगर्जनेशी नाते आहे. 'मल्हार' या नामाचा विशेषणासारखा नामदेवांनी केलेला उल्लेख किती मार्मिक आहे ! 'मल्हार महुडें' या दोनच शब्दांमधून 'मल्हाराच्या, घनगंभीर सुरावटीसारखे गर्जना करीत येणारे सावळे मेघ' हा सगळा आशय ते समर्थपणे व्यक्त करतात. नामदेवांच्या शैलीतील 'अल्पाक्षररमणीयत्व' येथे प्रकर्षाने प्रत्ययाला येते. तसेच शास्त्रीय संगीतातील त्यांची गतीही जाणवते.

हे 'मल्हार महुडें' आकाशात दाटून येतात, त्याच वेळी विजेचा प्रकाशही गर्जत येतो—
'विजु खळें' गर्जिन्नलें । गे माये ॥'

ही रचनाही अतिशय श्रवणमधुर आहे. विजेसाठी नामदेव 'विजु' ही लाडिक संज्ञा वापरतात. आणि विजेचा कडकडाट वर्णन करताना ते 'गर्जणे' या कठोरव्यंजनी क्रियापदाचे 'गर्जिन्नलें' असे मधुर रूप योजतात. यातील 'न्न' या जोड अनुनासिकामुळे तर त्यातील नादमधुरता अधिकच वाढली आहे.

गर्जणारे, दाटलेले काळे मेघ आणि कडाडणारे, प्रकाशणारे विजेचे वलय या दोन्ही आक्रमक भौतिक घटना नामदेवांना काव्यमय आणि मनोहर वाटतात. कारण त्यांच्या दृष्टीने या निव्वळ भौतिक घटना नव्हेतच, तर हे एक अध्यात्मिक रूपक आहे. अंत:करणात अष्टसात्त्विक भाव दाटून आलेले आहेत आणि मग इंद्रियातीत असा दिव्य प्रकाश सर्वत्र भरून रहावा असे काहीसे झाले आहे. येथे 'दाटणे' हा इंद्रियजन्य अनुभव आहे; तर 'विजु खळें -' हा इंद्रियातीत साक्षात्काराचा प्रत्यय आहे. नामदेवांची कविता आणि अध्यात्मिकता किती सहजपणे एकरूप झाल्या आहेत याचा येथे सुखद प्रत्यय येतो. त्याचबरोबर नामदेवांच्या वृत्तीतले मार्दव येथे त्यांच्या शब्दरचनेतही उतरलेले दिसते.

आकाशात मेघ दाटतात त्याचवेळी वीज चमकते आणि मग पाठोपाठ येतात जीवनदायी जलधारा ! ओथंबलेले हे मेघ वर्षाव करतात मधुधारांचा ! मधुर धारांमधून ते जमिनीकडे

झेपावतात. कशासाठी? तर गोविंद पहाण्यासाठी !

'गोविंद पहाया लौकरी । कैसे वरुषताहे मधुधारी । गे माये ॥-'

येथे 'मधुधारी' या एकाच क्रियाविशेषणातूनही नामदेवांनी जीवनदायी जलधारांचा अवघा गोडवा, माधुर्य, शीतलता आणि पावित्र्य किती समर्थपणे व्यक्त केले आहे ! मधुर आणि चैतन्यदायी अशा या जलधारा गोविंदाला पहाण्यासाठी आवेगाने-लौकरी-पृथ्वीवर झेप घेताहेत. येथे 'लौकरी' या क्रियाविशेषणातून नामदेवांची परमेश्वरभेटीविषयीची उत्कंठा, त्यांच्या मनातील अधीरता नकळत व्यक्त झाली आहे. 'गोविंदाचे सत्वर दर्शन घेण्यासाठी हे 'मल्हार महुडे' मधुमधुर अशा धारांमधून कसे वर्षाव करताहेत !-' अशा उद्‌गारवाचक रचनेमुळे नामदेवांच्या मनातील भाव अधिकच गहिरा बनला आहे.

परमेश्वर आणि भक्त यांच्यातील सनातन नाते स्पष्ट करताना संतवाङमयात मेघ आणि चातक हा संकेत जसा वारंवार येतो तसाच वऱ्याच वेळा मेघ आणि मयूर हा संकेतही आलेला दिसतो. दाटलेल्या मेघाच्या दर्शनाने मयूर आनंदित होऊन नृत्य करतात, तसेच परमेश्वरी साक्षात्काराच्या कल्पनेनेही भक्तांचे हृदय आनंदाने नाचू लागते.

इतरत्र एके ठिकाणी मेघ-मयूराचा हा संकेत योजताना नामदेवांनी म्हटले आहे -

'रानींच्या मयूरा नृत्या न पैं ये । तुजवीण मेघराजा रे ॥
शंखचक्रगदापद्‌म पीतांबरधारी । अझुनि कां न पावशी रे ॥-'

येथे - आकाशात मेघ दाटल्याशिवाय रानात मयूरांना नृत्य करायला सुचत नाही. त्याचप्रमाणे शंखचक्रगदापद्‌म पीतांबरधारी अशा रूपाच्या दर्शनाशिवाय आपले कशातच लक्ष लागत नाही. म्हणून 'तू अजूनही का बरे पावत नाहीस ?' असा व्याकुळ प्रश्न नामदेवांनी परमेश्वराला केला आहे.

प्रस्तुत रचनेत हाच 'मेघ-मयूरा' चा संकेत वापरून नामदेव म्हणतात,

'आनंदे मयूरें नाचती आपैसे । प्रेमें नीलकंठ झाले तैसे । गे माये ॥-'

गगनात मल्हार महुडे दाटून आल्यानंतर मयूर आनंदाने आपैसे-आपण होऊन-नर्तन करीत आहेत; तसेच कवीचे मनही प्रमुदित झाले आहे. नृत्य करणाऱ्या या मयूरांचा एक विशेष गुणधर्म नामदेवांनी मोठया खुबीने येथे सूचित केला आहे. मयूर हे नीलकंठ असतातच पण ते नीलकंठ का झाले असावेत ? 'नीलकंठ' या शब्दाला आणखी एक गर्भितार्थ आहे. नीलकंठ म्हणजे, ज्याचा गळा विषप्राशनाने निळा झाला आहे तो ! आणि हे विषप्राशन कसे? तर प्रेमाने केलेले ! भक्तिप्रेमासाठी प्रसंगी विषप्राशन करण्याचीही तयारी असलेल्या भक्ताचेच 'नीलकंठ मयूर' हे प्रतीक नामदेवांनी योजले असेल का ?

या ठिकाणी एक गोष्ट नोंदवावीशी वाटते. ती म्हणजे काही वेळा नामदेव मेघ-मयूर हे प्रतीक परमेश्वर-भक्त हे नाते स्पष्ट करण्यासाठी वापरतात. उदाहरणार्थ- वरील रचनेत 'अझुनि का न पावशी रे ?' असे म्हणताना मेघराजाच्या ठिकाणी ते परमेश्वराला पाहतात. मात्र 'मल्हार महुडे' या रचनेत मेघ हे स्वत:च गोविंदाला भेटण्यासाठी पृथ्वीवर येत आहेत — 'गोविंद पहाया लौकरी । कैंसे वरुषताहे मधुधारी ।' असे त्यांनी स्पष्ट म्हटले आहे. येथे मेघ हे भक्ताचे प्रतीक आहे. त्यामुळे एका रचनेत परमेश्वर असलेला मेघ दुसऱ्या रचनेत भक्त होऊनही येऊ

शकतो, असे दिसते; म्हणजेच मेघाची प्रतिमा नामदेव कधी परमेश्वरासाठी तर कधी (म्हणजे प्रस्तुत रचनेत) भक्तासाठी योजताना दिसतात. अर्थात संतमंडळींना सर्व चराचरातच परमेश्वर दिसत असल्याने त्यांच्या या प्रतिमा त्या त्या वेळी समर्पक अशाच ठरतात.

या ठिकाणी मात्र मेघ हे गोविंद पहाण्यासाठी आले आहेत. आणि मेघांच्या दर्शनाने मयूर आनंदित झाले आहेत. अशा दुहेरी प्रतिमा नामदेवांनी योजल्या आहेत. मात्र या दोन्ही प्रतिमांमधून परमेश्वर भेटीसाठी उचंबळणारे त्यांचे अंत:करण प्रतीत होत असल्याने या दोन्ही प्रतिमा उचित वाटतात. ही परमेश्वरभेटीची आस रचनेच्या अखेरीस प्रांजलपणे व्यक्त होते -

'नामया स्वामी दृष्टी सोज्वळ । जीव लागला गोपाळे । गे माये ॥'

स्वामींच्या-सदगुरूच्या-सोज्वळ अशा कृपाकटाक्षासाठी आसुसलेले नामदेवांचे मन गोपाळाच्या चरणाशी लागले आहे, अशा शब्दात ते आपल्या मनातील ईश्वराचा ध्यास व्यक्त करतात.

या छोट्याशा परंतु आशयगर्भ रचनेत 'गे माये' हे संबोधन नामदेवांनी पालुपदासारखे योजले आहे. यामुळे संपूर्ण कवितेला एक तोल प्राप्त झाला आहे त्याचप्रमाणे लयबद्धता, गेयता आली आहे यात शंका नाही. पण याशिवाय 'गे माये' या संबोधनाला एका उत्कट, आर्जवी भावनेचा स्पर्श झालेला आहे. एका परीने हे संबोधन समस्त संतांच्या 'विठू माऊली'ला उद्देशून असावेसे वाटते. तथापि तत्कालीन संतांच्या रचनेत बऱ्याच वेळा आढळणारा असा हा शब्दप्रयोग आहे. संत ज्ञानेश्वरांच्या प्रसिद्ध विराणीमध्ये 'पैल तो गे काऊ कोकताहे । शकुन गे माये सांगताहे ॥' असा त्यांनी योजलेला हा शब्दप्रयोग सर्वश्रुतच आहे.

नामदेवांनी योजलेल्या 'गे माये' या संवोधनातही एक लाडिक आर्जव आहे. प्रत्येक कडव्यानंतर येणाऱ्या या संवोधनामुळे संपूर्ण रचनेत एक प्रकारचा गोडवा, लडिवाळपणा आला आहे. माऊलीच्या भेटीतली वत्सलता, जिव्हाळा, आपुलकी, ममत्व हे सारे भाव 'गे माये' या लाडिक हाकेतून प्रतीत झाले आहेत आणि शेवटी 'जीव लागला गोपाळे गे माये' अशी अनिवार ओढ व्यक्त करून नामदेव एकंदर लौकिक सृष्टीचा धागा सहजपणे अलौकिक ब्रह्मतत्त्वापर्यंत नेताना दिसतात.

नामदेवांच्या रचना आशयाच्या दृष्टीने जशा समृद्ध असतात, तशाच अनुपम शब्दयोजनेमुळे त्या सुंदरही होतात. अप्रतिम शब्दलावण्य ही नामदेवांना प्राप्त झालेली दैवी देणगीच आहे. आणि व्यंजना हा त्यांच्या अशा रचनांचा प्राण आहे. शब्दांच्या मूळ वाच्यार्थाचा-अभिधा शक्तीचा-अजिवात लोप होऊ न देता आपल्या मनातील गूढार्थ, व्यंजनेच्या साहाय्याने रसिकांपर्यंत पोहोचविण्याचे सामार्थ्य ज्ञानदेवांप्रमाणेच नामदेवांच्याही प्रतिभेत आहे. त्यामुळे वरवर सर्वसाधारण भौतिक वाटणाऱ्या 'पाऊस' या घटनेतून येथे नामदेवांनी परमार्थातील गूढ असे तत्वज्ञान अप्रत्यक्षपणे सांगितले आहे.

'मल्हार महुडें' या कवितेचा दृश्य आविष्कार विलोभनीय आहेच; पण त्यापेक्षाही त्यातील सुप्त अद्वैतानुभूती मनाला खोल स्पर्श करते. नामदेवांना आलेला अद्वयानंदाचा अनुभव, ते दाटलेल्या मेघात, गर्जणाऱ्या विजेत, वर्षणाऱ्या धारांमध्ये आणि नाचणाऱ्या मोरांमध्ये घेताना दिसतात तेव्हा-

'बोलीं अरूपाचें । रूप दावीन । अतींद्रिंय परी भोगवीन । इंद्रियांकरवीं ॥-'

या ज्ञानेश्वरांच्या प्रतिज्ञेचीच प्रचीती येते. इंद्रिय संवेदनांच्या द्वारे अतींद्रिय अनुभूती शब्दबध्द करताना नामदेव तिला भावनोत्कटतेची डूब देतात आणि मग त्यातूनच सिद्ध होते 'मल्हार महुडें' सारखी हृद्य, अध्यात्मिक भावकविता !

परमेश्वराशी तादात्म्य पावणे हे संतांचे जीवनध्येयच. त्यांच्या काव्याचे प्रयोजनही ईश्वराशी सायुज्यता पावणे हेच होते. नामदेवांच्या दुसऱ्या एका रचनेतून त्यांची सायुज्यमुक्तीची ही कल्पना काहीशी गूढपणे व्यक्त झालेली दिसते. येथे, आषाढातल्या पावसाचे निमित्त करून नामदेवांनी देव आणि भक्त यांच्यातील एकरूपतेचा अतिशय मनोरम वेध घेतला आहे.

पावसाच्या जादूने मनात कविता जागते हे खरे; पण त्यातही आषाढातला पाऊस काही अनोखाच ! मनामनातल्या संवेदना हळुवारपणे जाग्या करणारा, कसलीशी अनामिक हुरहूर लावणारा, अंतर्यामीच्या वेदनेला साद घालणारा आषाढातला हा पाऊस... ! याने महाकवी कालिदासालाही बेचैन केले, व्यथित केले आणि मग त्याच्या मनातली सगळी आर्तता आणि व्याकुळता 'मेघदूता'च्या काव्यरूपातून अवतरली, संस्कृत साहित्यात अजरामर ठरली !

हा आषाढातला पाऊस तसाच आक्रमकही असतो; चराचरावर अधिराज्य गाजवतच तो येतो. काळेसावळे आषाढमेघ अवघे नभ आक्रमीत येतात.

सूर्याला झाकून आणि आकाशाला झाकोळून टाकणारी या आषाढमेघांची किमया मनामनांचा तावाच घेऊन टाकते. मेघांनी ओथंबून आलेल्या नभातून अखंड पाऊसधारा झिरमिरत असतात. घरे-दारे, झाडे-झुडपे, डोंगर-दऱ्या, राने-कुरणे-साऱ्यांना चिंब भिजवून दश अंगुळे उरणारा आषाढातला पाऊस मनांनाही चिंब करतो.

नामदेवांचं संवेदनशील मनही या आषाढधारांमध्ये असंच चिंबलं आणि मग त्यांच्या अंत:करणातलं भावलावण्य एका मनोज्ञ कवितेचं रूप घेऊन प्रकटलं !

आषाढातल्या पावसामुळे मनाला आलेली अस्वस्थता, बेचैनी आणि हुरहूर नामदेवांनाही टाळता आली नाही. मग हा झिरमिरता पाऊस म्हणजे त्यांना अव्याहत चालणारा मोहमायेचा व्यापार वाटतो. मोहाने वेढलेल्या, मायेने ग्रासलेल्या या सांसारिक, ऐहिक उपाधींपासून मुक्ती मिळावी अशी ओढ त्यांना लागते आणि मग 'या व्याधी-उपाधींपासून तू माझे रक्षण कर' अशी विनवणी ते परमेश्वराला करतात.

नखशिखान्त भिजवून टाकणाऱ्या आषाढधारांमध्येही नामदेवांसारख्या संतांनी परमार्थाचे गहन तत्त्व शोधलेले दिसते. त्यांची 'पाटोळा तिमला' ही रचना या दृष्टीने लक्षणीय आहे. त्यांच्या अनन्य भावभक्तीचा परमसुंदर आविष्कार असलेली ही कविताही व्यंग्यार्थानं परिपूर्ण अशीच आहे. आपल्या अंत:करणातील भक्तिप्रेमाचा पूर शब्दात बांधताना ते म्हणतात -

'पाटोळा तिमला रे, मजवरि घालि कांवळें ॥धृ.॥
आषाढमासिंचा रे कैसा शीतल वारा । वर्षतो मेहुला रे कैशा शीतल धारा ॥
झिरमिर झिरमिर रे कैसा वर्षतो मेघु । जाळींचे घोंगडें वा मजवरि घाली सेवू ॥
प्रेमाचें भरतें गा कैंसा महापूर आला । नामया विष्णुदास केशवराजीं मिनला ॥-'

भक्तिभावनेने ओथंबलेल्या नामदेवांच्या या रचनेतही त्यांच्या परमार्थप्रवण अंत:करणाचे स्वच्छ प्रतिबिंब आपल्याला दिसते.

'मल्हार महुडें' या रचनेप्रमाणेच ही रचनाही अतिशय लाघवी, मृदुमधुर अशी आहे. नामदेवांनी योजलेल्या शब्दांचे पोतच इतके मुलायम आहे की कविता वाचतानाच त्यांच्या रेशमी स्पर्शाने आपल्या मनाला विलक्षण आनंद वाटतो.

'पाटोळा तिमला रे, मजवरि घालिं कांवळें ।-'

हा पहिलाच चरण मृदुवर्ण आणि अनुनासिके यांच्या बाहुल्यामुळे अतिशय श्रुतिमनोहर वाटतो. आणि ज्यावेळी या चरणामधील गूढार्थ लक्षात येतो, त्यावेळी तो मनाला अधिकच भिडतो.

'पाटोळा' म्हणजे शेला किंवा वस्त्र. 'तिमला' म्हणजे 'चिंवला-चिंब भिजला.' 'माझा शेला भिजून चिंब झाला आहे. तेव्हा तू तुझे कांवळें-घोंगडें-माझ्यावर पांघर-' हा या चरणाचा सरळ वाच्यार्थ झाला. या वाच्यार्थाला अजिबात बाध न आणता नामदेवांनी त्यातून सहजपणे व्यंग्यार्थ प्रकट केला आहे. येथे 'पाटोळा' हे मनाचे प्रतीक वाटते त्याला चिंब भिजवण्याची-लिप्त करण्याची-क्रिया करतात विविध मायामोह ! या भिजण्यापासून संरक्षण करण्यासाठी हवे एखादे घोंगडे म्हणजे कांबळे ! अर्थातच मोहमायेपासून रक्षण करण्यासाठी हवे परमार्थाचे ज्ञान! त्यामुळे या पहिल्याच चरणाचा गूढार्थ असा होतो-'संसारातील मोहमायेमुळे माझे अंत:करण पूर्णपणे लिप्त झाले आहे. त्यावर तुझे परमार्थरूपी घोंगडे तू पांघर !'

सांसारिक व्याधी-उपाधींसाठी आषाढातील पावसाची प्रतिमा वापरून नामदेव म्हणतात,

'आषाढमासिंचा रे कैसा शीतल वारा । वर्षतो मेहुला रे कैशा शीतल धारा ॥'

'आषाढ मासातील थंडगार वारा अंगावर कसा शहारे आणणारा आहे ! मेघातून शीतल पाऊसधारा कशा सतत झिरमिरत आहेत!' अशा उद्‌गारवाचक रचनेमुळे येथील आशय अधिकच समृद्ध बनला आहे.

'झिरमिर झिरमिर रे कैसा वर्षतो मेघु । जाळीचे 'घोंगडें' बा मजवरि घालिं सेवू ॥-'

सतत झिरमिर पडणाऱ्या पावसामुळे गारठा जाणवत असणे साहजिक आहे. म्हणून-'तू तुझ्या जाळीच्या ऊबदार घोंगड्याचा सेवू-शेव-पदराचे टोक-माझ्यावर पांघर.'

या सर्वच रचनेत नामदेवांचे शब्दलाघव पुन्हा नव्याने प्रत्ययाला येते. आपल्या खास लाघवी शैलीत ते मेघाला 'मेहुला', 'मेघु' अशी लाडिक नावे देतात, 'शीतल वारा... शीतल धारा' अशा सहजसुंदर यमकातून आषाढातल्या पावसाचे प्रत्ययकारी चित्रण करतात आणि त्याचवेळी आषाढाच्या 'अंगांगाला बोचणाऱ्या शीत स्पर्शाची संवेदना जागृत करतात. 'जाळीचें घोगडें बा मजवरि घालिं सेवू ।' यातून चित्रमयतेबरोबरच घोंगड्याच्या ऊबदार स्पर्शाची जाणीवही सहज करून देतात.

'आषाढाच्या चिंब पावसात माझा पाटोळा भिजून चिंब झाला आहे. या पावसापासून रक्षण करण्यासाठी तू तुझे घोंगडे मला पांघरूण घाल-' अशी विनवणी नामदेव केशीराजाला करतात. ही केवळ विनवणी नाही; तर '-बोचणाऱ्या वाऱ्यापावसासारख्या संसारदु:खाचे निवारण करून मला तुझ्या परमार्थरूपी घोंगड्याच्या उबेत घे' असा लडिवाळ हट्टच ते

केशवराजापाशी करीत आहेत. संपूर्ण रचनेतील 'रे' या एकेरी आर्त संबोधनातून त्यांचे ईश्वरावरील प्रेम, त्यांची ईश्वराशी जवळीक आणि त्यांच्या मनातील अगतिकता फार उत्कटतेने व्यक्त झालेली आहे. तिकडे आषाढातला पाऊस अव्याहतपणे कोसळत आहे आणि येथे नामदेवांच्या अंत:करणात भक्तिप्रेमाला पूर आला आहे -

'-प्रेमाचें भरतें गा कैसा महापूर आला। नामया विष्णुदास केशवराजीं मिनला ॥-'

हृदयातल्या भक्तीला महापूर आला आहे. नामदेवांना विठ्ठलाच्या प्रेमाचे भरते आले आहे आणि त्यातच नामदेव केशवराजाशी एकरूप होऊन गेले आहेत !

या रचनेमध्ये नामदेवांनी उल्लेख केलेल्या 'घोंगड्या-'ला संतकाव्यात एक वैशिष्ट्यपूर्ण असे स्थान आहे. 'घोंगडी' हा एक स्वतंत्र काव्यप्रकार म्हणूनच संतकाव्यात ओळखला जातो. आणि अशा प्रकारच्या काव्यात 'कांवळे' किंवा 'घोंगडे' ही प्रतिमा 'अध्यात्मज्ञान-' किंवा '-अद्वैतानुभूती' यासाठी योजली जाते.

संत ज्ञानेश्वरांनी तर अनेक ठिकाणी कान्होबाच्या या घोंगड्याची अप्रतिम वर्णने केलेली आढळतात.

एके ठिकाणी ते म्हणतात,

काळे ना सावळें। धवळे ना पिवळें। घोंगडे निराळें। लाधलों मी ॥
मागील रगटें। झाडिलें आता। पंढरीनाथा। चरणाजवळीं ॥

येथे ज्ञानेश्वरांनी योजलेली घोंगड्याची प्रतिमा किती गूढ आहे ! त्यांना लाभलेले हे घोंगडे काळेही नाही; सावळेही नाही; पांढरेही नाही किंवा पिवळेही नाही. ते काही वेगळ्याच प्रकारचे, निराळे, अलौकिक असे घोंगडे आहे. आणि असे हे अध्यात्मज्ञानाचे घोंगडे लाभल्यामुळे 'आजवरचे अज्ञानरूपी रगटे-जीर्ण वस्त्र-मी पंढरीनाथाच्या पायाशी झटकून टाकले आहे-' असे मोठे मार्मिक वर्णन ज्ञानदेवांनी येथे केले आहे.

ज्ञानदेवांच्याच दुसऱ्या एका रचनेत हा गूढार्थ अधिक स्पष्ट होतो. त्यात ते म्हणतात,

अद्वैत पेठेहुनी घोंगडें आणिलें। अमोलिक घेतलें पंढरीये ॥
रखुमादेवीवरु विठ्ठलीं नीट। पांघुरविलें वैकुंठ मज देखा ॥

हे 'घोंगडे' अद्वैतपेठेहून आणले आणि पंढरीमध्ये 'अमोलिक' असे खरेदी केले. या घोंगड्याच्या निमित्ताने विठ्ठलाने जणुकाही मला वैकुंठच पांघरविले आहे' अशा शब्दात ज्ञानदेवांनी/या 'घोंगड्या'चा अर्थ उलगडला आहे. हे घोंगडे अमोलिक आहे. त्याला वैकुंठनगरीची श्रीमंती आहे ही गोष्ट ज्ञानदेवांना केवढी भाग्याची वाटते !

नामदेवांच्या वरील रचनेमध्ये त्यांनी परमेश्वराला 'मला घोंगडे पांघर' असे विनविले आहे आणि शेवटी 'नामया केशवराजीं मिनला' असा निर्वाळा दिला आहे. हे घोंगडे पांघरल्यानंतर भक्त हा देवाशी एकरूप झाला आहे. देव-भक्त हा भेद संपून गेला आहे अशी एकात्मभावना येथे नामदेवांनी व्यक्त केली आहे. हा तादात्म्यभावही ज्ञानदेवांच्या एका 'घोंगडी' मध्ये प्रकट झाला आहे. त्यात ते म्हणतात -

तूं माझा स्वामी, मी तुझा रंक। न पाहतां दिसे वेगळीक ॥
मी तू पण जाऊ दे दूरी। एकचि घोंगडें पांघरु हरी ॥

रखुमादेविवरु विठ्ठलराया । लागेन मी पायां वेळोवेळां ॥

नामदेवांच्या रचनेतील-'जाळीचे घोंगडें बा मजवरी घालि सेवू' हा उत्कट जिव्हाळा आणि ज्ञानदेवांच्या वरील रचनेतील 'मी तू पण जाऊ दे दूरी । एकचि घोंगडें पांघरु हरी ॥' हा अभेदभाव एकच आहे. या 'घोंगडी' च्या -परमार्थाच्या - मिषाने ईश्वराशी सायुज्यता पावणे हीच पारमार्थिक ओढ नामदेव आणि ज्ञानदेव या दोघांच्याही काव्यातील व्यंजनेतून प्रतीत होते.

हे परमार्थरूपी घोंगडे पांघरून भवभयापसून मुक्ती मिळविण्याचा ध्यास या संतमंडळींना लागलेला दिसतो. चांगदेवांनीही या घोंगडीचा याच अर्थाने उल्लेख केला आहे -

अवघी घोंगडी नेली हाटा । दावी चोहटा पंढरीरावो ॥
छपितां घोंगडें देखिलें बरें । टाकिलें उदारें पांडुरंगें ॥
घोंगडिया तेणें घातली मिठी । संसारी तुटी म्हणे चांगा ॥

'-बाजारातून आणलेले उत्तम प्रतीचे असे हे घोंगडे पंढरीरायाने माझ्या अंगावर उदारपणे टाकले, आणि त्या घोंगडीला त्याने मिठी घालताच संसारतापातून मुक्ती मिळाली-' असे चांगदेवांनी येथे स्वच्छ म्हटले आहे.

अशा तऱ्हेने 'घोंगडी' चा प्रतीकात्मक अर्थ या सर्व रचनांना अध्यात्मिकदृष्ट्या फार समृद्ध करून गेला आहे. नामदेवांची रचना वाचताना त्यांच्या मनातील आशयाशी साधर्म्य दाखवणाऱ्या ज्ञानदेवांच्या रचना आणि चांगदेवांचा अभंग येथे उद्‌धृत करणे फार अगत्याचे वाटल्याने त्यांचा गोषवाराच फक्त इथे दिला आहे.

'पाटोळा तिमला' या रचनेत आषाढातील पावसाचे निमित्त साधून नामदेवांनी एकतत्त्वाचे फार लोभस असे प्रकटीकरण केले आहे. एखाद्याला पांघरूण घालणारी व्यक्ती ही त्याच्या फार जीवाभावाची असते. त्याच्या रक्षणाची जबाबदारी तिच्यावर असते. अशा व्यक्तीविषयी अर्थातच मनात अव्याज प्रेमभावना असणे साहजिक आहे. त्यामुळेच नामदेवांच्या अंत:करणातील भक्तिप्रेमाला येथे महापूर आला आहे. केशवराजांच्या अथांग प्रेमात ते बुडून गेले आहेत. त्याच्याशी एकरूप झाले आहेत.

भक्ताचे अस्तित्व परमेश्वरभक्तीत विरघळून जाणे हा भक्तीचा परमोत्कर्ष आहे. या परमसुंदर अनुभूतीचा तितकाच उत्कट आविष्कार नामदेवांच्या या रचनेत झाला आहे. इथे 'सोऽहं' भावात 'अहं' भाव विलीन झाला आहे. नामदेवांचे अत्यंत पारदर्शी, निर्मल आणि प्रांजल व्यक्तिमत्त्व येथे शब्दाशब्दात प्रतिबिंबित झाले आहे. कोणताही अभिनिवेश न आणता स्वत:ला लागलेली परमेश्वरभेटीची आस अत्यंत मनस्वीपणे त्यांनी या हृद्य अशा भावकवितेत व्यक्त केली आहे.

शब्द-स्पर्श-रूप अशा लौकिक संवेदना सहजपणे जागृत करीत अलौकिक अशा अध्यात्मसृष्टीपर्यंत रसिकाला घेऊन जाणारी नामदेवांची भावकविता म्हणजे संतवाङ्मयातील अमोलिक असा ठेवा आहे. अशा प्रकारची त्यांची एकेक रचना म्हणजे जणू त्यांचा एकेक आत्मलेख आहे. पूर्ण प्रवृत्ती आणि पूर्ण निवृत्ती या दोन टोकांमधील सुवर्णमध्य नामदेवांनी साधला. सगुणोपासना आणि अव्यक्तोपासना यांचा त्यांनी केलेला समन्वय भक्त भागवंतांना मोठाच मार्गदर्शक ठरला आहे. संसारात राहूनसुद्धा 'परब्रह्म होऊनि ठेलों' असा आत्मानंदाचा

प्रत्यय त्यांनी स्वत: घेतला आणि इतरांना देऊ केला ! पंथप्रचारासाठी आवश्यक असलेली बहिर्मुख वृत्ती जशी त्यांच्या ठायी होती तशीच उत्कृष्ट भावकवितेसाठी आवश्यक असणारी आत्मकेंद्रित वृत्तीही होती. त्यामुळेच अंतरंगांतील उत्कट विठ्ठलभक्तीला आत्मज्ञानाची जोड देऊन त्यांनी भागवतधर्म सुप्रतिष्ठित केला. संत ज्ञानेश्वरांनीही नामदेवांचे कार्य जाणले होते. म्हणूनच त्यांनी म्हटले आहे -

'भक्त भागवत वहुसाल ऐकिले । वहु होऊनि गेले, होती पुढे ।
परि नामयाचें वोलणे हे नव्हें कवित्व । हा रस अद्‌भुत अनुपमु ॥'

नामदेवांच्या कवित्वाचा गौरव यापेक्षा आणखी कोणता असू शकतो?

□□

शीला निपुणगे, कस्तुरी सोसायटी, ३७१ व शनिवार पेठ, पुणे - ४११ ०३०.

---

## साभार पोहोच

**सुमेरु प्रकाशन, डोंबिवली यांची प्रकाशने**

- **लिलावती सावंता अप्पा :** लिलावती दुगे, पृष्ठे १३१ मूल्य शंभर रुपये.
- **पुनीत :** श्रेणिक अन्नदाते, पृष्ठे २०७, मूल्य एकशे पस्तीस रुपये.
- **जीवनवाटा :** अमृत देशमुख, वैभव प्रकाशन, नांदेड, पृष्ठे २६७, मूल्य शंभर रुपये.
- **ऐसे कळवळ्याची जाती :** ना. धो. महानोर, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, पृष्ठे १६८, मूल्य एकशे पंचवीस रुपये.

सौ. स्नेहसुधा कुलकर्णी

# आधुनिक मैत्रेयींचा गुलमोहर

मैत्रेयी हे नावच तसं वेगळं आणि कुतुहल निर्माण करणारं. वैदिक काळातील याज्ञवल्क्य ऋषींची पत्नी मैत्रेयी ही आपल्या अध्यात्मज्ञानाने आणि वाकपटुत्वाने अजरामर झालेली. जनकराजाच्या राज्यसभेत याज्ञवल्क्य ऋषींचं पांडित्य पाहून या विदुषीने स्वखुषीने त्याला वरले होते. संसारात राहूनही ती निरासक्त होती. विद्याभ्यास हाच तिचा ध्यास होता. तिच्या नावाचं आकर्षण या चार कवयित्रींना का वाटलं ? तर या चौघीजनीही आपली गृहिणीपदाची जबाबदारी पेलतानाच कवितेवर अढळ निष्ठा ठेवून आहेत, आणि नित्यनूतन काव्यरचना करून विविध कार्यक्रमातून उत्साहाने आपले काव्य सादर करीत आहेत. मैत्रेयी ग्रुप तर्फे काव्यवाचन करण्याची कल्पनाही यातूनच त्यांना स्फुरली आहे. या कवयित्रींना अध्यात्माचा नसला तरी कवितेचा ध्यास निश्चित आहे.

या कार्यक्रमाची सुरुवात होते ज्योत्स्ना चांदगुडे हिच्या निवेदनाने. रखरखीत वाळवंटात उन्हात उभे राहून धगधगीतपणा सोसूनही फुलावरून येण्याची ताकद गुलमोहरात असते, कवी देखील असाच वेदना सोसून कवितेमध्ये फुलारून येतो. म्हणूनच कार्यक्रमाचे नाव ठेवले आहे 'गुलमोहर'. असा आशय ज्योत्स्ना चांदगुडे आपल्या निवेदनातून व्यक्त करतात. त्यानंतर 'मैत्रेयी' विषयी, सांगताना वेदकाळापासून आजच्या महाश्वेतादेवी, अमृता प्रीतमपर्यंतच्या विदुषी, आणि मधल्या काळात म्हणजे मोगल राजवटीत स्त्रीची झालेली कुचंबणा, आणि अवहेलना या सर्वांचा धावता आढावा घेतला जातो. आजच्या अमृता प्रीतम किंवा दुर्गाबाई भागवत या विदुषी मैत्रेयीचा आदर्श असला तरी आपण अद्याप पहिल्या दुसऱ्या पायरीवरच उभ्या आहोत अशी नम्र जाणीव निवेदनातून व्यक्त केली जाते. त्यानंतर या चौघी एकमेकींचा परिचय करून देतात.

त्यानंतर काव्यवाचनाची पहिली फेरी सुरू होणार असते. काव्यवाचनाच्या या प्रथम फेरीची पार्श्वभूमी विशद करताना स्नेहसुधा कुलकर्णी म्हणते की, आजपर्यंत स्त्रीने तडजोडीची भूमिका स्वीकारून पुरुषाच्या दोन

*साहित्यिक आणि सांस्कृतिक कार्यक्रमाची पुण्यात वानवा नाही. कविसंमेलनाचा तर नेहमीच सुकाळ असतो. काव्यवाचन, काव्यगायन अथवा या दोहोंचा मिलाफ असलेले अनेक कार्यक्रम हौशी कवी व गायक नेहमी सादर करतात. तरीही स्नेहसुधा कुलकर्णी, स्वाती सामक, ज्योत्स्ना चांदगुडे व प्रभा सोनवणे या पुण्यातील चार कवयित्रींनी सादर केलेला 'गुलमोहर' हा काव्यवाचनाचा कार्यक्रम त्यातील वैशिष्ट्यपूर्णतेमुळे नावीन्यपूर्ण ठरला व काव्यरसिकांची दाद मिळवून गेला.*



अनुक्रमणिका







पावले मागे राहणेच पसंत केले होते पण आता स्त्रीला स्वसामर्थ्याची जाणीव झाली आहे. म्हणूनच ज्योत्स्ना चांदगुडे आपल्या कवितेत म्हणतात,

'युगायुगाच्या काळ्याकुट्ट रात्रीचा
विनाश होतोय
तो म्हणाला, पूर्वेकडे बघ
दळदार सूर्य उगवतोय'

मात्र तरीही आजची स्त्री स्वतंत्र आहे, सुखी आहे असं म्हणता येणार नाही, मात्र तिला स्वत्वाची, स्वत:च्या स्थितीची प्रखर जाणीव आहे. आणि तिला प्रगतीच्या दिशेने



## *सामाजिक जाणीव*

*कोणत्याही साहित्यात काव्याचे योगदान महत्वाचे ठरलेले आहे. आपले भावानुभव कमीत कमी शव्दात मांडण्याची कवितेची ताकद लक्षणीय आहे म्हणूनच कवितेला दीर्घकालीन परंपरा असूनही कवितेचे विषय आणि तिची रचना सतत बदलत गेलेली आढळते आणि कविता ही त्या काळाची त्या त्या समाजाची गरज ठरते.*

*कवीचं संवेदनशील, टीपकागदी मन सर्व घटनांची नोंद सर्व तपशीलांसह ठेवू शकतं, कधीतरी आतल्याआत त्या घटनांची सुसंगती लावली जाते, आपल्या परीने अर्थ लावले जातात आणि मनाच्या सप्तपाताळातून स्वत:चा आकृतीवंध स्वत:च घेऊन कविता सरसरत वर येते.*

*सामाजिक जाणिवेची कविता जेव्हा कवी लिहून जातो तेव्हाही त्याच्या मनाच्या खिडक्या सताड उघड्या असतात आणि समाजवदलाची नोंद घेऊनच सामाजिक जाणिवेची कविता तयार होत असते. फ्रेंच राज्यक्रांतीवद्दल लिहिताना इतिहासकार म्हणतात, 'ही क्रांती घडविण्यात शस्त्रांत्रांपेक्षा लेखणी अधिक कारणीभूत ठरली आहे. त्यातही कवीचा सिंहाचा वाटा आहे यात शंका नाही. समाजातल्या जवळजवळ सगळ्याच समस्या कवितांद्वारे मांडून समाज-सुधारणेचे फार मोठे कार्य कवी करतात. अर्थात खरी सामाजिक कविता आणि प्रचारकी ढंगानं लिहिलेली कविता ह्यातला फरक मात्र रसिकांनी लक्षात घ्यायला हवा. काही वेळा प्रचारकी कविता लोकांची दाद मिळवून जाते कारण त्याला थोडीफार स्टेज व्हॅल्यू असते पण अशी कविता फार लवकर काळाच्या पडद्याआड जाते.*

*मात्र प्रज्ञावान कवींच्या लेखणीतून उमटत असतं वदलत्या समाजजीवनाचं समर्थ चित्र. साठोत्तरी कविता तर ह्या वावतीत वरीच मुक्त होत गेलेली जाणवते. प्रखर वास्तवाची भेदक जाणीव कवितेतून उमटते अशी कविता केवळ संख्येने नव्हे तर आशयाने समृद्ध व सकस झाली आहे नव्हे तिला रसरशीत वहर आला आहे. वाढते शहरीकरण, लोकसंख्या वाढ, दुष्काळ, पर्यावरण, एकाकीपणा, तुटलेले भावसंवंध आणि कौटुंविक जिव्हाळ्याचा अभाव यातून ही कविता फुललेली आढळते.*

जोत्स्ना चांदगुडे

पावले टाकण्याचं बळ या जाणिवेतून मिळते आहे. वास्तवाशी तडजोड करताना म्हणून तिला क्लेशही अधिक होतात हेही तितकेच खरे आहे. आजची स्त्री सुशिक्षित, सुजाण आणि संवेदनशील आहे म्हणूनच प्रभा सोनवणेच्या कवितेत ती म्हणते,

'झटकते पलंगपोस
भिजवते पोळ्यांची कणीक
समजावते मनाला, हेच शाश्वत
बाकी सारं क्षणिक
आयुष्य एक भूक आहे
दोन खोल्यात सामावलेली !'

स्त्रीजीवनाचं वास्तव चित्र रेखाटणाऱ्या या स्त्री जाणिवा व्यक्त करणाऱ्या कवितांची प्रथम फेरी स्वाती सामक हिच्या कवितेने सुरू होते व मध्ये कुठलेही निवेदन न होता स्वाती सामक, प्रभा सोनवणे, स्नेहसुधा कुलकर्णी व ज्योत्स्ना चांदगुडे आपल्या कविता अस्खलित व दमदार आवाजात, आशय संपन्न शब्दांचे भावानुरूप उच्चारण करून सादर करतात. शब्दकोश ही स्त्री जाणीव विषयक कविता सादर करताना जेव्हा स्नेहसुधा म्हणते,

'मी माझ्या शब्दकोशातून
काही शब्द आता काढून टाकलेत
उदाहरणार्थ विवशता, दौर्बल्य, लाचारी इत्यादी.'

त्यावेळी साहजिकच श्रोते विशेष सजग होतात, स्त्रीची अगतिकता, दुर्बलता ऐकण्यापेक्षा तिच्या कणखरपणाचे हे दर्शन श्रोत्यांना विशेष आवडते.

या काव्यफेरीतील कवितांचा क्रमच असा आहे की, स्त्रीची वास्तव स्थिती स्वाती सामक आणि प्रभा सोनवणे यांच्या कवितांतून व्यक्त होते तर त्यानंतर स्नेहसुधा कुलकर्णी आणि ज्योत्स्ना चांदगुडे आपल्या कवितांमधून स्त्री सामर्थ्याविषयीचा विश्वास प्रगट करतात, म्हणूनच ज्योत्स्ना चांदगुडे म्हणते,

'तू पंख कापलेस तरी
कसे आवरू मी
माझ्या पुन्हा फुटू पाहणाऱ्या पंखांना !'

स्त्रीचे पंख आता कापता येणार नाहीत कारण स्त्री आता स्वसंरक्षणाविषयी जागरूक आहे आणि पंख कापले तरी ते पुन्हा पुन्हा फुटतील या वस्तुस्थितीची जाणीवही तिला आहे, ही कल्पनाच किती सुंदर आहे.

कवितांची दुसरी फेरी आहे 'सखी' विषयीच्या कवितांची. या काव्यफेरीपूर्वी जे निवेदन आहे त्यात प्रभा सोनवणे या आजच्या सुशिक्षित, पुरुषाच्या खांद्याला खांदा भिडवून जीवन संघर्षाला सामोरी जाणाऱ्या स्त्रीलाही सखीची किती नितांत आवश्यकता आहे ते विशद करतात. या 'सखी' विषयी प्रभा सोनवणे आपल्या कवितेत म्हणते,

'तेव्हा ठाऊक तरी होतं का
भविष्यात पायाखाली काचाच काचा
आणि डोळाभर पाणीच पाणी
आठवणी आता पुसट होत चालल्यात तरी
कमळखुणा खुपतात ग काळजापाशी !'

तर आपल्या बालपणीच्या खेडेगावातील सखीविषयी स्नेहसुधा म्हणते,

'जात्यासवे हिचे गाणे
गोल गोल फिरायचे
मनी साठलेले दुःख
पीठ पीठ व्हावयाचे !'

आपल्या जिवलग सखी विषयीच्या या चौघींच्याही कविता स्त्री मनाचा हळूवारपणा आणि स्वानुभवाचा स्पर्श यामुळे अतिशय प्रत्ययकारी झाल्या आहेत.

कवितांची तिसरी-प्रेमकवितांची फेरी -

स्वाती सामक हिच्या निवेदनाने सुरू होते. जगातील फक्त प्रेमकविता तराजूच्या एका पारड्यात आणि इतर सर्व कविता दुसऱ्या पारड्यात टाकल्या तर प्रेमकवितांचेच पारडे जड होईल असा विश्वास व्यक्त करून ज्येष्ठ कवी मंगेश पाडगावकरांपासून ते अलीकडच्या मनोहर सोनवणे यांच्या प्रेमकवितांचे दाखले देऊन त्या प्रेमकवितांच्या या काव्यगंगेत मैत्रेयींच्या प्रेमकवितांची छोटीशी धार येऊन मिसळत असल्याचे सांगते. या फेरीतील चारही कविता या निव्वळ अल्लड प्रेमाच्या कविता नसून प्रेमभावनेची सखोलता वृत्तीगांभीर्याने विशद करणाऱ्या आहेत; स्वाती सामक हिची प्रेमकविताही सुजाण वाचकांस किती घायाळ करणारी आहे! ती म्हणते,

'चिंब निथळत्या चांदणरात्री साद घातली कुणी
अंतरातली जखमी कोकीळ धून छेडिते जुनी
फुफाटलेल्या आवेगाचा पाणलोट ये पुन्हा
उलट सुलट होऊन पुसटल्या अवघ्या
खाणाखुणा'

अशाप्रकारे प्रेमकवितामध्येही वेगवेगळ्या छटा व्यक्त होतात.

मग सादर केल्या जाता सामाजिक जाणिवांच्या कविता. याचे निवेदन करते ज्योत्स्ना चांदगुडे. सामाजिक जाणीव किती समर्थपणे प्रगट होऊ शकते आणि त्याचे समाजावर किती परिणाम होऊ शकतात हे थोडक्यात आपल्या निवेदनातून स्पष्ट करून ज्योत्स्नाने या काव्यफेरीचे निवेदन थांबवताच स्वाती आपली 'पर्यावरण' ही कविता सादर करते. शहरात काँक्रिटच्या जंगलामुळे आता

---

*प्रभा सोनवणे, ज्योत्स्ना चांदगुडे, स्वाती सामक आणि स्नेहसुधा कुलकर्णी*







डेरेदार वृक्ष नाहीत आणि दरवर्षी पावसाळ्याच्या सुरुवातीला त्यावर डेरेदाखल होणारे पक्षीही नाहीत याची खंत ती काव्यातून व्यक्त करते तर स्नेहसुधा आपल्या फ्लॅट संस्कृती' या कवितेतून एकविसाव्या शतकाच्या उंबरठ्यावरील कुटुंबचित्र रेखाटताना म्हणते,

'आई जेव्हा सोमवारी गेली
तेव्हा मुले खरी व्यथित झाली
काल जर असती गेली
तर केवढी सोय असती झाली
दोघांची रजा गेली नसती
मुलांची शाळा बुडली नसती'

स्नेहसुधाच्या कवितेतून व्यक्त होणारे हे दाहक वास्तव श्रोत्यांना क्षणभर सुन्न करते. एकविसाव्या शतकाच्या उंबरठ्यावर उभ्या असलेल्या समाजाच्या प्रगतीचा आलेख या कवितेत पाहताना श्रोते थक्क होतात तसे अंतर्मुखही होतात.

सामाजिक जाणीवेनंतरची काव्यफेरी असते जीवनानुभव व्यक्त करणाऱ्या कवितांची! जीवनानुभव तर प्रत्येक व्यक्तींचा, प्रत्येक क्षणाचा वेगळा, त्याच्या छटा या चार कवितांमधून कशा व्यक्त होणार? स्वाती सामक आपल्या निवेदनात म्हणते-

मानवी जीवन हे व्यामिश्र घटनांचे एक प्रचंड जाळे आहे. कमळाच्या जाळ्यात अडकावे आणि अडकतच जावे त्याप्रमाणे कवीचे मनही जीवनाच्या या व्यामिश्र अनुभवांमध्ये गुंतत जाते, मात्र त्याला हे फायदेशीर ठरते, कारण त्यामुळेच अनुभवाच्या जलाशयातील माणिक-मोती काव्यरूपात त्याच्या हाती येतात, जीवनानुभव व्यक्त करण्यासाठी गद्य लेखकालाही इतरांच्या काव्याचाच दाखला द्यावा लागतो, कारण गद्यापेक्षा काव्य अधिक जीवनस्पर्शी व तरल असते.

जीवनानुभवाच्या या कवितांमधील पहिली कविता आहे, प्रभा सोनवणे हिची. काचेच्या घरात राहणारी माणसेही दुसऱ्यांच्या घरावर दगडफेक कशी करतात? असा प्रश्न ती आपल्या कवितेत विचारते तर स्नेहसुधाला समंजस म्हणवणारे आपलेच लोक आपल्याला समजून घेताना मात्र थिटे का पडतांत याचे कोडे उलगडत नाही, असे दिसते.

'रक्ताच्या नात्याने बांधलेली मने
अश्रुच्या पाण्याने विरघळत नाहीत
उडू पाहणाऱ्याचे पंख कापून
तडफड पाहताना हळहळत नाहीत'

याची तिला खंत वाटते. तर स्वाती सामक हिचा जीवनानुभवही असाच दुःखद आहे. 'घाव' या कवितेत ती म्हणते,

'नंतर मात्र घावामागून
घाव बसत गेले
आयुष्यावर घावांचेच
गाव वसत गेले'

जीवनानुभव व्यक्त करणाऱ्या या चारही कवयित्रींच्या कविता अतिशय भावस्पर्शी

*टीप : अशा प्रकारचे वैशिष्ट्यपूर्ण साहित्यिक कार्यक्रम सादर करणाऱ्यांनी त्यासंबंधीची टिपणी म. सा. पत्रिकेकडे अवश्य पाठवावी. योग्य मजकुराला प्रसिद्धी दिली जाईल.*

*संपादक*












असून दीर्घकाळ मनात रेंगाळत राहतील अशा आहेत.

त्यानंतरच्या अखेरच्या काव्यविषयक कवितांच्या सादरीकरणापूवीचे निवेदन आहे स्नेहसुधाचे. काव्यविषयक कवितांमधील सामक हिची कविता विशेष दाद मिळवून जाते. ती आपल्या कवितेत रसिकांना सांगते-

'तुटतील जेव्हा निमिषात आपुल्या
जन्मांतरीच्या गाठी
मी गेल्यावर माझी कविता
उरेल तुमच्यासाठी !'

याच धर्तीवर मग चौघीही आपल्या कवितांचे स्मरण ठेवण्याचे अभिवचन रसिकांकडून घेताना म्हणतात,

'स्मराल ना हो अमुची कविता
जी उरेल तुमच्यासाठी !'
आणि

आणि कवितांच्या-काव्यवाचनाच्या या सुरेख कार्यक्रमाची सांगता होते.

एकाच विषयावरच्या चार कविता आणि अशा कवितांच्या चार फेऱ्या, हे या कार्यक्रमाचे खास वैशिष्ट्य ! प्रत्येक काव्यफेरीपूर्वीचे निवेदन कवितांइतकेच महत्वाचे; कविता जितक्या भावपूर्ण आहेत तितक्याच विचार प्रवणही आहेत. दीड तासाच्या या कार्यक्रमात श्रोते सर्वार्थाने काव्य जगतात. आजुबाजूच्या वास्तवाला विसरून कवितेतील वास्तवाला ते सामोरे जातात. म्हणूनच या मैत्रेयीचं आणि त्या सादर करीत असलेल्या गुलमोहराच कौतुक !

□□

सौ. स्नेहसुधा कुलकर्णी
सुपार्श्वनाथ सोसायटी, मार्केटयार्ड,
पुणे- ४११ ०३७.
दूरध्वनी : ५१०४२३, ४९१२९२

स्वाती सामक

# काव्यानंद

### आस्मानी आपत्तीचे विदारक चित्रण : भंगलेले अभंग

एकाच विषयाला वाहिलेल्या कवितांचा संग्रह ही गोष्ट निदान मराठी साहित्यात तरी दुर्मिळ असावी. श्री. विलास पाटील ह्यांचा हा असाच एक काव्यसंग्रह-भंगलेले अभंग.

अनंत चतुर्दशी १९९३ ला मराठवाड्यात भूकंपाच्या रूपाने जी आस्मानी आपत्ती कोसळली, त्यात गावेच्या गावे उद्ध्वस्त झाली. अनेक जण मृत्युमुखी पडले; जे वाचले ते मरणप्राय दु:ख उराशी बाळगून आजही जगताहेत. हे भोगलेले दु:ख श्री. विलास पाटील ह्यांनी 'भंगलेले अभंग' ह्या काव्यसंग्रहात चित्रीत केले आहे. ९६ पानांच्या ह्या पुस्तकात भूकंपाचे जे विदारक चित्रण केले आहे, ते वाचताना अंगावर सरसरून काटा तर येतोच, पण सर्वसामान्य माणूस ह्या दु:खापासून किती दूर आहे हे लक्षात येऊन ज्याचे जळते त्याला कळते ही मराठी म्हण आपोआप आठवते.

श्री. विलास पाटील हे किल्लारीचे रहिवासी. या काळात मृत्यूचे तांडव त्यांनी प्रत्यक्ष/अप्रत्यक्ष अनुभवले आहे. वर्षभर डोके फुटून जाईल इतकी प्रचंड अस्वस्थता भोगल्यावर त्यांच्या लेखणीतून हे अभंग एकामागून एक कागदावर उतरत गेले आहेत. बोलीभाषेत लिहिलेले हे अभंग तसे काळजाचा ठाव घेणारेच आहेत. एका अभंगात ते म्हणतात,

ढवळेच पीठ । व्हतं जात्यातलं
लाल कसं झालं । एकाएकी ॥

तर दुसऱ्या एका अभंगात ते म्हणतात,

भरल्यालं घरं । सारे सारे मेले
लांब लांब गेले । कायमचं ॥

हे अभंग लिहिताना कवीने साऱ्या गावाचेच दु:ख मांडले आहे. वेगवेगळ्या तऱ्हेने हे दु:ख ते व्यक्त करतात. कधी बारा बलुतेदारांचं उद्ध्वत झालेले विश्व-मोडून पडलेला गावगाडा ह्याचे वर्णन करताना ते म्हणून जातात,

कासाराच्या घरी । काकनाचा चुरा
पायी काचकूरा । घुसूलाला ॥

तर दुसऱ्या एका अभंगात विधवा झालेल्या अनेक स्त्रियांचे दु:ख मांडताना ते म्हणतात,

कपाळाचं कुकू । पुसोनिया गेलं
रगतानं वलं । घर माझं ॥

त्यांचा मरणावराचा अभंग हा ह्या संग्रहातला आत्यंतिक विदारक असा अभंग. त्यात ते म्हणून जातात,

मरण दळीन । मरण कांडीन
मरण चाळीन । जीन्दगीत

मानवी जीवनात मरणाने घातलेल्या प्रचंड हैदोसाचे जिवंत चित्रण करणारी कविता म्हणून विलास पाटलांच्या भंगलेले अभंग ह्या काव्यसंग्रहाकडे बोट दाखविता येईल. अभंग छंदाचा अत्यंत अचूक वापर हे शैलीच्या दृष्टीने, ह्या काव्यसंग्रहाचे एक खास वैशिष्ट्य मानता येईल.

म्हणूनच ह्या काव्यसंग्रहाच्या पाठीमागे दिलेल्या अनेक अभिप्रायात म्हटल्याप्रमाणे हे अभंग वाचतांना गलवलणार नाही असा वाचक विरळाच !

'भंगलेले अभंग' : कवी विलास पाटील, पृष्ठ संख्या १०४, किंमत ४० रुपये
ज्ञानोपासक महाविद्यालय, जिंतूर, जि.परभणी.- ४३१ ५०९.
प्रकाशक : कॉन्टिनेन्टल प्रकाशन, विजयानगर, पुणे-४११०३०.

□

## अस्सल मराठी मातीचा 'वानवळा'

आजकाल कविता या साहित्य प्रकाराला जरा बरे दिवस आले आहेत असे समजायला हरकत नाही. बाजारात येणारे अनेक नवेनवे काव्यसंग्रह ह्या गोष्टीचीच ग्वाही देतात.

श्री. अशोक कुलकर्णी यांच्या वानवळा ह्या काव्यसंग्रहात एकूण १०४ कविता आहेत. सर्वच कवितांचा रचनाबंध जुन्या काळाप्रमाणे 'कडवी' ह्या स्वरूपाचा आहे. वेगळाली अशी अनेक वृत्ते ह्या कवितांमधून वापरून पाहण्याचा एक चांगला प्रयत्न श्री. कुलकर्णी ह्यांनी केलेला आहे.

मानव आणि निसर्ग ह्यांची जवळीक हळूवार शब्दात टिपण्यात श्री. कुलकर्णी बऱ्याच प्रमाणात यशस्वी झालेले आहेत. वावर ह्या कवितेतल्या दोन ओळी बघा -

'माझ्या वावरात आता, पाउल हळूहळू टाका
दबक्या पाऊलाने आज जाग येईल ग रोपा'

काव्यसंग्रहाचे मुखपृष्ठही, निसर्ग आणि मानव ह्याचे अभिजात नाते उलगडून दाखवणारे असेच आहे.

चित्रदर्शीपणा हे कुलकर्णी ह्यांच्या कवितेचे आणखी एक वैशिष्ट्य मानता येईल.

बुरूज, दुपार, नागमोडी वाट ह्या काही कवितांमधून हे वैशिष्ट्य ठळकपणे लक्षात येईल. कविता वाचताना सतपशील असे चित्र डोळ्यांसमोर उभे राहू शकते.

ह्या संग्रहात काही द्वंदगीतेही आहेत 'हिरवी वाट', 'आगळीक' ही द्वंद्वगीते पाहण्यासारखी आहेत.

प्रेमाच्या आर्त हाकेने दोघंही एकमेकांना बोलवू पाहत आहेत. पण जनरीतीमुळे आपले वागणे लोकांना रुचले नाही तर ? हा प्रश्न आहेच. पण शेवटी विजय प्रेमाचाच होतो आणि त्यातील पुरुष म्हणतो,

'करी दूर हा दुरावा, देऊन हात हाती
मिळुनीच धाव नेत्री, विसरून सर्व जगाशी'

श्री. कुलकर्णी ह्यांचा हा पहिलाच काव्यसंग्रह आहे. साहजिकच पहिलेपणाच्या काही खुणा अभ्यासू नजरेने शोधू गेल्यास जरूर सापडतील-पण त्यातच सापडतात प्रगतीच्या दिशेने पडणारी काही समर्थ पाऊले !

थोडक्यात सांगायचे म्हणजे श्री. कृ. मु. उजळंबकर ह्यांनी आपल्या प्रस्तावनेत म्हटल्या-प्रमाणे शहरीकरणामुळे अस्सल मराठी मातीला मुकलेल्या काव्यरसिकांना श्री. अ. गो. कुलकर्णी ह्यांचा हा 'वानवळा' नक्कीच आवडेल.

पुढच्या काव्यसंग्रहातल्या त्यांच्या कविता अधिक अभ्यासपूर्ण, अधिक सरस, अधिक भावपूर्ण असतील अशी अपेक्षा ठेवायला हरकत नाही.

'वानवळा' : कवी : श्री. अ. गो. कुलकर्णी; पृष्ठ संख्या : ११८ ; मूल्य रुपये ३०/-
प्रकाशक : सौ. सुप्रिया कुलकर्णी/श्री. अ. गो. कुलकर्णी
सर्वे नं : ११६/२, जाधव वस्ती कळस, आळंदी रोड, पुणे ४११ ००५.

□

## कोरड्या मातीत ओलावा शोधणारे 'कोरडे नक्षत्र'

श्री. प्रकाश होळकर हे नाव मराठी काव्यरसिकांना सुपरिचित आहे. काव्यवाचनाच्या कार्यक्रमाद्वारे ते महाराष्ट्रातल्या रसिकांपर्यंत नक्कीच पोहोचले आहे. अर्थात असे जरी असले तरी 'कोरडे नक्षत्र' हा प्रकाश होळकरांचा पहिलाच काव्यसंग्रह आहे. मुंबईच्या पॉप्युलर प्रकाशनाने प्रकाशित केलेल्या ह्या देखण्या संग्रहात एकूण ५९ कविता आहेत. कवींनी त्या ८५ ते ९७ ह्या एक तपाच्या कालावधीत लिहून काढल्या आहेत. 'कोरडे नक्षत्र' हे एका अर्थाने तपस्यापूर्तीच आहे.

प्रकाश होळकरांचे आजवरचे आयुष्य हे लासलगावसारख्या शेती हाच जीवनाचा मुख्याधार असलेल्या गावात गेले, जन्मही एका शेतकऱ्याच्या घरचाच; साहजिकच केवळ पावसाळी नक्षत्रावर अवलंबून असलेल्या शेती व्यवसायाचे अनेक चढउतार त्यांनी अनुभवले आहेत, एखादे नक्षत्र जरी कोरडे गेले, तरी शेतकऱ्यांची काय अवस्था होते हेही ते चांगले जाणून आहेत. त्याच बरोबर त्यांना लाभले आहे ते अत्यंत भावूक, तरल असे कविमन आणि त्यातूनच निर्माण झाली 'कोरडे नक्षत्र' मधली, जीवनानुभवाचे पडसाद असलेली, अस्सल मातीशी नातं सांगणारी एक सुरेख भावकविता. साहजिकच रसिक मनाला ती चांगलीच भावते.

शेती व्यवसायातले उत्तम निरीक्षणही श्री. प्रकाश होळकरांना ही कविता लिहिताना, फार चांगल्या तऱ्हेने उपयोगी पडलेले आढळून येते.

एका कवितेत ते म्हणतात,

'कालच तर सुरू झाला पाणकळा
आणि एका रात्रीत, कशी तयार झाली, वावरभर वारुळे'

अर्थात 'कोरडे नक्षत्र' मधल्या साऱ्याच कविता काही शेतीविषयक विषयाला वाहिलेल्या नाहीत. काही उत्तम भावकविताही, ह्या संग्रहात आहेत.

एका कवितेत ते म्हणतात —

'पाउस पाण्यामधी एकली नको जाऊस
डोळ्यात सांजवेळी आभाळ नको पाहूस'

असे असले तरी, एखादी मैफल चालू असावी, गायक वेगवेगळाले राग आळवीत असावा आणि पार्श्वसंगीताला तंबोरा असावाच असावा, त्याप्रमाणे 'कोरडे नक्षत्र' मधल्या सर्वच कविता आहेत - चित्र कोणतेही असू दे कॅनव्हासवर सर्वदूर गावचा निसर्ग पसरलेला असावा तशा!

एखाद्या अगदी छोट्याशा कवितेत आयुष्याचे सार सांगून टाकण्याचे कसबही होळकरांना छान साधले आहे. त्यादृष्टीने 'घर गेले दार गेले' ही अवघ्या १५ शब्दांची कविता पाहण्यासारखी आहे.

थोडक्यात 'कोरडे नक्षत्र' ह्या कवितासंग्रहातून ग्रामीण जीवनाचे एक वेगळे रूप रसिकांपुढे साकार होते. कथा-कादंबऱ्यातून अथवा सिनेमातून दिसते तसे ते साजीरे गोजीरे नाही. 'दुष्काळाचा नाग फणा' काढून समोर उभा आहे अवघे जगणेच कठीण झाले आहे, जगण्यातले हे काठिण्य आणि कवीचे अत्यंत संवेदनाक्षम टीपकागदी मन ह्यांचा फ़ार सुरेख गोफ कवीने ह्या संग्रहात विणला आहे.

श्री. होळकरांचा हा पहिलाच काव्यसंग्रह. पण अत्यंत समर्थमणे तो रसिकांपुढे आला आहे, त्यांच्या प्रतिथयश आयुष्याची चाहूल नक्कीच ह्या कवितासंग्रहात लागते.

त्याचे असे अनेक काव्यसंग्रह रसिकांपुढे येवोत ही सदिच्छा!

'कोरडे नक्षत्र' : पृष्ठ संख्या- ६२; किंमत-५० रुपये,
कवी-प्रकाश होळकर; मु. पो. लासलगाव, ता. निफाड, जि. नाशिक ४२२ ३०६.
पॉप्युलर प्रकाशन प्रा. लि., ३५ सी, पं. मालवीय मार्ग, ताडदेव, मुंबई ३४.

□

## स्त्रीमनाची आर्तता व्यक्त करणारा 'आर्त'

एकूणच आजच्या मराठी काव्यात सर्वच कवयित्री अत्यंत मोलाची अशी भर टाकीत आहेत ह्यात शंकाच नाही. ह्या सर्वच कवयित्री आपल्या कवितेमधून पुरुषप्रधान संस्कृतीमुळे स्त्रियांची जी घुसमट, जी कुचंवणा होते, त्याचे चित्रीकरण करत आहेत.

श्रीविद्या प्रकाशनाने प्रकाशित केलेल्या सौ. रोहिणी करंदीकर ह्यांचा 'आर्त' हा काव्यसंग्रहही ह्याला अपवाद नाही. पुस्तकाच्या मागील पृष्ठावरील 'पाठराखणी'त म्हटल्याप्रमाणे 'उमलणारी, फुलणारी, कोमेजणारी आणि अखेरीस धुळीस मिळाली तरीही फिनिक्स पक्षाप्रमाणे राखेतून बाहेर येणारी स्त्री या काव्याचा केंद्रविंदू आहे. पुस्तकाचे अत्यंत देखणे मुखपृष्ठही हीच कहाणी चित्रीत करते. जगाच्या इतिहासात जीवाश्म (फॉसिल्स) म्हणून का होईना पण स्त्री तग धरून शिल्लक आहे, असेच काहीसे हे मुखपृष्ठ आपणास सांगत असावे.

६४ कवितांचा हा काव्यसंग्रह वाचताना रोहिणीताईंच्या वहुमुखी व्यक्तिमत्त्वाची जाणीव होते. एखाद्या कवितेत त्यांच्यातली गायिका जागी होते, तर एखाद्या कवितेत त्या लेखणीच्या ऐवजी कुंचला हाती घेऊन उभ्या आहेत, असा भास होतो. त्यांच्या, 'वाटचाल', 'धार कोसळे', 'आता कोसळेल नभ' ह्या कविता 'शब्दचित्र'च आहेत.



अनुक्रमणिका

काही सुरेख कल्पना रोहिणीताई लिहून जातात. आईवरल्या कवितेत 'पळ रे भोपळ्या - - पासून भोपळा म्हणजे शून्य म्हणजे पूर्ण हा त्यांचा विचार प्रवास वाचण्यासारखा आहे. आईवरची एक वेगळी कविता म्हणूनच ह्या कवितेचा उल्लेख करावा लागेल.

ह्या संग्रहात रोहिणीताईंनी जवळजवळ सर्वच काव्यप्रकार हाताळले आहेत. अभंग, ओवी, लावणी, गझल, वगैरे सर्वच. ह्या प्रकारच्या कवितेतून त्यांना सुखदु:खाच्या पलीकडचे गुढ आकाश खुणावत असावे अशा काही अस्पष्ट खुणा दिसतात. किंवहुना स्वत:ला स्वत:च्या पलीकडे नेणारी ही हाकच त्यांच्या काव्यनिर्मितीचे निमित्य बनते का ?

अर्थात काव्यसंग्रहात पहिलेपणाच्या खुणा जाणवतातच. मुक्तछंदात देखील कविता मांडण्याची शिस्त असावी असा आग्रह धरणाऱ्या ह्या कवयित्रीने गझल लिहिताना मात्र बराच ढिसाळपणा केलेला जाणवतो. वृत्तांची पक्की बांधणी आणि बहुतेक सर्व नियमांचे काटेकोर पालन ही गझलसारख्या काव्यप्रकाराची 'प्रथम मागणी' असते हे विसरून चालणार नाही. अर्थात सराव आणि अभ्यास ह्या दोन्ही द्वारे कवयित्री त्या गोष्टीत सुधारणा करू शकतील अशी आशा वाटते.

एकूणच श्रीविद्या प्रकाशनाने आपल्या परंपरेला साजेसा एक देखणा काव्यसंग्रह वाचकांच्या हाती ठेवला आहे हेच खरे-!

'आर्त'-सौ. रोहिणी करंदीकर ; पृष्ठ संख्या - ७०, किंमत ६० रुपये
सौ. रोहिणी करंदीकर, स्टॉफ क्वार्टर्स, फर्गसन कॉलेज आवार, पुणे ५
प्रकाशक : श्रीविद्या प्रकाशन, २५० शनिवार पेठ, पुणे ३०

□

## टोलेबाजी : एक खुमासदार वात्रटिका संग्रह

मराठी साहित्यात, विशेषत: काव्यात एकूणच 'विनोद' ह्या रसाची निर्मिती फारच कमी होते असे म्हणायला हरकत नाही. ज्या काही विनोदी कविता लिहिल्या जातात, त्या वात्रटिका ह्या स्वरूपातच.

'टोलेवाजी' हा असाच एक छोटेखानी वात्रटिका संग्रह आहे. श्री. नंदकुमार गांधी ह्यांचा!

सर्वसाधारणपणे वात्रटिकांचे लक्ष असते सध्याचे सत्तेला लालचावलेले भ्रष्ट पुढारी ! श्री. गांधींच्या वात्रटिकाही ह्याला अपवाद नाहीत. 'सासवा-सुना' 'बये दार उघड' 'सोनियाची पाउले' ह्या सोनिया गांधी आणि राजकारण ह्या संदर्भातल्या वात्रटिका व्यासपीठावरून दाद मिळवून जाणाऱ्या आहेत.

वेगवेगळया पक्षातल्या वंडाळी, शिक्षण क्षेत्रातला भ्रष्टाचार हेही विषय त्यांच्या वात्रटिकेत येतात. एका वात्रटिकेत ते म्हणतात,

'बंडखोरीच्या किडीने, पक्ष-पक्ष पोखरून गेले
आयात केलेले निरीक्षक, निष्ठावंताना ठोकरून गेले'
तर अंडरवर्ल्ड मधले
'मुंबईतल्या अंडरवर्ल्डच्या वाटा, दुबईत जाऊन मिळतात.'

हे विदारक सत्य मनाला चांगलेच जाऊन भिडते.

तर दुसऱ्या एका वात्रटिकेत ते पक्षांतर्गत लोकशाहीचे वास्तव उलगडून दाखवितात.

अर्थात राजकारणावरच्या काय किंवा इतरही कोणत्याही विषयावरच्या काय पण 'वात्रटिका' ह्या तात्कालिक विषयावर लिहिलेल्या असल्याने, तो विषय जोपर्यंत जनमानसाच्या स्मृतीपटलावर असतो तोपर्यंतच ह्या वात्रटिका लोकांना आवडतात ह्याचे भान वात्रटिका लेखकाने नक्कीच ठेवले पाहिजे.

कोणत्याही कवीने आपल्या देवदत्त काव्यशक्तीचा उपयोग काळाच्या चाळणीवर टिकून राहणारी कविता लिहिण्यासाठीच जास्तीत जास्त करावा अशी नम्र सूचना श्री. गांधी ह्यांना करावीशी वाटते.

अर्थात अशा प्रकारचे साहित्य, अशा प्रकारच्या कविता ह्यादेखील 'काळाची गरज' म्हणूनच निर्माण झालेल्या असतात. असो.

'टोलेबाजी' : श्री. नंदकुमार गांधी ; सुशील प्रकाशन ; किंमत ३० रुपये
श्री. सुहास काळे, सुशील प्रकाशन २६/६, हिंगणे खुर्द, विठ्ठलवाडी, पुणे ४११ ०५१.

□□

सौ. स्वाती सामक, ६३७, बुधवार पेठ, पुणे - ४११ ०३०.

---

## सामार पोच

**सुमेरु प्रकाशन, डोंबिवली यांची प्रकाशने**

- ❑ **पूर्वेकडून पूर्वेकडे :** श्रीराम कवडीकर, शुभदा प्रकाशन, पुणे, पृष्ठे २७८, मूल्य एकशे पंचवीस रुपये.
- ❑ **पाणडोह :** शैला सायनाकर, शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर, पृष्ठे ९३, मूल्य पासष्ट रुपये.
- ❑ **विभावन :** वि. भा. नेमाडे, योगायोग प्रकाशन, जळगांव, पृष्ठे ९०, मूल्य पंन्नास रुपये.
- ❑ **निलंबीत :** सतीसकल सेकर, लोक वाङ्मय प्रकाशन, मुंबई, पृष्ठे ८६, मूल्य पंन्नास रुपये.
- ❑ **ओली जखम :** अशोक जाधव, सुशील प्रकाशन, पुणे, पृष्ठे ६०, मूल्य पंचेचाळीस रुपये.
- ❑ **मनोरा :** वि. वि. देवगांवकर, साहित्य कलाश्री प्रकाशन, पुणे, पृष्ठे ४८०, मूल्य दोनशे एक रुपये.

रत्नाकर कुलकर्णी

# म.सा.प. कार्यवृत्त

दरवर्षीप्रमाणे म. सा. प. चे पदाधिकारी सर्वश्री गं. ना. जोगळेकर, राजा फडणीस, कल्याणी दिवेकर, ह. ल. निपुणगे, म. श्री. दीक्षित (का. विश्वस्त) तसेच कार्यकारिणीचे सदस्य डॉ. शंतनु चिंधडे व सु. वा. जोशी यांनी दि. १० एप्रिल ९७ रोजी सकाळी कमला नेहरू उद्यानात जाऊन डॉ. केतकरांच्या समाधीला पुष्पांजली वाहिली. त्याच दिवशी संध्याकाळी परिषदेच्या पटवर्धन सभागृहात प्रा. म. आ. कुलकर्णी यांचे 'महाराष्ट्रातील इतिहास संशोधन: काल आणि आज' या विषयावर भाषण झाले.

शनिवार दि. १९ एप्रिल ९७ रोजी स. ह. मोडक (अनुवाद) पुरस्काराचे वितरण झाले. प्रा. शैला सायनाकर (इस्लामपूर) यावर्षीच्या पुरस्कार विजेत्या होत्या. अध्यक्षस्थानी प्रा. ग. प्र. प्रधान होते. समारंभाचे प्रास्ताविक गं. ना. जोगळेकरांनी केले तर सूत्रसंचालन व आभार प्रदर्शन कार्यवाह कल्याणी दिवेकर यांनी केले.

मंगळवार दि २९ एप्रिल ९७ रोजी म. सा. प. व प्रा. श्री. के. क्षीरसागर स्मृतिसमिती यांच्या संयुक्त विद्यमाने श्री. के. क्षी. यांचा १७ वा स्मृतिदिन साजरा करण्यात आला. या वेळी श्रीमती सत्वशीला सामंत यांचे डॉ. केतकर आणि श्री. के. क्षी. या विषयावर अभ्यासपूर्ण व्याख्यान झाले. अध्यक्षस्थानी ज्येष्ठ समीक्षक डॉ. व. दि. कुलकर्णी होते.

**परिषदेचा वर्धापन समारंभ**

म. सा. परिषदेच्या ९१ व्या वर्धापन दिनाचा भरगच्च कार्यक्रम आखण्यात आला होता. दि. २५ मे २७ मे या काळात वर्धापन समारंभ साजरा झाला असला तरी त्याची सुरुवात गुरुवार दि. २२.५.९७ पासूनच झाली होती.

म. सा. परिषदेच्या पुण्यातील सभासदांसाठी या वर्षी प्रथमच मराठी चित्रपट दाखविण्याचे ठरविण्यात आले. सुप्रसिद्ध कादंबरीकार व भूतपूर्व संमेलनाध्यक्ष 'श्री. व्यंकटेश माडगूळकर' यांच्या 'बनगरवाडी' या गाजलेल्या कादंबरीवरील आणि श्री. अमोल पालेकर यांच्या कलात्मक दिग्दर्शनाखाली तयार झालेला 'बनगरवाडी' हा मराठी चित्रपट दि. २२ रोजी सकाळी ९.३० वाजता परिषदेने खास सभासदांसाठी प्रदर्शित केला.

**सभासद मेळावा**

रविवार दि.२५.५.९७ या दिवशी सकाळी ९ ते १२ या वेळात परिषदेच्या पुण्यातील सभासदांचा 'सभासद मेळावा' घेण्यात आला होता. परिषदेच्या नवती महोत्सवाच्या निमित्ताने वर्षभरात डोंबिवली, ठाणे, धुळे, फलटण, इस्लामपूर अशा विविध ठिकाणी त्या त्या जिल्ह्यातील सभासदांचे मेळावे घेण्यात आले होते. अहमदनगर येथे तर सत्तराव्या संमेलनाच्या अनुरोधाने अहमदनगर शहरातील व जिल्ह्यातील सभासदांचे मेळावे संमेलनापूर्वी व संमेलनानंतरही घेण्यात



अनुक्रमणिका






आले होते.

पुण्यातील सभासद मेळाव्यास सुमारे पन्नास सभासद उपस्थित होते. जवळ जवळ प्रत्येकानेच या मेळाव्यात उत्साहाने भाग घेतला. प्रारंभी कार्याध्यक्ष डॉ. जोगळेकर यांनी उपस्थितांचे स्वागत केले व मेळाव्याचा हेतू स्पष्ट केला. या मेळाव्यासाठी अध्यक्ष म्हणून परिषदेचे उपाध्यक्ष श्री. शिवाजी सावंत उपस्थित होते. या मेळाव्याला उपस्थित असलेल्या सर्वांनी मोकळेपणाने आपले मनोगत व्यक्त करावे असे आवाहन करण्यात आले.

परिषदेच्या विविध कार्यक्रमांच्या संदर्भात अनेक सभासदांनी आपले अनुभव कथन केले आणि मौलिक सूचनाही केल्या. श्री. ठाकूरदेसाई, श्रीमती रागिणी पुंडलीक, श्री प्रमोद आडकर, प्रा. मिरदेव गायकवाड, श्री. राम देसाई, श्री राम वझे, सौ श्यर्मिला द्रविड, डॉ. वीणा देव, श्री. अनंतराव कुलकर्णी, श्री. म. ना. गोगटे, डॉ. वि. भा. देशपांडे, डॉ. न. म. जोशी, प्रा. रा. ग. जाधव, श्री. हरि नरके, श्री. ह. ल. निपुणगे, श्रीमती अंजली कुलकर्णी, श्री. रंगा मराठे, श्री. किरण जोशी, प्रा. हं. श्री. शेणोलीकर, डॉ. कल्याणी दिवेकर इत्यादींचा सहभाग विशेष उल्लेखनीय होता.

डॉ. कल्याणी दिवेकर, श्री. रंगा मराठे, श्री. प्रमोद आडकर, श्री. ह. ल. निपुणगे, श्री. हरि नरके, श्री. राजा फडणीस या सर्वांनी परिषदेचे उपक्रम राबवताना येणारे अनुभव सांगितले व अडचणीही कथन केल्या. कार्याध्यक्ष डॉ. जोगळेकर यांनी सर्व सभासदांनी मोकळेपणाने आपले मनोगत व्यक्त केल्याबद्दल समाधान व्यक्त केले. कोषाध्यक्ष श्री. ना. जोशी यांनी सर्वांचे आभार मानले व असे सभासद मेळावे प्रत्येक वर्षी घेण्यात यावेत असे सुचवले.

**'सहकारी संस्थांचा' सहभाग**

रविवार दि. २५.५.९७ या दिवशी सायंकाळी ५ ते ८ या वेळात आणखी एक वैशिष्ट्यपूर्ण कार्यक्रम घेण्यात आला. पुण्यात साहित्याची आवड आणि आस्था असलेल्या अनेकांची लहान मोठी वाङ्मयीन मंडळे आहेत. त्यातील साहित्यप्रेमी भगिनीमंडळ, काव्यशिल्प या सारख्या संस्था अनेक वर्षे सातत्याने वाङ्मयीन कार्य करीत आल्या आहेत. गेल्या दहा पंधरा वर्षात अनेक नवनवी मंडळे निर्माण झाली आहेत.

डॉ. मंदा खांडगे आणि श्रीमती भारती पांडे (साहित्यप्रेमी भगिनी मंडळ), स्वाती सामक आणि स्नेहसुधा कुलकर्णी (काव्यशिल्प), डॉ. शंतनु चिंधडे ( शब्दवैभव साहित्यप्रेमी मंडळ), प्रमोद आडकर (रंगत-संगत प्रतिष्ठान), ज्योत्स्ना चांदगुडे (सेवाभारती), अनिल कांवळे, संजीवनी तोफखाने (युनिव्हर्सल पोएट्री फौंडेशन), नरेंद्र वोडके व अंजली कुलकर्णी (शब्दमित्र), डॉ. माधवी वैद्य आणि प्रा. सुजाता शेणई (अनन्वय फौंडेशन), मीनल बाठे (क्षीतिज साहित्यप्रेमी संस्था), श्रीजित वाघमारे (कलाश्री प्रतिष्ठान) अशा अनेक प्रतिनिधींनी परिषदेच्या या योजनेचे स्वागत केले व सर्व वाङ्मय मंडळांमध्ये परस्पर सहकार्याचे देवघेवीचे व सामंजस्याचे वातावरण निर्माण करण्यात परिषदेने पुढाकार घेतला याबद्दल समाधान व्यक्त केले. परिषदेसारखी ज्येष्ठ संस्था आपल्या कार्याची दखल घेत आहे याबद्दलचा आनंद या मंडळांनी व्यक्त केला. ती सर्व मंडळे व परिषद यांमधील समन्वयक म्हणून सर्वांनी श्री. प्रमोद आडकर यांची निवड केली.



अनुक्रमणिका

ही नवी योजना ९७-९८ या वर्षासाठी प्रथम राबवावी व मार्च ९८ मध्ये या योजनेचा आढावा घ्यावा असेही ठरवण्यात आले.

या योजनेत सहभागी झालेल्या सर्व सहकारी मंडळांचा संयुक्त कार्यक्रम दि. २५.५.९७ च्या सायंकाळी घेण्यात आला. या विशेष कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी सुप्रसिद्ध लेखिका, साहित्यप्रेमी भगिनी मंडळाच्या एक संस्थापिका व 'स्त्री' मासिकाच्या भूतपूर्व संपादिका श्रीमती शांता किर्लोस्कर यांची निवड करण्यात आली होती. परस्पर परिचय, चहापान, नावनोंदणी इत्यादी गोष्टी पार पडल्यावर परिषदेचे कार्याध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी सर्वांचे स्वागत केले व या वैशिष्ट्यपूर्ण उपक्रमाची सर्वांना कल्पना दिली. त्यानंतर प्रत्येक मंडळाच्या प्रतिनिधीने आपापल्या मंडळांच्या कार्याची माहिती निवेदन केली. मंडळाची कार्यपध्दती, सभासद संख्या मंडळाचे वेगळेपण यावर सर्वच प्रतिनिधींनी यथायोग्य प्रकाश टाकला.

**श्रीमती शांता किर्लोस्कर यांचे मार्गदर्शन**

समारंभाच्या अध्यक्षा श्रीमती शांता किर्लोस्कर यांचे भाषण अतिशय विचार प्रवर्तक व प्रोत्साहक असे झाले. साहित्यप्रेमी भगिनी मंडळाच्या ही आधी स्त्रीसखी मंडळ चालवण्याचा शांताबाईंना अनुभव होतो. लेखक व वाचक हे मोठ्या प्रमाणात एकत्र आले पाहिजेत. लेखकाने सतत आत्मपरीक्षण केले पाहिजे, व आपली प्रयोगशीलता वाढविली पाहिजे. सर्वच जण लेखक किंवा कवी होऊ शकतात असे नाही पण चांगले वाचक निश्चितच होऊ शकतात. प्रत्येकाने सतत सकस अशा साहित्याचे वाचन केले पाहिजे. बदल्या काळात जीवन अधिकाधिक धावपळीचे व गुंतागुंतीचे होत चालले आहे. समाजाला बिघडवणारे अनेक घटक आकर्षक माध्यमांच्या रूपाने आपल्याला ग्रासत आहेत अशा वेळी अभिरूचीपूर्ण वाचनाची संस्कृती टिकवली पाहिजे, जोपासली पाहिजे.

**'२१ वे शतक व मराठी साहित्याचे भवितव्य'**

सोमवार दि. २६.५.९७ या दिवशी सकाळी ९ ते १२ या वेळात एका महत्त्वाच्याविषयावरील वाङमयीन चर्चासत्र घेण्यात आले होते. या चर्चा सत्राच्या संयोजनाचे काम कार्यकारी मंडळाच्या सदस्या डॉ. अश्विनी धोंगडे यांच्याकडे सोपविण्यातआले होते. अध्यक्षस्थानी प्रा. रा. ग. जाधव हे होते. उपस्थितांचे स्वागत व प्रास्ताविक डॉ. जोगळेकर यांनी केले. परस्पर परिचय व चहापान या नंतर चर्चासत्रास प्रारंभ झाला.

'२१ वे शतक व मराठी साहित्याचे भवितव्य' या चर्चासत्रासाठी डॉ. अश्विनी धोंगडे यांनी एक संक्षिप्त टिपण केले होते व त्या आधारे त्यांनी बीजभाषण केले. चर्चासत्रासाठी मान्यवर अभ्यासकांना मुद्दाम निमंत्रित केले होते. त्यात डॉ. नागनाथ कोत्तापल्ले, डॉ. आनंद यादव, डॉ. रवींद्र घवी (गोवा), डॉ. अंजली सोमण, व किर्लोस्करचे संपादक व सुप्रसिध्द लेखक श्री. ह. मो. मराठे यांचा समावेश होता. चर्चासत्रासाठी सुमारे पन्नास अभ्यासक व साहित्यप्रेमी उपस्थित होते. त्यातील म. ना. गोगटे, हरी नरके, कल्याणी दिवेकर यांनीही विविध मुद्दे उपस्थित करून चर्चेत भाग घेतला. प्रा. रा. ग. जाधव यांनी अध्यक्षीय भाषणात चर्चेचा यथायोग्य समारोप केला. अध्यक्षांचे व उपस्थितांचे आभार मानताना डॉ. जोगळेकर यांनी वर्धापन दिन केवळ उत्सवी समारंभ अशा स्वरूपात न करता त्या निमित्ताने गंभीर स्वरूपाची

वाङ्मयीन चर्चा अशा कार्यक्रमाचाही समावेश करता आला व त्यास अपेक्षेपेक्षा अधिक प्रतिसाद मिळाला असे सांगितले.

**ग्रंथपारितोषिक वितरण समारंभ**

दि. २६.५.९७ रोजी सायंकाळी ग्रंथ पारितोषिक वितरण समारंभ पटवर्धन सभागृहात आयोजित केला होता. श्रोत्यांच्या भरगच्च उपस्थितीत हा समारंभ उत्साहाच्या वातावरणात पार पडला. अध्यक्षस्थानी श्री. राजेंद्र वनहट्टी होते. त्यांच्या हस्ते पारितोषिकांचे वितरण झाले.

त्याआधी ज्येष्ठ लेखक आणि संमेलनाध्यक्ष श्री. ना. सं. इनामदार यांच्या अध्यक्षतेखाली पारितोषिकविजेत्या लेखकांशी संवादाचा कार्यक्रम यशस्वीपणे पार पाडला. या संपूर्ण कार्यक्रमाचे संयोजन कार्यवाह डॉ. कल्याणी दिवेकर यांनी केले, तर सूत्रसंचालनाचे काम कार्यकारी मंडळाचे एक सदस्य श्री. हरी नरके यांनी केले. पारितोषिक विजेत्यांपैकी 'भारतीय साप' या आगळ्या वेगळ्या पुस्तकाचे लेखक 'श्री. नीलमकुमार खैरे', साबुदाण्याची निर्मिती या विषयावरील 'टॅपिओका'या कृषीविषयक पुस्तकाचे लेखक 'प्रा. शिवाजीराव ठोंबरे व डॉ. वसंतराव खुस्पे', 'ग्यानोबा कृष्णाजी ससाणे' या पुस्तकाचे लेखक 'प्रा. गजमल माळी', 'गोमंतक ग्रंथकारांच्या मराठी ग्रंथाची सूची' याचे लेखक 'डॉ. रवींद्र घवी', 'वेधमहामानवाचा' (अभिनव पध्दतीने लिहिलेले शिवाजी चरित्र) या ग्रंथाचे लेखक श्री. श्रीनिवास सामंत 'आधुनिक मराठी नाटक: आशय आणि आकृती बंध' च्या लेखिका डॉ. सुषमा जोगळेकर, 'सती' कथासंग्रहाचे लेखक श्री. प्रवीण पाटकर, 'तुकाराम दर्शन' या ग्रंथाचे लेखक डॉ. सदानंद मोरे, आणि समग्र दिवाकरच्या संपादिका डॉ. सरोजिनी वैद्य या सर्व पारितोषिक विजेत्या लेखकांनी मनोगते व्यक्त केली. या सर्व पारितोषिक विजेत्यांना श्रोत्यांच्या वतीने श्री. हरि नरके यांनी प्रश्न विचारले आणि त्या त्या लेखकाच्या उत्तरातून उदबोधक अशी माहिती सर्वांना मिळाली. श्री. नीलमकुमार खैरे, श्री श्रीनिवास सामंत, डॉ. रविंद्र घवी, डॉ. सुषमा जोगळेकर यांची मनोगते विशेष परिणामकारक झाली. या लेखक-वाचक मेळाव्याचा समारोप श्री. ना. सं. इनामदार यांनी मार्मिक शब्दात केला.

सर्व पारितोषिक विजेत्यांच्या वतीने डॉ. सरोजिनी वैद्य यांचे भाषण झाले. म. सा. परिषदेचा संबंध कसा आला व आपल्या जडणघडणीत परिषदेचे स्थान कसे संस्मरणीय आहे, हे सांगून त्यांनी जांभेकरांच्या नावाने मिळणाऱ्या पारितोषिकाबद्दल आनंद व्यक्त केला. पारितोषिकाची रक्कम गौण आहे, पण ते पारितोषिक कोण देते याला महत्त्व आहे, असे त्यांनी सांगितले. ज्या विषयावरील पुस्तकांना इतरत्र पारितोषिके दिली जात नाहीत अशाही विषयांकडे परिषद लक्ष पुरविते याचे त्यांनी स्वागत केले. परिषदेची दारे आता उघडली जाऊ लागली आहेत त्यामुळे अधिक मोकळी हवा आत येत राहील. केवळ ललित वाङ्मयाला किंवा वैचारिक ग्रंथांना पुरस्कार देण्याने भागत नाही, मराठीचा विकास व्हायचा तर नवनवीन विषयांवरील पुस्तके वाचकांपुढे आली पाहिजेत ती बदलत्या काळाची गरज आहे. आपल्याभाषणाच्या शेवटी डॉ. सरोजिनी वैद्य यांनी जांभेकर पारितोषिकाच्या रक्कमेत वाढ करण्यासाठी स्वत:ची रु १०००/- ची देणगी जाहीर केली.

परिषदेतर्फे दिली जाणारी अनेक पारितोषिके पुष्कळ जुनी आहेत. पण आता त्या रकमांमध्ये

कालानुरूप वाढ करण्याची गरज आहे. परिषदेच्या कार्यकर्त्यांनी संबंधित देणगीदारांचे वारस किंवा जवळचे नातेवाईक यांना भेटून पारितोषिकाची रक्कम किमान रु १०००, करण्याची विनंती केली. त्यास उत्साहवर्धक प्रतिसाद मिळाला. श्री. य. वि. देशमुख (लोकहितवादी पारितोषिक.) श्री. प्रभाकर गोखले (नी. स. गोखले परितोषिक) श्री. गजानन आपटे, श्री सुभाष आपटे व श्री उल्हास आपटे (ह. ना. आपटे पारितोषिक) कॉंटिनेंटलचे श्री. अनंतराव कुलकर्णी (चिं. वि. जोशी व कुसुमाग्रज पारितोषिक) श्री. अरुण पारगावकर (म. वि. गोखले पारितोषिक) श्री. आशुतोष शेणोलीकर (ह. श्री. शेणोलीकर पारितोषिक) या सर्व देणगीदारांचा कृतज्ञतापूर्वक उल्लेख करण्यात आला. म. सा. परीक्षांमधील यशस्वी विद्यार्थांसाठी पारितोषिके ठेवणारे श्री. भाटवडेकर व श्री. फणसळकर यांचेही आभार मानण्यात आले.

**परिषदेच्या पुरस्कारांचे वेगळेपण**

परिषदेच्या ग्रंथ पुरस्काराचे वेगळेपण कार्याध्यक्ष डॉ. जोगळेकर यांनी यावेळी सांगितले. ग्रंथ निवडीचे काम वर्षभर चालू असते. पुस्तके पाठवण्याबद्दल लेखकांना व प्रकाशकांना आवाहन करण्यात येते. पण परिषदेकडे न आलेली पुस्तकेही परीक्षक विचारात घेतात. त्यासाठी परीक्षकांना बरीच मेहनत घ्यावी लागते. त्यांना मानधनही नाममात्रच मिळते. पण परिषदेवरील लोभामुळे हे जिकिरीचे काम परीक्षक करीत असतात. अशा परीक्षकांबद्दल कृतज्ञता व्यक्त करणे आमचे कर्तव्यच आहे. या विभागाच्या निमंत्रक डॉ. कल्याणी दिवेकर व पारितोषिक समितीचे सर्व सदस्य हेही वर्षभर सतत झटत असतात. कामाचा प्रचंड ताण सहन करतात. केवळ त्यांच्या बळावरच इतकी वेगवेगळी पारितोषिके वेळच्या वेळी व सातत्याने देणारी संस्था असा लौकिक परिषदेला प्राप्त झाला आहे. या सर्व कार्यकर्त्यांचेही कौतुक केले पाहिजे.

**परीक्षा पारितोषिके**

ग्रंथ पुरस्काराप्रमाणेच या वर्षी परिषदेच्या परीक्षांमध्ये यशस्वी झालेल्या पुण्यातील विद्यार्थ्यांना अध्यक्षांच्या हस्ते प्रथमच रोख पारितोषिक देण्यात आली. विद्यार्थ्यांना उत्तेजन मिळण्याच्या दृष्टीने अशी पारितोषिके दिली जावीत याबद्दल प्रयत्न चालू होते. श्री. मो. वि. भाटवडेकर यांनी सौ. शकुंतला भाटवडेकर यांच्या स्मरणार्थ रु. १०,०००/- ची देणगी दिली. तसेच दिनशा या दुकानाचे मालक कै. दि. न. साठे यांच्या स्मरणार्थ त्यांचे मित्र श्री. फणसळकर यांनी रु १०००० ची देणगी दिली. या देणग्यांच्या व्याजातून ही पारितोषिके देणे या वर्षी सुरू केले. खालील विद्यार्थिनींनी उपस्थित राहून पारितोषिके स्वीकारली.

**विशारद परीक्षा-१९९५**

१) अर्चना पळणीटकर-पहिला क्रमांक रु. २००/- २) सोनाली पाध्ये - दुसरा क्रमांक रु. १२०/- ३) आरती कुलकर्णी - तिसरा क्रमांक रु. ८०/-

(१९९५ सालची ही फक्त भाटवडेकर पारितोषिके आहेत. १९९७ ची मात्र भाटवडेकर आणि साठे अशी प्रत्येकी दोन पारितोषिके आहेत.

**प्रथमा परीक्षा-१९९५ :** १) वरदा कोल्हटकर दुसरा क्रमांक - रु. ३०/-

**विशारद परीक्षा-१९९६ :** १) वैखरी खांडेकर - पहिला क्रमांक रु. ४००/- २) कल्याणी

पाडळकर - दुसरा क्रमांक रु. २४०/-

(पुण्यावाहेरील पारितोषिक विजेत्या विद्यार्थ्यांना त्या त्या केंद्रात पारितोषिके देण्यात येतील तसेच १९९७ ची पारितोषिके स्वतंत्र कार्यक्रमात देण्यात येतील.)

पारितोषिक वितरणानंतर समारंभाचे अध्यक्ष श्री. राजेंद्र वनहट्टी यांचे भाषण झाले. त्यांनी परीक्षेतील यशस्वी विद्यार्थ्यांचे, तसेच ज्यांना ग्रंथ पारितोषिके प्राप्त झाली आहेत अशा सर्वांचे अभिनंदन केले.

डॉ. कल्याणी दिवेकर यांनी आभार प्रदर्शन केल्यानंतर अतिशय रंगतदार असा हा कार्यक्रम संपला.

□

## वर्धापन दिन - मुख्य समारंभ

मंगळवार दि. २७.५.९७ रोजी सायंकाळी ६ ते ८.३० या वेळात राज्य शिक्षण संस्थेच्या महात्मा फुले सभागृहात ९१ व्या वर्धापनदिनाचा मुख्य समारंभ साजरा झाला. समारंभाच्या अध्यक्षस्थानी श्री. राजेंद्र वनहट्टी होते. तर प्रमुख पाहुणे म्हणून महाराष्ट्रराज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अध्यक्ष डॉ. मधुकर आष्टीकर उपस्थित होते. परिषदेचे सभासद, हितचिंतक व आजी माजी कार्यकर्ते या समारंभास मोठ्या संख्येने उपस्थित होते.

म. सा. परिषद पुरस्काराचे मानकरी म्हणून यावर्षी वयोवृद्ध लेखक (व मुलांचे नाना) श्री. गोपीनाथ तळवलकर यांची निवड परिषदेने केली. (रु. ५०००/- व स्मृतिचिन्ह असे) हे परितोषिक स्वीकारण्यासाठी श्री. तळवलकर स्वत: उपस्थित होते. वयपरत्वे ते भाषण करू शकले नाहीत, पण त्यांचे मनोगत डॉ. कल्याणी दिवेकर यांनी वाचले. परिषदेचे कार्यवाह श्री. रत्नाकर कुलकर्णी यांनी श्री. गोपीनाथ तळवलकर यांच्या गेल्या सत्तर वर्षांतील प्रदीर्घ साहित्य सेवेचा उचित शब्दात गौरव केला. श्री. तळवलकर यांना अध्यक्ष श्री. वनहट्टी यांनी म. सा. परिषद पुरस्कार, स्मृतिचिन्ह, शाल व गुच्छ अर्पण करून त्यांचा सत्कार केला.

आपले मनोगत व्यक्त करताना-श्री. तळवलकर म्हणाले, 'लहान मुले ही आनंदाची खाण असतात. अशा असंख्य मुलांनीच माझ्या जीवनात आनंद निर्माण केला. मुलांच्या सहवासाने आणि विनोदाने माणूस तरुण होतो. माणसाची अशी वृत्ती अध्यात्मासाठीही आवश्यक असते. सर्व प्रेषितांनी जगाला प्रेमाचा संदेश दिला आहे. या प्रेमानेच त्यांनी जग जिंकले.' चार वर्षांपूर्वी श्रीमती मालतीवाई बेडेकर यांना आपल्या हस्ते म. सा. प. पारितोषिक देण्यात आले होते याची आठवण करून देऊन श्री. तळवलकर म्हणाले, ' म. सा. प. चा पुरस्कार हा आपल्याला नोवेल पुरस्काराच्या तोडीचा वाटतो.'

परिषदेचे ख्यातनाम कार्यकर्ते व मान्यवर लेखक डॉ. भीमराव कुलकर्णी यांच्या स्मरणार्थ प्रतिवर्षी एका कार्यकर्त्याला रु. १०००/- चा डॉ. भीमराव कुलकर्णी पुरस्कार देऊन त्याचा सन्मान करण्यात येतो. या वर्षी या पुरस्काराचे मानकरी म्हणून सुप्रसिद्ध लेखक व गोमंतकात मराठी भाषेच्या विकासाचे व प्रसाराचे काम मोठ्या निष्ठेने करत राहिलेले श्री. शशिकांत नार्वेकर यांची निवड करण्यात आली. श्री. नार्वेकर यांच्या गेल्या चाळीस वर्षांतील वहुविध कार्याचा परिचय परिषदेचे पुण्यावाहेरील कार्यवाह डॉ. मधुकर हसमनीस यांनी यथोचित

शब्दात करून दिला. अध्यक्षांच्या हस्ते श्री. नार्वेकर यांनी हा पुरस्कार स्वीकारला. उत्तराच्या भाषणात ते म्हणाले, 'माझे मित्र भीमराव कुलकर्णी यांच्या नावाचा हा पुरस्कार देऊन परिषदेने माझा फार मोठा सन्मान केला आहे. महाराष्ट्र आणि गोवा हे राजकीय दृष्ट्या वेगवेगळे असले, तरी सांस्कृतिक, सामाजिक व साहित्यिक दृष्टींनी ते एकच आहेत, असे आम्ही मानतो.'

**श्री. म. श्री. दीक्षित व श्री. राजा फडणीस यांचा सत्कार**

या वर्धापन समारंभात आणखी दोन कार्यकर्त्यांचा विशेषत्वाने सत्कार करण्यात आला. श्री. म. श्री. दीक्षित हे सध्या परिषदेचे कार्यकारी विश्वस्त आहेत. पन्नास वर्षांपूर्वी तेव्हाचे कार्याध्यक्ष श्री. बापूसाहेब माटे यांच्या सांगण्यावरून लेखनिक म्हणून ते परिषदेचे काम करू लागले. पहिली पंचवीस वर्षे त्यांनी ही सेवा अत्यल्प वेतनावर मोठ्या निष्ठेने केली. १९७२ मध्ये परिषदेच्या सेवेतून ते स्वेच्छेने मुक्त झाले. आणि तेव्हापासून अनेक वर्षे कार्यकारी मंडळावर त्यांनी काम केले. बरीच वर्षे ते कार्यवाह होते. महामंडळावरील प्रतिनिधी होते. आणि काही काळ कोषाध्यक्षही होते. सामाजिक संस्थात्मक कार्याला कसे वाहून घ्यावे, याचा श्री. दीक्षित हे एक आदर्शच आहेत. परिषदे प्रमाणेच वसंत व्याख्यानमाला, नगर वाचन मंदिर इत्यादी अनेक संस्थांशी त्यांचा निकटचा संबंध आहे. १९४९, १९७७, १९८९ या वर्षी जी अखिल भारतीय साहित्य संमेलने पुण्यात झाली. त्याच्याशी त्यांचा दृढ संबंध होता. परिषदेला साठ, पंचाहत्तर व ऐंशी वर्षे पूर्ण झाल्याबद्दल जे समारंभ झाले त्यात त्यांचा महत्त्वाचा वाटा होताच. शिवाय या प्रत्येक वेळी निघालेल्या स्मरणिकेच्या संपादनातही ते सहभागी झाले होते.

या समारंभात, अलिकडेच वयाची साठ वर्षे पूर्ण झाल्याबद्दल प्रमुख कार्यवाह श्री. राजा फडणीस यांचाही सत्कार करण्यात आला. श्री. फडणीस हे गेली पंधरा वर्षे अबोलपणे परिषदेचे कार्य करत आहेत. परिषदेचे कोषाध्यक्ष, प्रमुख कार्यवाह व महामंडळावरील प्रतिनिधी ही पदे त्यांनी समर्थपणे सांभाळली आहेत. साहित्यिक साहाय्य निधी निर्माण करून योग्य लेखकाला परिषदेची गौरव वृत्ती द्यावी आणि साहित्य संस्थेतील कार्यकर्त्याला डॉ. भीमराव कुलकर्णी यांच्या नावाने पुरस्कार दयावा या योजनांचे श्री. फडणीस हे प्रवर्तक आहेत. परिषदेची आर्थिक बाजू सांभाळून, परिषदेचे हित साधण्यात ते दक्ष असतात. अध्यक्षांच्या हस्ते शाल व गुच्छ देऊन त्यांचा सत्कार करण्यात आला. तेव्हा सत्काराला उत्तर देण्याचे भाषण न करता त्यांनी परिषदेला रु. १५,०००/- ची देणगी देत असल्याचे जाहीर केले. या देणगीच्या व्याजातून तत्त्वज्ञान विषयावरील उत्कृष्ट ग्रंथास किंवा दीर्घकाळ तत्त्वज्ञान विषयक लेखन केलेल्या ज्येष्ठ लेखकास वै. रामाचार्य अवधानी यांच्या नावाने पुढील वर्षापासून पारितोषिक देण्यात यावे अशी त्यांनी विनंती केली.

या हृद्य सत्कार सोहळ्यानंतर प्रमुख पाहुणे व ज्येष्ठ विचारवंत डॉ. मधुकर आष्टीकर यांचे भाषण झाले. आपल्या भाषणात ते म्हणाले, 'ज्याला जीवन गवसले आहे आणि ते सशक्तपणे मांडण्याचे सामर्थ्य लाभले आहे, त्यालाच साहित्यिक म्हटले पाहिजे. शब्दाला अर्थ मिळाला तर केवळ भाषा निर्माण होते; पण शब्दाला अभिनय मिळाला, तर साहित्य निर्मिती होते. आपल्याला भाषेच्याही पुढे जावयाचे असेल, तर शब्दाला अभिनय प्राप्त झाला पाहिजे. उत्तम साहित्य निर्मितीसाठी एक प्रकारचा कैफही हवा. ''साहित्याचे मानवी जीवनातील स्थान व



अनुक्रमणिका

साहित्याचे सामर्थ्य या संबंधी सूत्ररूपाने पण अतिशय आकर्षक पद्धतीने डॉ. आष्टीकर यांनी आपले विचार मांडले.

आपल्या अध्यक्षीय समारोपाच्या भाषणात श्री. बनहट्टी म्हणाले ''विविध प्रकारचे वाङ्मयीन कार्य 'म.सा.प.' ने केले असून त्यामुळे परिषद ही राज्यातील एक प्रमुख सांस्कृतिक केंद्र बनली आहे. तसेच महाराष्ट्राची भूषण ठरली आहे. याचे श्रेय साहित्य प्रेमी रसिकांना व परिषदेच्या निष्ठावंत कार्यकर्त्यांना आहे. परंतु शासनाने व शासकीय संस्थांनी म सा प च्या कार्याची दखल घेतली नाही याचा विषाद वाटतो. परिषदेने शासनाकडे ज्या योजना सादर केल्या त्याला विशेष प्रोत्साहन मिळाले नाही. शरद पवार यांनी मुख्यमंत्री असताना परिषदेच्या रंगरंगोटीसाठी एक लाख रुपये व अनुदान म्हणून एक लाख रुपये दिले होते. त्या खेरीज शासनाकडून विशेष सहाय्य मिळाले नाही. परिषदेला सध्याची इमारत अपुरी पडत आहे व नव्या पाच मजली इमारतीची आवश्यकता आहे. त्यासाठी वारंवार योजना सादर करूनही शासनाने अनुदाने देणे मनावर घेतलेले नाही. विदर्भ व मराठवाड्याच्या साहित्यिक संस्थांना मात्र शासनाने अर्थसहाय्य दिलेले आहे. पुणे पालिकेनेही मसापला कसलीही मदत केलेली नाही. अक्षर वाङ्मय व मराठी वाङ्मयाचा इतिहास या प्रकल्पांसाठीही अर्थ सहाय्याची गरज आहे, असे ते म्हणाले. मराठी वाङ्मयाचा इंग्रजी इतिहास या वाङ्मयीन प्रकल्पाच्या पहिल्या भागाची छपाई सुरू आहे व दुसरा खंड वर्षअखेर तयार होईल अशी माहिती त्यांनी दिली.

पत्रिकेचे संपादक श्री. ह. ल. निपुणगे यांनी हा समारंभ सर्वतोपरी यशस्वी करण्यासाठी ज्यांचा हातभार लागला त्या सर्वांबद्दल कृतज्ञता व्यक्त केली.

शुक्रवार दि. १३ जून ९७ रोजी म. सा. प. आणि आचार्य अत्रे स्मृति समिती यांच्या संयुक्त विद्यमाने आ. अत्रे यांच्या जन्मशताब्दी वर्षानिमित्त डॉ. विश्वास मेंहदळे यांचे 'अग्रलेखकार आचार्य अत्रे' या विषयावर भाषण आयोजित केलेले होते. अध्यक्षस्थानी डॉ. गं. ना. जोगळेकर होते.

शनिवार दि. २१ जून ९७ रोजी नाथमाधव स्मृतिदिनानिमित्त श्री. न. म. जोशी यांचे 'लोकप्रिय साहित्य व दर्जेदार साहित्य' या विषयावर भाषण आयोजित करण्यात आले होते. प्रास्ताविक कार्याध्यक्ष गं. ना. जोगळेकरांनी केले तर आभार प्रदर्शन कार्यवाह रत्नाकर कुलकर्णी यांनी केले.

मंगळवार दि. २४ जून ९७ रोजी का. र. मित्र स्मृतिदिनानिमित्त प्रसिद्ध साहित्यिक ह. मो. मराठे यांचे 'मराठी मासिकांपुढील आव्हाने' या विषयावर भाषण ठेवले होते.

□

म. सा. प. सोनई शाखेने दि. १९ एप्रिल ९७ रोजी ख्यातनाम साहित्यिक श्री. दिलीप पुरुषोत्तम चित्रे यांचे 'मला उमगलेले तुकाराम' या विषयावर भाषण आयोजित केलेले होते. मराठीच्या अभ्यासकांनी संत तुकारामांच्या साहित्याची उपेक्षा केली आहे याबद्दल वक्ते दि. पु. चित्रे यांनी खंत व्यक्त केली तर तुकोबा हे पहिले सत्यशोधक आहेत असे विचार मांडले. शाखेचे अध्यक्ष श्री. यशवंतरावजी गडाख पाटील यांनी वक्ते दि. पु. चित्रे यांचा शाल, श्रीफल देऊन सत्कार केला तर कार्यवाह नामदेवराव देसाई यांनी स्वागत केले. या समारंभास मुळा











सहकारी साखर कारखान्याचे सर्व मान्यवर अधिकारी, कर्मचारी तसेच अन्य संस्थांचे पदाधिकारी व असंख्य रसिक मोठ्या संख्येने उपस्थित होते. दि. २५ मे ९७ रोजी डोंबिवली शाखेच्या वि. स. खांडेकर जन्मशताब्दी व्याख्यान-मालेचे ४ थे पुष्प प्रा. रतनलाल सोनग्रा यांनी गुंफले 'ययाति: एक युग चिंतन' या विषयावर प्रा सोनग्रा यांचे व्यासंगपूर्ण भाषण झाले. अध्यक्षस्थानी श्री. नाना विंझे होते. प्रास्ताविक सौ.स्मिता तळेकर यांनी केले तर आभार श्री सुरेश देशपांडे यांनी मानले.

म. सा. प. डोंबिवली शाखेने ब्राह्मण सभेच्या सहकार्याने दि २९ जून ९७ रोजी वि. स. खांडेकर जन्मशताब्दी व्याख्यान मालेचे ५ वे पुष्प गुंफले. या प्रसंगी सौ. शीला उपाध्ये यांचे खांडेकर साहित्य कालबाह्य नाही या विषयावर भाषण झाले. अध्यक्षस्थानी श्री. सुरेश देशपांडे होते. ब्राह्मण सभेचे अध्यक्ष श्री. नाना विंझे यांनी आभार मानले.

म. सा. प. इस्लामपूर शाखेच्या वतीने प्रा. डॉ. मधु कुलकर्णी यांचा पहिला स्मृतिदिन साजरा करण्यात आला. या निमित्त डॉ. ह. कि. तोडमल यांचे 'हे विश्वचि माझे घर' या विषयावर व्याख्यान झाले. प्रा. श्यामराव पाटील यांच्या हस्ते वक्त्यांचा शाल-श्रीफल देऊन सत्कार करण्यात आला. स्वागत व प्रास्ताविक डॉ. मधुकर हसमनीस यांनी केले तर आभार प्रा. विलास कुलकर्णी यांनी मानले. तसेच दि. २ जून ९७ रोजी शाखेची वार्षिक सर्व साधारण सभा प्रा. श्यामराव पाटील यांच्या अध्यक्षतेखाली संपन्न झाली. हा दिवस शाखेचा वर्धापन दिन म्हणूनही साजरा करण्यात आला. या निमित्ताने व्याख्याने, चर्चासत्र, परिसंवाद वगैरे वाङ्मयीन कार्यक्रमांचे आयोजन करण्यात आले होते.

म. सा. प. फलटण शाखा आणि सुयश साहित्य प्रतिष्ठान, विडणी यांच्या संयुक्त विद्यमाने राज्यस्तरीय कविसंमेलन दि. २२ मे ९७ रोजी आयोजित करण्यात आलेले होते. अध्यक्षस्थानी, फलटण शाखेचे अध्यक्ष श्री. वि. अ. शेख होते तर प्रमुख पाहुणे म्हणून कार्याध्यक्ष श्री. रवीन्द्र वेडकीहाळ व शाखा सदस्य प्रा. एम. जे. जाधव उपस्थित होते.

फलटण शाखेच्या वतीने कै. वि. स. खांडेकर यांच्या जन्मशताब्दीनिमित्त भाऊसाहेबांची कर्मभूमी शिरोडा येथे जाऊन भावांजली वाहण्यात आली. या प्रसंगी भाऊसाहेबांचे विद्यार्थी शिष्य श्री. भिकाजी दळवी यांची प्रकट मुलाखत घेण्यात आली. श्री. दळवी यांनी भाऊसाहेबांच्या अनेक हृद्य आठवणी सांगितल्या. ज्या सुरूच्या बनात समुद्रकाठी भाऊसाहेब खांडेकर चिंतन व मनन करण्यासाठी बसत असत, त्या ठिकाणी आता, पंचतारांकित हॉटेल होऊ घातले आहे! ते होऊ देऊ नये व त्या जागेचे पावित्र्य टिकून रहावे अशा आशयाचे निवेदन फलटण शाखेच्या वतीने मा. मुख्यमंत्री, श्री. मनोहरपंत जोशी यांच्याकडे पाठवण्यात आले आहे. तसेच परतीच्या प्रवासात पोभुर्ले येथे जाऊन शाखेच्या पदाधिकाऱ्यांनी आद्य पत्रकार बाळशास्त्री जांभेकर यांच्या स्मृतीस अभिवादन केले.

म. सा. प. धुळे शाखेच्या व गरूड वाचनालयाच्या वतीने १ एप्रिल ९७ रोजी कै. विद्याधर वैद्य यांचा स्मृतिदिन साजरा करण्यात आला. अध्यक्षस्थानी प्रा. पुरुषोत्तम पाटील होते. प्रमुख पाहुणे म्हणून डॉ. चंद्रकांत वर्तक उपस्थित होते. या कार्यक्रमाचे सूत्रसंचालन प्रा. बी. बी. महाजन यांनी केले तर आभार प्रदर्शन एस. बी. रावळे यांनी केले. □□

अनुक्रमणिका



अनुक्रमणिका





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



